# भरतीची लाट

ना. सी. फडके

आवृत्ति दुसरी

डिसेंबर १९५१



किंमत ४ रु.

---

अंजलि प्रकाशन लिमिटेड

प्रकाशन सातवें.

१९५१

प्रकाशक :—

अंजलि प्रकाशन लिमिटेड
३७ वेस्टर्न इंडिया हाऊस,
सर फिरोजशहा मेथा रोड,
मुंबई १.

---

★ ही कादंबरी प्रथम १९५० सालीं "झंकार" दिवाळी अंकांत प्रसिद्ध झाली.

★ या कादंबरींतील सर्व प्रसंग व पात्रें काल्पनिक आहेत.



---

मुद्रक :— जयंत भट,
न्यू एज प्रिंटिंग प्रेस,
खेतवाडी ८ वी गल्ली,
मुंबई ४.

# प्रकरण पहिलें

" आता माझं ऐकतीस नि घरला येतीस का मी जाऊं आपला एकला ?" असं म्हणून किसन आपल्या पुढ्यांतली पाटी उचलायसाठीं वाकूं लागला.

परंतु गजरीनं त्याला आडवून म्हटलं, " वाईच थांबूं या कीं. "

" थांबूं या काय ? " किसन म्हणाला, " तुला खुळचीळ लागलया का काय तरी ? आतां या रस्त्यानं गाडी जायची न्हाई. सूर्य खालीं गेला दिसत न्हाई व्हय तुला ? "

सूर्यास्त होत असल्याचं गजरीला दिसत नव्हतं असं कसं होईल ? ज्या पारावर ताज्या पेरूंनीं भरलेल्या पाट्या पुढें मांडून तिचा भाऊ किसन व ती बसलीं होतीं तेथून अगदीं नजरेसमोर पश्चिम क्षितिजाला टेकलेल्या आभाळाचा लाल सोनेरी रंग स्पष्ट दिसत होता. पारावरच्या वडाच्या झाडावर व आजूबाजूच्या मोठाल्या वृक्षांवर पक्षांचे लहान मोठे थवे परत

येऊन बसत होते, त्यांचा कलकलाटहि तिच्या कानांवर पडत होता. आतां प्रकाश कांहीं फार वेळ राहणार नाहीं हें तिला समजत होतं. परंतु पेरूची पाटी उचलून घरीं जायची तिची तयारी नव्हती. तिला वाटत होतं, भाड्याची मोठी मोटार राहो, पण एखादी छोटी खासगी गाडी अजूनहि रस्त्यानं जाईल, आणि चार आठ आण्यांचे तरी पेरू खपतील.

पाटी उचलून घरीं चलण्याबद्दल किसनचा आग्रह सुरू झाल्यापासून तिनं जें तीनचारदां त्याला म्हटलं होतं, तेंच आतां पुन्हां म्हटलं, " वाईच थांबू या. "

" तूं थांब. मी चाललों. " किसन म्हणाला, " आतां तुला गिराइक कुटलं मसनवटीतलं येनार हाय व्हय ? बोल, तूं येतीस का मी जाऊं ? "

" जा जा. मी बसनार. "

" बस. बस. रातचीबी हतच बस. गाडाव कुटली. "

" बसन बसन बरं. रातचीबी बसन. "

" हां हां. बस ना. आठ बारा आन्याचं पैसं मातुर आन घरला म्हंजी झालं. "

" नशिब उगाडलं तर आनीन बी. यवडं हिनावतोस कशापायीं ? "

किसन अधिक बोलला नाहीं. त्यानं फक्त जीभ काढून तिला वेडावल्यासारखं केलं आणि आपली पाटी डोक्यावर घेऊन तो चालूं लागला.

गजरा एकटी बसली. समोर दूरच्या आभाळाकडे तिनं पाहिलं तों तिथला सोनेरी भडकपणा झपाट्यानं कमी होत होता. उजव्या डाव्या अंगाला तिनं लांबवर दृष्टि टाकली. फक्त एक उघडी बैलगाडी रें रें करीत मोठ्या रस्त्यानं येत असलेली तिला दिसली. तिच्या मनांत आलं, आपण एवढ्या हट्टानं थांबलों आहोंत खऱ्या, परंतु खरोखरच एखादी मोटार

वरच्या किंवा खालच्या अंगानं इतक्यांत आली तर ठीक, नाहीं तर आपली फजीति होणार. आली तर मात्र या किसन्याची चांगलीच जिरवितां येईल... तिनं आपल्या पुढयांतल्या पाटीकडे पाहिलं. सकाळीं पाटींत भरलेल्या त्या फळांचा ताजेपणा आतां जरा कमी झाला होता, तरीदेखील तीं कांहीं कमी रसरशीत आणि तेजःपुंज दिसत नव्हतीं. या टापूंतले पेरू अतिशय प्रसिद्ध होते, आणि मोटारींतून जाणारे येणारे लोक आठ आठ बारा बारा आणे डझन भावानं त्यांची खरेदी करीत तें कांहीं उगीच नव्हे.

सुमारें मैलभर दूर असलेल्या ‘ आन्सोली ’ नांवाच्या छोट्या गांवाचा देवीच्या देवळापुढचा उघडा बाजार पेरूच्या पाट्यांनींच बहुतेक भरलेला असे. परंतु उत्तरेच्या बाजूनं आन्सोलीकडे जाणाऱ्या मोटारी आधीं या पाराजवळ थांबल्यावांचून रहात नसत. कारण आन्सोलीच्या स्टँडवर गाड्या उन्हांतच उभ्या कराव्या लागत, परंतु या ठिकाणीं मात्र चांगली गर्द छाया मिळण्यासारखी होती. रस्त्याच्या एका अंगाला मोठी विहीरहि होती. आन्सोलीच्या बाजारांत मिळणाऱ्या पेरूंपेक्षां इथें आलेले पेरू विकत घ्यायला प्रवासी अधिक उत्सुक असत. बाजारांत विक्रीला जाण्यापूर्वीं सरळ बागवानाजवळून आपल्याला फळं मिळतात या कल्पनेनं ती मंडळी खूष असत, व थोडे जास्त पैसे द्यायचीदेखील त्यांची तयारी असे. इथल्या बागवाल्यांनींहि हें ओळखलं होतं. छोट्या मुलांना पाट्या देऊन ते पारावर बसवीत, व ओरडायला शिकवीत, ‘ झाडावरचे ताजे पेरू ! ’

किसन आणि गजरी असलं कांहीं ओरडण्याच्या भानगडींत कधीं पडत नसत. कोपऱ्यावर एखादी मोटार थांबली कीं तीं दोघं पाटींतले निवडक मोठाले पेरू एकेका हातांत घेऊन गाडीपुढें जाऊन उभीं रहात असत. फळं खपायला वेळ लागत नसे. गजरीच्या बापाची कांहीं मोठीशी बाग नव्हती. घरामागच्या जमिनींत पेरूचं फार तर पन्नास झाड त्यानं लावलं

असेल. पण त्या जमिनीचा गुण म्हणा किंवा कांहीं म्हणा, फळं असं बचकयासारखं येई आणि मोहरेदार दिसे कीं पाहाणाऱ्याला एकदम घ्यावसंच वाटे. गजरीच्या आणि किसनच्या पाटींत दिवसाअखेरीस फळ सहसा शिल्लक रहात नसे, आणि प्रत्येकजण दोन अडीच रुपयांचा गल्ला घरीं आणीत असे.

पण आजचा दिवस मोठा चमत्कारिक आला होता. रोज दहा वीस भाड्याच्या मोठाल्या मोटारी आणि दहा पंधरा खाजगी छोट्या गाड्या या हमरस्त्यानं जायच्या. परंतु आज एकदेखील गाडी गेली नव्हती कीं आली नव्हती. पारापुढचा तो कोंपरा दिवसाकांठीं मधूनमधून पांच पंचवीस वेळां माणसांनीं रोज गजबजून जायचा. परंतु आज सबंध दिवस सुना गेला होता. त्या कोपऱ्याला उदास कळा आली होती. खालीं वर पसरलेला तो मोठा रुंद रस्ता उजाड दिसूं लागला होता. गर्द छायेच्या त्या रम्य जागेला बाहेरच्या जगाशीं जोडणाऱ्या नाड्या जणूं अकस्मात् तोडल्या गेल्या होत्या, अन् रहदारीचं रुधिसभिसरण एकदम बंद झालं होतं. असा विचित्र प्रकार कां घडावा तें गजरीला नीटसं कळलं नव्हतं. कट्ट्यावर जमलेलीं माणसं बोलत होतीं कीं पेट्रोलच्या दराबद्दल सरकारशीं कांहीं भांडण निघाल्यामुळें पंपवाल्यांनीं आणि मोटरवाल्यांनीं संप केला होता. तीं त्यांचीं बोलणीं गजरीला ऐकूं आलीं होतीं, परंतु त्यांचा नीटसा उलगडा तिच्या अडाणी मनाला करतां आला नव्हता. पेट्रोल तेलाचं भांडण काय असूं शकतं, आणि भांडण निघालं तर संप केल्यानं त्याचा निकाल कसा लागूं शकतो याचा तिला कांहींच तर्क करतां येत नव्हता. तिला एकच गोष्ट कळत होती ती ही कीं आज फळांनीं भरलेली पाटी जशीच्या तशी घरीं न्यावी लागणार होती. तसं करणं तिच्या फार जिवावर आलं होतं. म्हणून ती आपल्या भावाशीं भांडली होती, व अखेर तो

निघून गेला तरी पारावर बसून राहिली होती. तिच्या मनाला आशा वाटत होती कीं त्याचा काय नेम, एखादी गाडी येईलहि आणि आपल्याला चार आठ आण्यांची तरी विक्री करतां येईल...

समोर दूरवर दिसणाऱ्या आभाळाचा रंग भराभर दिसेनासा होऊं लागला. सभोंवारच्या झाडांचे बुंधे जास्त काळे दिसूं लागले. अगदीं सारी आशा डोळयांत एकवटून गजरी एकदां वरच्या एकदां खालच्या बाजूला रस्त्याकडे दृष्टि टाकूं लागली...आतां जर थोड्याच वेळांत गाडी आली नाहीं तर...

तितक्यांत वरच्या अंगाला दूरवर धुळीचा लोट उठलेला तिला दिसला, आणि दुसऱ्याच क्षणीं प्रकाशाचा मोठा झोत रस्त्यावर पडला! गाडी येत हाती खास!

गजरीचा नेहमींचा क्रम असा असे कीं कोपऱ्यावर गाडी थांबली म्हणजे मग दोन्ही हातांत मावतील तेवढे निवडक पेरू घ्यावयाचे आणि पुढें व्हायचं. परंतु आतांची वेळ निकराची होती या कल्पनेनंच कीं काय कोण जाणे, तिनं दोन्ही हातांनीं पाटी उचलली आणि धूम ठोकली. मोटारच्या दिव्यांचा झोत वेगानं जवळ जवळ सरकत होता. त्या झोतांत हातांतली पाटी सांवरीत गजरा उभी राहिली ती जवळ जवळ रस्त्याच्या मधोमधच!

तशी ती उभी राहिली म्हणून कीं मोटार हांकणाऱ्याला त्या ठिकाणीं थांबावसं वाटलं म्हणून-कदाचित दोन्हीं कारणांनीं असेल-वेगानं आलेली गाडी ब्रेकचे आवाज करीत उभी राहिली खरी. झगझगीत प्रकाशांत सांपडलेल्या गजराला गाडींतलीं माणसं दिसणं शक्य नव्हतं. परंतु जे कोणी गाडींत बसलेले असतील त्यांना ऐकूं जाईल एवढ्या मोठ्या आवाजांत ओरडून ती म्हणाली, "पेरू घ्या, पेरू! लइ ग्वाड!" प्रकाशाच्या

झोतांतून पुढें सरकून ती गाडीजवळ गेली तेव्हां तिला आढळून आलं कीं आजपर्यंत पाहिलेल्या मोठ्या किंवा धाकट्या गाड्यांहून निराळयाच मापाची ही गाडी होती. असली 'हाफटन' गाडी तिनं कधीं पाहिली नव्हती. गाडीच्या आंतल्या बाजूस प्रशस्त जागा होती, पण त्या ठिकाणीं दोनच माणसं बसलेली तिला दिसलीं. गाद्यागिरद्या हांथरून मारे रेलून बसले होते ते दोघं! त्यांतला मोठाल्या झुपकेदार मिशांचा जो गृहस्थ होता त्यानं ड्रायव्हरला विचारलं, "का रे लक्ष्मण? गाडी कां उभी केलीस?"

ऐटबाज फेटा बांधलेल्या ड्रायव्हरनं उत्तर दिलं,

"ही छोकरी गाडीपुढें आली ना? बाकी कांहीं बिघडलं नाहीं. बडे तेजदार पेरू दिसताहेत हिच्याजवळ."

आंत दुसरा एक तरुणसा माणूस बसला होता तो एकदम म्हणाला, "काय पेरू? वा वा, बहोत अच्छी बात. लक्ष्मण, चांगले घे ना दोन डझन." आणि असं म्हणतां म्हणतां तो स्वतः पडल्या जागेवरून उठून खिडकीजवळ आला.

झुपकेदार मिशावाल्या गृहस्थानं म्हटलं, "हां हां बेट्यांनो घ्या. खायची वस्तू पुढें आल्यावर तुम्ही सोडणार होय? परंतु झटपट आटप, मुक्कामाला पोंहोंचेपर्यंत फार रात्र होतां कामा नये. लक्ष्मण, किती पल्ला गांठायचा आहे अजून?"

ड्रायव्हरनं उत्तर दिलं, "सत्तर ऐंशी मैलांपेक्षां जास्त नाहीं. टाईमशीर पोंचतों आपण. काळजी नको."

"ठीक ठीक" असं समाधान व्यक्त करून मिशावाला गृहस्थ खिडकींतून बांकलेल्या त्या तरुणावर ओरडला, "ए बुंदु, जल्दी आटप ना. किती वेळ चार पेरू घ्यायला?"

बुंदु म्हणाला, "चारांनीं काय होणार कात ? पेरू असे नामी आहेत कीं आपणदेखील चार पांच सहज खाऊन टाकाल. दोन डझन घेतलेत."

"राम राम. दोन डझन ! बुंदु, मी तुला आधाशी डुक्कर नांव दिलं आहे तें खोटं नाहीं. बरं, किती घ्यायचे असतील ते घे, पण आटप. गाडीची खोटी नको करूंस."

"खोटी नाहीं करीत. पण आफत आली आहे. या छोकरीजवळ परचुरण नाहीं. आणि माझ्याजवळ तर पांचाखेरीज नोट नाही."

"नाहीं तर देऊन टाक नोट. ती छोकरी दुवा देईल. काल रात्रीच्या बैठकीबद्दल आठशें रुपये मिळाले आहेत ना आपल्याला ? पांच रुपयांची परचुरण कसली मागतोस बेट्या ? देऊन टाक नोट. दिलीस ? शाबास ! हं लक्ष्मण, आतां जाऊं दे. एकदम फास्ट."

"हां जी" असं म्हणून लक्ष्मणनं ब्रेक सोडविला आणि दुसऱ्याच क्षणीं गाडी सुरू होऊन वेगानं निघून गेली.

गजरा स्तंभित होऊन पांचाची नोट हातांत धरून उभी राहिली. गाडीच्या मागच्या दिव्याखालची लाल पाटी दिसेनाशी होईपर्यंत ती तशीच थांबली, व मग तिचे पाय घराच्या वाटेकडे वळले...

गाडी निघाली ती खूप वेगानं ! आणि ती तशी निघाल्यावर मघाच्या पांच दहा मिनिटांच्या मुक्कामांत थांबलेले गाडींतल्या त्या व्यक्तींचे विचारहि पुन्हां पुढें सुरू झाले.

बुंदु एकीकडे पेरू खात होता आणि एकीकडे दुपारी झोडलेल्या मेजवानीच्या आठवणी व आतां मुक्कामाला पोहोंचल्यावर काय काय खायला मिळेल त्याच्या कल्पना करीत होता. हिंदुस्थानांतील एक नामांकित तबलिया म्हणून ज्या त्याच्या हातांनीं त्याला कीर्ति मिळवून दिली होती, ते खाद्यपेयांवरहि तो मोठ्या खुशीनं चालवीत असे. आपल्या वाद्याचा

जितका त्याला षोक होता तितकाच तऱ्हेतऱ्हेच्या पक्वान्नांचा होता. लहानपणापासून त्यानं खूप तालीमबाजी करून शरीर कमावलं होतं, आणि या जगांत माणसानं भरपूर खायला प्यायला पाहिजे, नाहीं तर आयुष्यांत मजा ती काय, असं त्याचं तत्त्वज्ञान होतं. खाण्यापिण्याप्रमाणेंच त्याला कपड्यालत्त्यांचाहि षोक होता, आणि त्याच्या कमावलेल्या शरीराला कोणताहि पोषाक शोभून दिसत असे. त्याचे वस्ताद-म्हणजे मोठाल्या झुपकेदार मिशांचे ते गृहस्थ-हरिप्रसाद त्याला चेष्टेनं ' अधाशी डुक्कर ' म्हणत असत त्याचा त्याला राग येत नसे. तो नम्रपणानं त्यांना म्हणे, " पण वस्ताद, खूप खात नाहीं तें माणूस कसलं ? आणि आपणच सांगा, असं भरपूर खाल्ल्याशिवाय सहा सहा घंटे आपली साथ मला करतां येईल काय ? आपली साथ म्हणजे काय चेष्टा आहे ? " या त्याच्या उत्तरावर हरिप्रसाद म्हणत, " बरं बरं. खा लेका हवं तेवढं. " त्याच्या अधाशीपणाबद्दल हरिप्रसाद त्याची नेहमीं थट्टा करीत, परंतु त्या थट्टेंतहि कौतुकाचा स्वर असे ही गोष्ट बुंदुला माहित होती. त्याच्या साथीवर ते खूष होते. आज जवळ जवळ दहा वर्षे तो त्यांच्या संगतींत होता. त्यांच्याकडे येण्याच्या आधीं त्यानं एका गुरुकडे तबल्याचं अध्ययन केलं होतं. परंतु नखरेदार संगत कशी करावी हें हरिप्रसादांनींच त्याला शिकविलं होतं. हरिप्रसाद मूळचे पखवाजिये म्हणून प्रख्यात होते. पुढें त्यांनीं सतार हातीं घेतली व त्या वाद्यावर अफाट मेहनत केली. ते मूळचे पखवाजिये असल्यामुळें त्यांच्या सतार वाजविण्यांत इतर वादकांच्या ठिकाणीं क्वचित्‌च दिसून येणारा असा एक निराळाच स्वतंत्र ढंग आला होता. त्यांची संगत करणं म्हणजे चेष्टा नव्हती. ते आड लयींत फिरूं लागले कीं मुख्य लयीवर नजर राखतां राखतां डोळ्यांपुढें अंधेरी येण्यासारखी होती. आणि ते जलद लयींत वाजवूं लागले कीं साधा स्वच्छ दाणेदार ठेका धरतां धरतां खांदे भरून येत असत, मनगटं शिणून जात असत, बोटं तुटणारसं वाटूं लागत असे. परंतु ही

सारी करामत आतां बुंदूच्या अंगवळणीं पडली होती. कारण गेलीं सहा वर्षं तो हरिप्रसादांची संगत करीत होता...पहिलीं चार वर्षं त्यांनीं फक्त त्याला तयार करण्यांत घालविलीं होतीं, आणि मग ते त्याला साथीला घेऊं लागल्यावर त्यानं त्या कसबांत झपाट्यानं प्रगति केली होती. आतां हरिप्रसादांची सतारीची बैठक त्याच्यावांचून होत नसे. लोक हरिप्रसादांना बोलवतांना सांगत, " साथीला बुंदूला घेऊन या हं."

गेल्या तीन चार वर्षांत हरिप्रसादांचा लौकिक इतका वाढला होता व त्यांना दूरदूरचीं बोलावणीं इतकीं येत कीं शेवटीं हरिप्रसादांनीं एक 'हाफटन' मोटारच घेऊन टाकली होती. चंबल संस्थानच्या राजाकडे ते दरबारचे तंतकार म्हणून नोकरीला होते आणि त्यांच्या तैनातीला एक मोटरगाडी होती. परंतु किती झालं तरी ती संस्थानी तबेल्यांतली गाडी. तिची सदा कोणती तरी रिपेअर करायला हवी असे. हरिप्रसादांच्या राहण्याच्या ठिकाणापासून संस्थानच्या कुलदेवतेच्या देवळापर्यंत त्यांना रोज सकाळीं पोंचविण्याचं आणि तेथून परत आणून पोंचविण्याचं काम ती गाडी रोज कसं बसं जिवापाड पार पाडीत असे. हरिप्रसादांच्या तैनातीला संस्थानी गाडी आहे असं लोकांनीं म्हणावं एवढीच गाडीची किंमत हरिप्रसाद मानीत असत. चंबलचे राजे त्यांना दरमहा अवघे शंभर रुपये देत असत. परंतु एका रसिक राजाचा तनखा आपल्याला आहे असं लोकांना सांगतां यावं म्हणून या लहानशा पगारावर हरिप्रसाद आज दहा वर्षं राहिले होते. इतर संस्थानिकांनीं आणि मुंबईच्या कांहीं धनिकांनीं त्यांना मोठमोठे पगार देऊं करून बोलावणीं धाडलीं. परंतु चंबलची नोकरी त्यांनीं सोडली नाहीं. ते म्हणत, माझा राजा गरीब आहे परंतु माझ्या गुणांची त्याला कदर आहे. त्याच्या पदरींच मी राहणार, दुसरीकडे जाणार नाहीं. आणि चंबलच्या राजाचा गरीब तनखा जसा त्यांना मोलाचा वाटे, त्याचप्रमाणें राजांनीं तैनातीला ठेवलेली जुनी पानी मोटरगाडीदेखील त्यांना वाटे. चंबलच्या

राजाची तैनात केवळ मानमरातबासाठीं आणि लौकिकासाठीं ते करीत; त्यांना खरी मिळकत होत असे ती इतर लोकांपासूनच. सात आठशें रुपये घेतल्यावांचून ते आपल्या सतारवादनाची बैठक करीत नसत, आणि त्यांचा अपूर्व कसबाचा लौकिक आतां इतका वाढला होता कीं एवढी बिदागी द्यायला राजेरजवाड्यांना आणि मोठमोठ्या पैसेवाल्यांना कांहींच वाटत नसे. दूरदूरची आमंत्रणं आलीं कीं प्रवास सोयीचा आणि स्वतंत्रपणें करतां यावा म्हणून संस्थानांतील एका तज्ञ माणसाच्या सल्ल्यानं हरिप्रसादांनीं ही नवी कोरी हाफटन गाडी घेतली होती. पण ती घेतल्यावरहि त्यांची रोजची देवीच्या देवळांतली खेप संस्थानच्या जुन्या पान्या मोटारगाडींतच चालू राहिली. ते म्हणत, इतर लोकांपासून कितीहि पैसा मिळविला तरी महिन्याच्या महिन्याला चंबलच्या तिजोरींतून शंभर सुरती रुपये घेण्यांत मला भूषण वाटतं; आणि त्याच न्यायानं संस्थानच्या गाडींत बसण्याचा अभिमान वाटतो. माझी नवी गाडी फक्त बाहेर जायच्या वेळेस मी वापरणार. राजांच्या कुलदेवतेपुढें रोजची हजेरी द्यायसाठीं जायचं तें राजांच्या गाडींतच जायला हवं. ही मोटार जुनीपानी कशी कां असेना, ती गाडी म्हणजे माझा इतमाम आहे. यामुळें हरिप्रसादांचा मुक्काम चंबलला असला कीं रोज सकाळीं दरबारी पोशाख चढवून हरिप्रसाद आणि बुंदू त्या जुन्या खिळखिळया डगडग् करीत जाणाऱ्या गाडींतून देवीच्या देवळाकडे निघालेले चंबलच्या रहिवाशांना दिसायचे. देवीच्या गाभाऱ्यापुढच्या सभामंडपांत उत्तम बैठक रोज घातलेली असायची. हरिप्रसाद मोठ्या भक्तिभावानं आणि मनापासून घंटा दीडघंटा त्या ठिकाणीं सतार छेडायचे. कुणीहि यावं आणि ज्या अपूर्व वादनासाठीं बाहेच्या लोकांना सात आठशें रुपयांची बिदागी मोजावी लागत असे तें मनसोक्त मोफत ऐकावं...

बुंदूनं हरिप्रसादांची साथ आजपर्यंत अगणित वेळां केली असेल. परंतु त्यांच्या हाताचं कसब असं कांहीं और होतं कीं दर वेळेस त्यांची संगत

करतांना ते कांहीं तरी एक नवीनच करामत करून राहिले आहेत असं बुंदुला वाटे. एखादी रागिणी छेडतां छेडतां हरिप्रसाद असे कांहीं रंगून जात, आणि त्यांच्या हातून अशा कांहीं जागा निघत कीं त्यामुळें बुंदू स्तिमित होऊन जात असे. त्याच्या मनात येई, वस्तादांची विद्या म्हणजे खरोखर एक मोठा समुद्र आहे; त्याला भरती येऊन त्याचं पाणी उचंबळूं लागलं कीं, त्या भरतीच्या लाटांची शोभा किती प्रकारांनीं प्रगट होईल त्याचा नियम नाहीं. ज्यानं हरिप्रसादांच्या संगतींत दहा वर्षं काढलीं होतीं आणि ज्याच्या मनांतच नव्हे तर शरीराच्या रोमरोमांत देखील त्यांच्या वादनांतील आतषबाजीच्या शेंकडों जागा भिनल्या होत्या त्या बुंदुची ही अवस्था, मग जे लोक हरिप्रसादांचं सतारवादन प्रथमच ऐकत असतील त्यांची तें ऐकतांना काय स्थिति होत असेल! वाहवा देतां देतां त्यांना पुरेवाट होत असे...काल रात्रीचीच मैफल पहा ना. रात्रीं सुमारें साडेदहा वाजतां आपल्या सतारीच्या जाड तंताच्या पहिल्या गोड गंभीर टणत्कारांनीं हरिप्रसादांनीं मैफलीची ती जागा भरून टाकण्यास सुरवात केली होती; आणि मग त्यांचं वादन जें सुरू झालं तें पहांटे चार वाजेपर्यंत अखंड चालूं राहिलं होतं. बैठक आटोपल्यानंतर हरिप्रसाद फक्त थोडं दूध पिऊन गेले होते. पण यजमानांनीं जेव्हां विचारलं, ‘ कांहीं फराळाची व्यवस्था करूं का ?’ तेव्हां बुंदूनं एकदम “ हां हां, थोडं खाऊं या ” असं म्हटलं होतं, आणि ताटभर फराळाचे जिन्नस आले तेव्हां त्यानं त्यांवर ताव मारला होता. आज संध्याकाळीं निघण्याच्या पूर्वींदेखील बुंदूनं पुन्हां यथेच्छ फराळ केला होता.

खायची प्यायची व्यवस्था उत्तम ठेवणारे लोक बुंदूला फार आवडत. तो आपल्या आठवणी लोकांना सांगू लागला कीं अमक्या ठिकाणीं वस्तादांनीं वाजविण्याची कशी कमाल केली त्यांचीं वर्णनं ज्याप्रमाणें तो करी त्याप्रमाणेंच अमक्या अमक्या ठिकाणीं सरबराई कशी उत्तम होती आणि

कोणती पक्वान्नं आपण किती खाल्लीं त्याचींहि मोठीं रसभरित वर्णनं तो करीत असे...काल पहांटे ललत रागिणी वाजवितांना अखेर अखेर हरिप्रसाद कसे बेभान झाले होते तें आतां या वेळेस धांवत्या मोटारींत बसून पेरू खातांना बुंदूला आठवत होतं, आणि काल पहांटे व पुन्हां आज संध्याकाळीं जे सुंदर पदार्थ त्यानं भरपूर खाल्ले होते त्याची चवहि त्याला आठवत होती...आणि तो मनाशीं विचार करीत होता, आतां मुक्कामाला पोंचल्यावर खाण्यापिण्याची व्यवस्था मनपसंत होते कीं नाहीं कुणास ठाऊक...धारागड नांवाच्या गांवीं ते निघाले होते. तिथल्या तरुण मुसलमान नबाबाच्या आमंत्रणावरून ते चालले होते. धारागडचा कार्यक्रम आटपून ते चंबलला परत जाणार होते. कारण नवरात्र जवळ आलं होतं. नवरात्राच्या उत्सवांत हरिप्रसाद चंबल सोडून बाहेरगांवीं कुठेंहि जात नसत...बुंदु मनाशीं विचार करीत होता, धारागडचा नबाब मुसलमान आहे तेव्हां तिथें खाण्यापिण्याची तजवीज मस्त असणार यांत शंका नाहीं. कोणकोणते पदार्थ खायला मिळतील त्याच्या कल्पना तो मनाशीं करीत होता...अजून पन्नाससाठ मैलांचं अंतर तोडायचं होतं...परंतु तें तोडायला किती वेळ लागणार ? फार तर दीड घंटा...

परंतु तितक्यांत लक्ष्मण ड्रायव्हरनं मोठमोठ्यांदा हॉर्न वाजविलेला त्यानं ऐकला. अशा प्रकारें एकदम हॉर्न कां वाजविला जावा त्याला कळेना. तो आपल्या बसल्या जागेवरून पुढें झुकून ' काय रे ' म्हणून लक्ष्मणला विचारणार होता. पण तितक्यांत मोटार जोरानं एकदां उजवीकडे एकदां डावीकडे वळली. तिचा फूटबोर्ड कशाला तरी खाडदिशीं धडकला. ती धडक देऊन गाडी पुन्हां वेगानं निघाली ती एका मोठाल्या झाडावर जाऊन आदळली, आणि दुसऱ्याच क्षणीं उतरतीवरून घरंगळून धाडदिशीं आवाज करून खालीं पडली.

सुदैवानं गाडी कोसळली तरी कुणालाहि दुखापत झाली नाहीं, आणि विशेष म्हणजे हरिप्रसादांची लाडकी सतार शाबूत राहिली. गाडीचा एक पाटा मात्र मोडला होता आणि ती पुन्हां चालू करणं अशक्य होतं. मंडळी खालीं उतरली आणि चढणीवरून चढत जाऊन रस्त्यावर उभी राहिली. ज्या बैलगाडीला मोटरची धडक बसली होती ती पुन्हां रस्त्याला लागून दूर गेली होती. बाकी रस्त्यावर सामसूम होतं. रात्र चांदणी होती; त्यामुळें ओसाडपणा तितकासा जाणवत नव्हता. परंतु आतां पुढें काय करायचं, कुणाची मदत कशी मिळवायची याची चिंता होतीच. खालीं वर जवळपास एखादं गांव तरी आहे कीं नाहीं त्याचाहि तर्क करता येण्यासारखा नव्हता. हरिप्रसाद एका ठेंगण्या पुलाच्या दगडी भिंतींवर बसले. पुढें काय व्यवथा करायची असेल ती बुंदू आणि लक्ष्मण करतील अशा विचारानं ते स्वस्थ होते. प्रवासांत किंवा चंबलच्या घरांत असतांना साऱ्या गोष्टींची व्यवस्था इतरांनीं निमूटपणें करावी, त्यांनीं स्वस्थ बसावं, अशी त्यांना संवय झाली होती...बुंदू आणि लक्ष्मण रस्त्यात उभे राहिले. कांहीं तरी करणं भाग होतं, परंतु काय करावं तें त्यांना कळत नव्हतं. बुंदू पुनः पुन्हां लक्ष्मणला दोष देत होता. लक्ष्मण दर वेळीं बैलगाडीवाल्याला शिव्या देत होता, आणि आपण त्या बैलगाडीला वांचवायला गेलों त्यामुळें गाडी कशी झाडावर जाऊन आदळली त्याचं सविस्तर वर्णन करीत होता. परंतु दोघांतला हा मतभेद सोडला तर आतां कांहीं तरी हालचाल केली पाहिजे याबद्दल दोघांचं एकमत होतं, आणि हालचाल करायची म्हणजे काय, करायचं हें दोघांनाहि समजत नव्हतं...

पण तितक्यांत एक मोटरसायकल आली, व त्यांना पाहून सायकल चालविणाऱ्या माणसानं ती थांबविली. सायकलवाल्या माणसाचा पोशाख पाहिल्याबरोबर तो पोलिस खात्यांतला कुणी तरी अधिकारी असला पाहिजे हें बुंदूनं आणि लक्ष्मणनं ओळखलं. त्यांच्या तोंडून अपघाताची हकीगत

समजल्याबरोबर तो अंमलदार म्हणाला, "तुम्ही कांहीं फिकीर करूं नका. सुदैवानं इथून भीमापूर गांव अर्ध्या पाऊण मैलाच्याच अंतरावर आहे. मी तुमची सारी व्यवस्था करतों. आपण मंडळी कुठून आलां होतां, आणि कुठें चाललां होतां ?"

बुंदूनं हरिप्रसादांचं नांव सांगितल्याबरोबर तो माणूस एकदम आश्चर्यानं आणि आनंदानं म्हणाला, "काय, सांगतां काय ? हरिप्रसादांची कीर्ति मी ऐकलेली आहे." तो पुलाकडे गेला व हरिप्रसादांच्या जवळ जाऊन मुजरा करून म्हणाला, "माझं नांव लालजी. पोलीसखात्यांत फौजदार आहे मी. आपलं नांव मी फार दिवस ऐकलेलं आहे. या अपघातानं आपल्याला थोडी तकलीफ झाली, पण आमचं नशीब उघडलं म्हणायचं. अशा योगायोगानं आपले पाय आमच्या भीमापूरला लागणार आहेत. आपण आतां कांहीं फिकीर करूं नका. रातोरात आपली गाडी दुरुस्त करून आपल्याला पुढें पाठविणं मला शक्य नाहीं. पण आपली शक्य तितकी कमी खोटी होईल असं मी करीन. तोंपर्यंत भीमापूरला आपल्याला मुक्काम करावा लागेल, त्याला इलाज नाहीं. आपल्या राहण्याची व्यवस्था मला जितकी उत्तम ठेवतां येईल तितकी ठेवीन. आपण गोड मानून घ्या म्हणजे झालं."

तो पुन्हां मोटारसायकलवर बसून गेला, आणि परत आला तो एका मोटारींत बसून. आपल्याबरोबर त्यानं तीनचार शिपाई आणले होते. त्या शिपायांकडून त्यानं हरिप्रसादांच्या गाडींतल सारं सामान काढून गाडींत भरलं, सतार तबला वगैरे वाद्यं गाडींत काळजीपूर्वक ठेवायला लावून हरिप्रसाद आणि बुंदू यांना मागच्या बाजूस आरामशीर बसविलं, हरिप्रसादांच्या गाडीवर रात्रभर पहारा करण्यास शिपायांना बजावलं, लक्ष्मण ड्रायव्हरला घेऊन तो स्वतः पुढच्या बाजूस बसला आणि त्यानं गाडी सुरूं केली.

रात्र कांहीं फार झाली नव्हती, परंतु भीमापूर गांव झोंपी जाण्याच्या तयारींत होतं. गांवातले तीन चार रस्ते ओलांडून गाडी पुढें जाऊं लागली, तेव्हां बुंदूनं विचारलं, " हें कोणतं गांव ? " लालजी फौजदार म्हणाला, " हेंच भीमापूर. "

बुंदूनं विचारलं," मग आमचा मुक्काम इथं नाहीं का ? आपण गांवातून पुढें निघालों आहोंत म्हणून विचारतों. "

लालजी फौजदार म्हणाला, ' आपल्या मुक्कामाची व्यवस्था इथेच करणार आहे, पण गांवांत नाहीं. आपल्यासारखीं मोठीं माणसं कधीं नव्हे तीं इथं आलीं, त्यांची व्यवस्था गांवांतल्या साध्या घरांत कशी करायची ? या गांवांत बनाजी नांवाचा एक मारवाडी आहे. त्याचा एक छोटासा बंगला गांवाबाहेर शांत जागीं आहे. तिथें आपल्या मुक्कामाची व्यवस्था मीं केली आहे. बनाजीच्या मुनीमाला मी धांवत पुढं पिटाळलं आहे. तो बंगला उघडील. चार गॅसच्या बत्याहि रवाना केल्या आहेत. गडी नोकर धाडले आहेत. आपण जाऊन पोंचूं तोंवर सारी तयारी कंप्लीट झालेली असेल."

बुंदूच्या मनांत आलं, हें सारं झालं, पण खाण्यापिण्याचा कांहीं इंतजाम आहे कीं नाहीं ? जणूं त्याच्या मनांतली शंका ओळखून लालजी फौजदार म्हणाला, " आचारी पाणके साऱ्या साहित्यानिशीं बंगल्यावर धाडून दिले आहेत. जेवणाला थोडासा उशीर मात्र होईल. एवढ्या कसूरीची आपण माफी केली पाहिजे. "

बंगल्यावर पोंहोंचल्याबरोबर लालजी फौजदारानं ज्याला त्याला हुकूम सोडण्याची धांदल उडवून दिली; दिवाणखान्यांतल्या आणि खोल्यांतल्या बैठका घालायला लावल्या, दिव्यांची व्यवस्था केली, आणि आधीं गरमागरम चहा पाहिजे म्हणून खालीं आचाऱ्याला निरोप सांगायसाठीं एका

मागोमाग तीन माणसं धांवत पाठविलीं. त्याचा तो एकंदर अवतार पाहून बुंदू मनाशीं म्हणत होता, जसा कांहीं याच्या बापाचाच बंगला आहे. सारी व्यवस्था करून घेतां घेतां लालजी फौजदार मधून मधून हरिप्रसादांशीं बोलतहि होता. " आपल्याला काय हवं नको तें मनमोकळेपणानं सांगा बरं कां. बनाजी मारवाड्याचं भाग्य म्हणून आपले पाय त्याच्या या बंगल्याला आज लागताहेत. नाहीं तर नेहमीं या बंगल्यांत कलेक्टर, मामलेदार, डी. एस. पी. असले लोक येतातच कीं. पण आज या जागेचं खरं सार्थक झालं. आपल्यासारखे कलावंत वस्तीसाठीं आज इथें राहिले. या ठिकाणीं आपली व्यवस्था झाली म्हणून बनाजी मारवाड्याचे उपकार मानण्याचं कांहीं एक कारण नाहीं. अहो, हा बंगला काय त्याच्या बापाचा आहे ? पै पै व्याजासाठीं गरीब शेतकऱ्यांना छळून कमावलेल्या पैशांनीं ही इमारत उभी राहिली. ती तुमच्या आमच्यासाठींच आहे असं मी समजतों. बनाजीला ना मूल ना बाळ. तो कधीं आपल्या शेटाणीला घेऊन या बंगल्यांत दोन दिवस मजा करायसाठीं आलाय म्हणतां ? छट्. तो गांवांतल्या आपल्या खबदाडांतच राहणार. आणि तिथेंच शेवटीं राम म्हणणार. तेव्हां सांगायची गोष्ट अशी कीं आपण कांहीं एक संकोच करूं नका. आपली सारी सरबराई उत्तम रहावी म्हणूण मी कोशीश केली आहे, ती गोड मानून घ्या म्हणजे झालं...अरे पांड्या, लेका बघत काय उभा राहिलास? चहा झाला का बघ ! घेऊन ये लौकर. चहाला किती उशीर रे—" असं विचारून त्यानं एक छानपैकीं शिवी हांसडली.

दहा मिनिटांत चहा आला. दोन तासांनीं जेवणहि झालं. लालजी फौजदार कांहीं वेळ गप्पा मारून उद्यां सकाळीं उजाडत येतों असं सांगून निरोप घेऊन गेला. बुंदू जेवणाच्या पदार्थांवर कांहीं फारसा खूष झाला नाहीं. पण बऱ्यापैकीं जेवण पोटभर मिळालं अशा खुशींत तो एका खोलींतल्या पलंगावर चढला आणि झोपीं गेला.

हरिप्रसाद कांहीं वेळ दिवाणखान्यांत बसले. एका रागिणींतली एक चीज ते हलक्या आवाजांत गुणगुणत राहिले. मग ते दिवाणखान्यालगतच्या पुढच्या सज्जांत जाऊन उभे राहिले, व तोंडानं गुणगुणतां गुणगुणतां त्यानीं सभोंवार दृष्टि टाकली. आतां चंद्र माथ्यावरून ढळला होता, आणि चांदणं जिकडे तिकडे पसरलं होतं. बंगल्याच्या पुढच्याच बाजूस मोठा रस्ता होता, आणि रस्त्याच्या पलीकडचा उंचसखल जमिनीचा मोठा विस्तार दूरच्या टेंकडयांना जाऊन भिडला होता. त्या भागांत झाडं झुडपं नसल्यामुळें चंदेरी रंगाचा चकाकणारा एक विस्तीर्ण रुजामा जमिनीवर आंथरल्या-सारखा वाटत होता. बंगल्याच्या आवारांत कसल्या तरी सुगंधी वेली फुलल्या होत्या, त्यांचा दरवळ हवेंत तरंगत होता. बंगल्याच्या कांपाउंडला लागूनच एक लहानसं घर होतं. तिथली माणसांची चाहूल आणि घराच्या गोठ्यांत गुरं असावींत त्यांचे आवाज मधूनमधून कानांवर येत होते. हरिप्रसाद दरबारी कानडयांतली एक चीज गुणगुणत किती तरी वेळ उभे राहिले...!

मग त्यांना सतार वाजविण्याची मनस्वी इच्छा झाली. ते आंत गेले. त्यांनीं बुंदूला दोन तीन हांका मारल्या. मग त्याला उठविण्याचा विचार त्यांनीं सोडून दिला. मुद्दाम बनविलेल्या सुंदर पेटींतून आपली सतार बाहेर काढून ते दिवाणखान्यांत येऊन लोडापुढें बसले. मखमलीच्या गवसणीतून त्यांनीं सतार बाहेर काढली. बोटांवर नखी चढवल्या, सतार उचलून आसन घालून ती छातीशीं धरली, आणि साऱ्या तारा आणि तराफा मिळवून घेतल्यावर त्यांनीं मोठ्या प्रसन्नतेनं तारेवर ' ग-सा ' असा टणत्कार केला. त्या दोन स्वरांची धुंदी त्यांच्या डोक्यांत शिरली. त्यांनीं डोळे मिटले, आणि दरबारी कानडयाचे स्वर छेडायला प्रारंभ केला. केवळ स्वतःच्या आनंदासाठीं ते वाजवूं लागले. त्यांच्यापुढें कोणीहि श्रोते बसलेले नव्हते. कुणाची वाहवा मिळविण्यासाठीं ते वाजवीत नव्हते. चांदण्या

रात्रीची प्रसन्न शांतता जणुं त्यांचा स्वर-विलास ऐकण्यासाठीं अगदीं स्तब्ध होऊन उभी होती. तिच्याशीं एकरूप होऊन हरिप्रसादाचं सतारवादन एक प्रकारच्या बेहोशींत किती तरी वेळ चाललं होतं...

हरिप्रसादनीं डोळे मिटून धरले नसते तर त्यांना समजलं असतं कीं एक श्रोता माडीच्या जिन्याच्या पायऱ्यांवर हळूंच येऊन बसला होता. हा श्रोता म्हणजे एक पंधरा सोळा वर्षांची तरुण मुलगी होती. बंगल्याच्या कांपाउंडला लागून असलेलं जें छोटसं घर हरिप्रसादांना दिसलं होतं, तिथें गणपत परदेशी म्हणून एक कॉंट्रॅक्टर रहात असे. त्या गणपतची ही मुलगी होती. तिचं नांव हंसा होतं. तिच्या घरांत निजानीज झाल्यानंतर व तिला करावं लागणारं घरातलं सारं काम आटपल्यानंतर ती झोंपण्यासाठीं पडवींत पडली होती. पण तितक्यांत शेजारच्या बंगल्यांत सतार वाजत असल्याचं तिच्या लक्षांत आलं होतं. सतारीचे स्वर ऐकतांच ती उठली होती, बापाला न सांगता घराबाहेर पडून बंगल्याच्या फाटकांतून आंत शिरली होती, आणि जिना चढून कुणाला दिसणारं नाहीं अशा बेतानं पायरीवर बसून राहिली होती. एखादा मंत्रमुग्ध नाग डोलत रहावा त्याप्रमाणें तिचा नादलुब्ध जीव जिन्यांतल्या अंधारांतल्या त्या फूटभर पायरीवर डोलत राहिला होता. कारण दुर्दैवानं तिच्या आयुष्यांत जसे काबाडकष्ट भरले होते, त्याप्रमाणें निसर्गानं तिच्या ठिकाणीं स्वरलयीच्या सौंदर्याचं विलक्षण प्रेम ठेवलेलं होतं. पायरीवर बसल्या बसल्या तिनं भिंतीला मान टेकली होती. सतारीवर कोणती रागिणी वाजत आहे त्याची तिला किंचितूहि ओळख नव्हती. परंतु हरिप्रसादांच्या हातांतील वाद्यांतून उठणाऱ्या मधुर स्वरलहरींच्या लाटा थेट तिच्या अंतःकरणाला येऊन भिडत होत्या. त्या लाटांचा स्पर्श अनुभवितांना तिला आपल्या प्रत्यक्ष जीवनाचा संपूर्ण विसर पडला होता. तिचा बाप गणपत परदेशी, तिच्या लहानपणींच मरण पावलेली तिची आई, नंतर घरांत आलेली तिची सावत्र आई, त्या आईचा परोपरीचा छळ,

बाईलवेड्या बापाचं दुर्लक्ष, सकाळपासून संध्याकाळपर्यंत घरांत उपसाव्या लागणाऱ्या कामाचे श्रम, या साऱ्या गोष्टींचा हंसाला पूर्ण विसर पडला. अमूर्त अशा गोड गोड नादलहरींशी एकरूप झाल्यामुळें ती स्वतः देखील जणूं अमूर्त झाली. नामरूपाच्या आणि तिच्या प्रत्यक्ष जीवनाच्या उपाधी गळून पडल्या, ती अनंतांत विलीन झाली. या समाधींतून आपल्याला कधींदेखील जागृति येऊं नये असं तिला वाटत होतं...

परंतु अखेर तिच्या समाधीचा भंग झाला. सतारींतून निघणाऱ्या नादलहरी समुद्राच्या लाटा ओहोटीच्या वेळेस पार आंत जाव्या त्याप्रमाणें कानीं पडेनाशा झाल्या. हंसानं डोळे उघडले. पुन्हां सतार वाजूं लागेल अशा आशेनं ती वाट पहात कांहीं वेळ पायरीवर बसून राहिली. पण सतार थांबली ती थांबलीच. हरिप्रसाद मध्येंच एकदां खाकरले तेवढं तिला ऐकूं आलं. कुणी जिन्याकडे कदाचित् येईल अशा भीतीनं ती उठली. सतार वाजविणारे गृहस्थ कोण आहेत तें एकदां डोळे भरून पहावं अशी हंसाला मनस्वी इच्छा झाली. अगदीं आवाज न करतां ती दोन पायऱ्या वर चढली आणि भिंतीला तोंड लावून एकाच डोळयाच्या नजरेनं तिनं दिवाणखान्यांत पाहिलं. दिवाणखान्यांत एकटेच हरिप्रसाद असलेले पाहून तिला विलक्षण आश्चर्य वाटलं. सतार ऐकण्यासाठीं कोणीदेखील हजर नव्हतं तर ! सतार वाजविणारे ते गोरेपान धिप्पाड मोठाल्या झुपकेदार मिशांचे गृहस्थ केवळ आपल्या स्वतःच्या आनंदांत रंगून जाऊन इतका वेळ वाजवीत बसले होते ! तिनं अगदीं भीत भीत भिंतीला चिकटविलेलं आपलं तोंड थोडं आणखी पुढें सरकाविलं आणि मग दोन्ही डोळयांनीं ती हरिप्रसादांकडे आणि त्यांच्या पुढ्यांत असलेल्या त्या सुंदर वाद्याकडे पहात राहिली. किती पाहिलं तरी तिच्या मनाची तृप्ति होईना. तिला वाटलं धीर करावा, आंत जावं, आणि हरिप्रसादांचे पाय धरावे. परंतु त्या कल्पनेनंच तिचे हातपाय कापूं लागले. ती बराच वेळ तशी उभी राहिली. आणि मग एखाद्या

सर्पानं आवाज न करतां निघून जावं त्याप्रमाणें ती जिना उतरून घरीं गेली...

या अनाहूत नादलुब्ध श्रोत्याची हरिप्रसादांना कोठून कल्पना असणार ? ते कांहीं वेळ स्वरचिंतन करीत डोळे मिटून स्वस्थ बसले. मग त्यांनीं आपल्या सतारीवर मखमलीची गवसणी चढविली आणि कांहीं वेळानं ते झोंपी गेले.

ते जागे झाले तेव्हां त्यांना क्षणभर वाटलं, आपल्याला स्वप्न पडत आहे. कारण इतका विलक्षण मंजुळ आवाज त्यांनीं आजपर्यंत कधीं ऐकला नव्हता. परंतु क्षणभर कानोसा घेतल्यानंतर त्यांची खात्री पटली कीं त्यांना स्वप्न पडत नव्हतं. कारण भूपाळीचे शब्द त्यांना स्पष्ट ऐकूं येत होते,

" उठि उठि रे वनमाळी
सरुनि निशा प्रभात झाली
घातली सडा रांगोळी
आंगणिं बघ शोभा भरली
उठि उठि रे वनमाळी "

भूपाळींतला एकेक साधा शब्द भैरव रागांतल्या स्वरानं असा कांहीं नटून बाहेर पडत होता कीं हरिप्रसादांना वाटलं, आपण खरोखरच कृष्ण-चरित्रांतल्या राधेच्या तोंडचं स्वर्गीय गीत ऐकत आहोंत...त्यांनीं आपल्या इयातींत असा सहजसौंदर्यानं नटलेला प्रवाही आवाज कधीं ऐकला नव्हता. ईश्वरी देणगीचा प्रसाद या आवाजांत प्रगट होत होता...पहांटेची ती अत्यंत शांत वेळ ! आणि त्या शांततेंत तरंगणाऱ्या भैरव-रागाचे ते स्वर ! आजपर्यंत कधीं अनुभवास न आलेला असा आल्हाद आपण अनुभवीत आहोंत असं हरिप्रसादांना वाटलं !... " उठि उठि रे

वनमाळी ” !... खरोखरच झोपी गेलेल्या लाडक्या वनमाळीच्या अंगावरून राधेचे नाजूक हात वस्त्र दूर करीत आहेत असं सुंदर चित्र आपण स्वच्छ पहात आहोंत असा गीताचे ते शब्द एकतां ऐकतां हरि-प्रसादांना भास झाला !

त्यांना राहवेना. त्यांनीं कानोसा घेतला. बंगल्याच्या कांपाउंडला लागून असलेल्या त्या छोट्या घरांत कुणी तरी स्त्री गाणं म्हणत असली पाहिजे. ते उठले, जिना उतरून फाटक ओलांडून रस्त्यांवर गेले, कांहीं वेळ त्या छोट्या घरापुढें ते रस्त्यांतच उभे राहिले...“ घातली सडा रांगोळी... आंगणिं बघ शोभा भरली... ” त्या स्वरांतल्या सात्विक उन्मादानं त्यांना अगदीं अस्वस्थ करून सोडलं...ते घरांत शिरले. घराच्या पुढच्याच भागांत छोटासा गोठा होता. तिथें काम करतां करतां एक पंधरा सोळा वर्षांची मुलगी भूपाळी म्हणत होती. तिला आपली चाहूल लागूं नये म्हणून हरिप्रसाद जरासे दूरच उभे राहिले...

रात्रीं त्यांचं सतारवादन ऐकण्यासाठीं हंसा चोरून जिन्यांत येऊन बसली होती ! आतां तिच्या गायनानं आकृष्ट झालेले हरिप्रसाद एखाद्या मंत्रमुग्ध नागाप्रमाणें चोरटेपणानं आपल्या जागीं उभे होते... “ उठि उठि रे वनमाळी ”...तें गायन कधीं संपूं नये असं हरिप्रसादांना वाटत होतं.

पण अखेर तें संपलं, गोठ्यांतलं काम संपवून हंसा घरांत गेली.

ती पुन्हां बाहेर येईल व आपल्या दृष्टीस पडेल अशा आशेनं हरिप्रसाद आपल्या जागीं उभे राहिले. परंतु पांच दहा मिनिटं होऊन गेलीं तरी ती परत आली नाहीं. येईल कीं न येईल हें कळण्यासहि कांहीं मार्ग नव्हता... हरिप्रसादांच्या मनांत आलं सरळ घराच्या दालनांत शिरावं...काय हरकत आहे ?...घरांतल्या माणसांनीं विचारलंच तर सांगतां येईल कीं तुमच्या मुलीचं मंजुळ गाणं ऐकून यावंसं वाटलं, तिला पहावंसं वाटलं म्हणून—

परंतु तितक्यांत ती पुन्हां बाहेर आली !

आतां ती मघाप्रमाणें मोठ्यांदा नव्हे परंतु स्वतःशीं हलक्या आवाजांत गुणगुणल्याप्रमाणें दुसरी एक भूपाळी म्हणत होती.

" घनश्याम सुंदरा ! श्रीधरा ! अरुणोदय झाला

उठि लवकर वनमाळी, उदयाचलिं मित्र आला "

परंतु या वेळीं ती गोठ्यांत आली होती ती कांहीं काम करण्यासाठीं नव्हे, तर गोठ्यांत ढणढणा जाळणारं रॉकेलचं डबडं घरांत घेऊन जाण्यासाठीं. त्यामुळें भूपाळींचे ते दोन चरण गुणगुणून झाले न झाले तोंच भिंतीच्या कोनाड्यांत ठेवलेलं दिव्याचं डबडं घेऊन ती तेथून आंत जाऊं लागली. ती पुन्हां आंत निघाली असं पाहतांच हरिप्रसाद पुढें झाले, व किंचित् तिला आडवल्यासारखे तिच्यासमोर उभे राहिले...तिच्या हातांतल्या दिव्याचा किंचित् तांबूस प्रकाश त्यांच्या चेहऱ्यावर व अंगावर पडला. त्यांना पाहिल्याबरोबर तिचे गुणगुणणारे ओठ एकदम थांबले, आणि आश्चर्य आणि आनंद यामुळें एकमेकांपासून विलग झाले. "कोण, आपण !" असा उद्गार तिच्या तोंडून बाहेर पडला तोदेखील अतिशय नादमधुर होता ! जणुं जी भूपाळी म्हणण्याचं तिनं एकदम थांबविलं होतं तिचा उरलेला भाग तिच्या तोंडून बाहेर पडला होता. रॉकेलच्या दिव्याच्या लालसर काळसर उजेडांत हरिप्रसाद जसे हंसाला प्रथमच स्पष्ट दिसले, तशी तीहि त्यांना दिसण्यासारखी होती. परंतु हरिप्रसादांचं लक्ष तिच्या आकृतीकडे, तारुण्याकडे, अगर लावण्याकडे नव्हतं. विलक्षण स्मृतिमनोहर अशा आवाजाचा ज्या ठिकाणीं उगम झाला तें स्थान यापलीकडे तिच्या मूर्त आकाराचा अर्थ त्यांना समजत नव्हता. बाह्यतः ते तिच्या चेहऱ्याकडे पहात होते. परंतु वस्तुतः त्यांची नजर तिच्या मधुर

आवाजाकडे लागलेली होती. त्यांची ती नजर तिला कदाचित् चमत्कारिक वाटलीहि असेल...

ती त्यांच्याकडे क्षणभर पहात राहिली. " आपण ! " असा उद्गार तिच्या तोंडांतून अस्पष्टपणें बाहेर पडला. आपल्या सतारीच्या तराफाच वाजल्याचा हरिप्रसादांना भास झाला. दुसऱ्याच क्षणीं तिनं हातांतला दिवा खालीं ठेवला, आणि मस्तक त्यांच्या पायांवर ठेवलं.

त्यांनीं तिला उठवून तिच्या मस्तकावर हळूंच हात फिरविला. ते म्हणाले " बेटी, परमेश्वरानं तुला फार मोठी देणगी दिलेली आहे ! " त्यांचे ते शब्द ऐकतांच हंसाला एकदम हुंदका आला. ती पुन्हां झटकन् खालीं वाकली, आणि म्हणाली, " आपल्या पायांपासून कधीं दूर होऊं नये असं मला वाटतं. "

# प्रकरण दुसरें

एका लहानशा दगडावर पाय देऊन बंगल्याच्या कांपाउंडच्या भिंतीवरून हंसानं वाकून पाहिलं.

बंगल्याच्या आवारांत धांदल उडालेली तिला दिसली. लक्ष्मण ड्रायव्हर विडी ओढीत एका झाडाखालीं उभा होता. तिनं टाळी वाजवून आणि 'स्क्' 'स्क्' करून त्याला जवळ बोलावलं. तो भिंतीशीं आल्यावर तिनं त्याला विचारलं, "पाहुणे निघाले कीं काय ?"

लक्ष्मणनं उत्तर दिलं, "आत्ता नाहीं निघाले. पण संध्याकाळपर्यंत आमची गाडी रिपेअर होऊन मग आम्ही निघणार"

"आम्ही ? म्हणजे कोण ?"

"मी, बुंदु, आणि वस्ताद"

"तुमच्या वस्तादांचं नांव काय ?"

" हरिप्रसाद. ते एक नामांकित तंतकार आहेत. सारा हिंदुस्थान त्यांना ओळखतो. तुम्हांला ठाऊक नाहीं ?"

ठाऊक नाहीं ?—अरे वेड्या ! काल रात्रीं ते एकटेच सतार वाजवीत बसले होते तेव्हां त्यांचा एकच एक अज्ञात श्रोता म्हणून चोरून जिन्यांत बसून त्यांच्या वाद्यांतून निघणाऱ्या स्वरमाधुर्याच्या धारा मी आकंठ प्यालें आहे ! तुला ठाऊक नाहीं ?—

मनाशीं असं म्हणत हंसानं मान हलविली, आणि ती दगडावरून खालीं उतरली. ती आपल्या घरांत गेली. परंतु वर्षानुवर्ष त्या घरांत गुदमरून गेलेला तिचा जीव आणखीच गुदमरतो आहे असं तिला वाटलं. हरिप्रसाद आज निघून गेले कीं या गुदमरलेल्या अवस्थेतून बाहेर पडण्याचा मार्ग दाखविणारा जो एक प्रकाश किरण तिला अकस्मात् दिसला होता तो अकस्मात् नाहींसा होणार असं तिच्या मनांत आलं. सावत्र आईचा छळ सोशीत बापाच्या घरांत एखाद्या मोलकरणीप्रमाणें कष्ट करतां करतां तिचा जीव थकला होता. त्या तिच्या शिणलेल्या जीवाला काल रात्रीं एकाएकीं विसाव्याची जागा दिसली होती. आणि ती जागा आतां पुन्हां एकाएकीं दिसेनाशी होणार होती. संगीताचा जो उन्माद जिन्याच्या पायरीवर अवघडून बसून तिनं काल रात्रीं घेतला होता तो तिच्यापासून कायमचा दूर जाणार होता. तिचं कष्टाचं आणि दुःखाचं रुक्ष आयुष्य पुन्हां चालू राहाणार होतं. त्यांतच ती पिचून जाणार होती. हें पिचणं नको असेल, ज्या संगीताची भूक तिच्या अंतर्यामीं उपाशी राहिली होती ती सुकून मरून जायला नको असेल तर या घरांतल्या बंदिवासांतून सुटण्यासाठीं निकराची धडपड करणं तिला भाग होतं. या धडपडीची भीति तिनं बाळगली तर ती अशीच जन्मभर गोठा झाडीत, भांडीं घाशीत, विहिरीचं पाणी उपशीत, धुणं धूत राहणार होती !...

मनाशीं असे विचार करीत हंसा जागच्या जागीं कांहीं वेळ उभी राहिली...तिचा बाप नेहमींप्रमाणें कामावर निघून गेला होता. तिची आई नेहमींप्रमाणें थाटमाट करून गांवांत हिंडायला गेली होती. ...घरांत कुणी नव्हतं...ती चटकन विहिरीकडे गेली. तिनं आपले हातपाय आणि तोंड स्वच्छ धुतलं. घरांत येऊन तिनं वस्त्र बदललं...आणि ती सरळ घराबाहेर पडली.

बंगल्याच्या फाटकांतून शिरून जिना चढून तिनं दिवाणखान्यांत डोकावून पाहिलं. हरिप्रसाद एकटेच दिवाणखान्यांत बसलेले तिला दिसले. तिनं आपला सारा धीटपणा एकवटून आंत पाऊल टाकलं.

तिला पाहतांच हरिप्रसाद म्हणाले, " ये बेटी ! "

ती पुढें झाली. बरोबर ओंजळींतून आणलेली फुलं तिनं त्यांच्या पायावर ठेवलीं, आणि प्रणाम करून ती उभी राहिली.

हरिप्रसाद म्हणाले, " बैस बेटी, उभी कां ? बैस ना. " ती दूर बसली. ते म्हणाले " बेटा आम्ही आज संध्याकाळीं जाणार. तुला मी बोलावणं पाठवणारच होतों. तूं आलीस हें फार बरं झालं. तुझी ती भूपाळी पुन्हां एकदां ऐकण्याची माझी इच्छा आहे. कारण बेटी, परमेश्वरानं तुला फार मोठी देणगी दिलेली आहे. मी तुझ्यापासून कितीहि दूर गेलों आणि कितीहि वर्षांचा काळ लोटला तरी आज पहांटे तुझ्या तोंडांतून बाहेर पडणारे भैरव रागाचे स्वर मी ऐकले त्या वेळेस माझ्या अंतःकरणाला जो अपूर्व आनंद झाला तो मी कधीं विसरणार नाहीं. माझ्यासाठीं ती भूपाळी पुन्हां एकदां म्हणतेस बेटी ? "

हंसानं मान हलविली. पण ती गप्पच राहिली. म्हणून हरिप्रसाद म्हणाले " म्हण बेटी, म्हण. " मग तिनं भूपाळी म्हणावयास प्रारंभ केला.

"उठि उठि रे वनमाळी
सरुनि निशा प्रभात झाली..."

गाणं ऐकतां ऐकतां हरिप्रसादांनीं डोळे मिटून घेतले होते. तें थांबल्यावर त्यांनीं डोळे उघडले. "तुझ्या गळयांत ईश्वरानं नाजुक तंत ठेवला आहे, बेटी ! " ते म्हणाले. "तुझी आठवण मी कधीं विसरणार नाहीं. तुझा गोड आवाज माझ्या कानांत नेहमीं घुमत राहील. मनाची तृप्ति होईपर्यंत तुझं गाणं ऐकण्याचं माझ्या नशिबांत नाहीं. पण योगायोगानं तें मला एकदां तरी ऐकायला मिळालं ही भाग्याची गोष्ट आहे. जा बेटी आतां घरीं. ईश्वर तुझं कल्याण करो. "

"ईश्वर ! " हंसा एकदम कडू चेहरा करून म्हणाली, "ईश्वरानं आतांपर्यंत तरीं माझं कल्याण केलेलं नाहीं. माझं कल्याण व्हावं अशी आपली इच्छा असेल तर ईश्वराचा हवाला मला देऊं नका. मी एक मागणं आपल्याजवळ मागतें तेवढं द्या. "

हरिप्रसाद म्हणाले, " काय वाटेल तें माग बेटी. माझ्या हातांत असेल तर मी तुला आनंदानं देईन. "

" आपल्या सतारीवर हात ठेवून म्हणा, देईन. "

" तशी शपथ घेऊनच बोलतों आहे असं समज. "

हंसानं क्षणभर त्यांच्याकडे रोखून पाहिलं, मग एकदम पुढें झुकून त्यांच्या पायाला स्पर्श करून ती म्हणाली, " मला आपल्याबरोबर घेऊन चला. मी तुरुंगांत खितपत पडलें आहे. त्यांतून मला सोडवा. "

हरिप्रसादांनीं पायावरचा तिचा हात उचलून आपल्या हातीं घेतला आणि म्हटलं, " हें काय बोलतेस तूं बेटी ? "

हंसा क्षणमात्र स्तब्ध राहिली. मग ती म्हणाली, " आपल्याला ठाऊक नाहीं, पण काल रात्रीं आपण या दिवाणखान्यांत एकटेच सतार छेडीत

बसला होता तेव्हां मी जिन्यांत येऊन लपून बसून चार घटका ऐकत राहिलें होतें. माझ्या जीवाला संगीताची भूक आहे हें मला लहानपणा-पासून माहीत आहे, पण ज्या संगीताची माझ्या जीवाला ओढ आहे त्या संगीताची आणि माझी आजपर्यंत भेट झाली नव्हती. ती काल झाली! माझ्या कष्टाच्या आयुष्यांत आजपर्यंत मी कशाची तरी वाट पहात होतें. पण कशाची तें मला नीटसं कळत नव्हतं. काल रात्रीं तें कळलं! माझ्या जिवाचा विसावा कुठें तरी आहे एवढंच मला ठाऊक होतं. तो विसावा कुठें अन् कसा शोधायचा त्याची मला कल्पना नव्हती. तो विसावा काल मला अचानक सांपडला! माझ्या कष्टाच्या जिण्याचा अंत झाला असं मला वाटलं. आणि आपण आतां मला बरोबर न घेतां जर गेलांत तर मला गवसलेला विसावा आणि आनंद नाहींसा होईल. माझं दरिद्री जिणं पुन्हां सुरू होईल. तें जिणं जगण्यासाठीं मला सोडून आपण जाणार काय?"

तिनं हनुवटी वर उचलून त्यांच्याकडे बघितलं. तिच्या डोळयांत आंसवं उभीं राहिलीं होतीं. ती कांहीं बोलत नव्हती तरी तिचे ओंठ थरथर कांपत होते. हरिप्रसादांनीं कांहीं तरी बोलावं अशा अपेक्षेनं थांबल्याप्रमाणें ती गप्प राहिली होती. परंतु तिच्या एकंदर बोलण्याचा नीटसा बोध न झाल्यामुळें ते स्तब्ध राहिले. कांहीं वेळानं ती पुन्हां बोलूं लागली. तिनं आपल्या आयुष्याचा इतिहास त्यांना थोडक्यांत सांगितला. तिची आई वारल्यापासून आणि तिच्या बापानं दुसरं लग्न केल्यापासून आयुष्याची कोणती तऱ्हा वांट्याला आली होती तिचं तिनं वर्णन केलं. तें करतांना तिनं आपले हुंदके आवरले, तरी एक दोन वेळां बोलणं बंद करून ती रडत राहिली! ती म्हणाली,

"अशा छळांत मी गेलीं आठ वर्षं काढलीं. यांतून माझी सुटका होणं शक्य नाहीं अशी माझ्या मनाची तयारी मी केली होती. पण काल रात्रीं

जिन्यांत लपून बसून आपली सतार ऐकतांना माझ्या जिवाला ज्याप्रमाणें संगीताचा आनंद मिळाला त्याप्रमाणें माझं सध्याचं जिणं संपविण्याचा मार्गहि मला दिसला. त्याच वेळेस मी मनाशीं ठरविलं कीं घर सोडून आपल्या बरोबर निघून जायचं. आणि आतां ईश्वराचा हवाला देऊन मला सोडून आपण जायचं म्हणतां. असं करूं नका. मला अंतर देऊं नका. आपले पाय मी कधीं सोडणार नाहीं."

ती पुन्हां पुढें झुकून त्यांच्या पायाला हात लावूं लागली तेव्हां त्यांनीं तिचे हात धरले. मनाशीं विचार करीत ते गप्प राहिले, आणि मग हलकेच म्हणाले, "बेटी, तूं म्हणतेस तें सारं माझ्या ध्यानांत आलं. पण तुझं मागणं मी पुरं कसं करूं ? जिला आईबाप नाहींत, घरदार नाहीं, अशी एखादी पोरकी मुलगी तूं असतीस तर तुला बरोबर घेऊन जाणं मला सोपं झालं असतं. पण तुझा बाप आहे—"

"बाप !" असा उद्‌गार काढून हंसानं आपला खालचा ओंठ दातांनीं दाबून धरला.

तिचा अभिप्राय ओळखून हरिप्रसाद म्हणाले, "कसाहि असला तरी तो तुझा बाप आहे. तुझ्यावर त्याची मालकी आहे. त्याच्या संमतिवांचून मी तुला आपल्याबरोबर कशी घेऊन जाऊं ?" ते क्षणमात्र गप्प राहिले आणि मग म्हणाले, "आपण असं करूं, मी तुझ्या बापाची भेट घेतों, तुमच्या मुलीला शिक्षणासाठीं माझ्या स्वाधीन करा, मी तिचा प्रेमानं प्रतिपाळ करीन असं त्यांना सांगतों. तुला बरोबर नेण्यास त्यांनीं परवानगी दिली—"

हंसा एकदम म्हणाली, "ते कधींच परवानगी देणार नाहींत. घरांतले सारे कष्ट उपसायला त्यांना आणि त्यांच्या बायकोला मी हक्काची मोलकरीण मिळालें आहे. अशी मोलकरीण हातची गमावायला ते कधींच तयार होणार नाहींत."

हरिप्रसाद किंचित् हंसले व म्हणाले, " मग काय तुझं म्हणणं बेटा, मी तुला पळवून बरोबर घेऊन जाऊं ? "

परंतु त्यांच्या विनोदानं हंसाला हंसूं आलं नाहीं. कारण जी गोष्ट करण्याबद्दल ती हरिप्रसादाची विनवणी करीत होती ती आपल्या जीवनमरणाचा प्रश्न आहे असं तिला वाटत होतं, आणि त्यामुळें तिच्या मनावर या क्षणीं गांभीर्याचं एवढं ओझं होतं कीं तिचं विनोदाकडे लक्ष जाणं शक्यच नव्हतं. ती म्हणाली,

" पळवून काय म्हणून ? मी आपण होऊन घर सोडून आपल्याबरोबर येतें ना ? "

हरिप्रसाद पुन्हां हंसले व म्हणाले, " तूं अजून बच्चा आहेस बेटी. तूं आपणहून आलीस तरी मी तुला पळवून नेलं असंच ठरेल. माझं ऐक. मी तुझ्या बापाची गांठ घेतों. त्याचं मन वळविण्याची पराकाष्ठा करतों—"

हंसा एकदम म्हणाली, " मग आपण माझ्या बापाची भेट न घेतलेली बरी. कारण मला माहित आहे, तो आपल्याशीं धड सभ्यपणानं बोलणार-सुद्धां नाहीं. आपला अपमान करील. तसं व्हायला नको. माझा बाप 'हो' म्हणेल हें कधींच शक्य नाहीं. अन् त्यांच्या संमतिवांचून मला घेऊन जायला आपण तयार नसाल तर माझं नशीब म्हणून मी स्वस्थ बसेन. आजपर्यंत दुःखांत पिचत राहिलें तशी पुढेंहि पिचत राहीन. जन्माला येऊन आपली सतार मी एकदां तरी ऐकली, एवढ्या विचारानंच मी स्वतःला धन्य समजेन. माझ्या जिवाला जी तृप्ति हवी आहे ती घटकाभरच मला मिळावी अशी ईश्वराची इच्छा होती असं मी समजेन. त्या तृप्तीच्या आठवणी जन्मभर काढीन... ईश्वर तुझं कल्याण करो असं म्हणूं नका. आपला स्वतःचा म्हणून मला आशीर्वाद द्या. " असं म्हणून तिनं त्यांच्या पायांवर डोकं ठेवलं.

ती निघून गेल्यावर हरिप्रसाद सुंद मनानं आपल्या जागीं स्वस्थ बसले. ज्या मुलीला संगीताच्या प्रेमाची आणि मधुर आवाजाची देणगी होती अशी ही मुलगी सावत्र आईच्या ताबेदारींत घरकाम करीत आयुष्य कंठणार हा विचार त्यांना फार दुःखाचा वाटत होता. त्यांची स्वतःची ईश्वरावर श्रद्धा होती. परंतु ईश्वराच्या न्यायाबद्दल मन साशंक करणारे अनेक प्रसंग पूर्वी त्यांच्या आयुष्यांत आले होते, तसलाच आतांचा प्रसंग होता. जिथें कुणीहि वास घेणार नाहीं अशा ठिकाणीं सुगंधी फुलं ईश्वरानं निर्माण केलेल्या या दुनियेंत कां फुलावींत ? जिथें संपत्तीच्या विनियोगाची इच्छा नाहीं अशा ठिकाणीं श्रीमंती कां असावी ? जिथें पोटभर खायला नाहीं अशा घरांत सुंदर सुंदर मुलाबाळांची गर्दी कां व्हावी ? जिचं आयुष्य संगीतापासून सर्वस्वी अलिप्त राहणार त्या हंसाच्या गळयांत अपूर्व माधुर्य ईश्वरानं कां ओतावं ?—ईश्वराचा न्याय विचित्र होता खास ! निदान मनुष्याच्या बुद्धीपलीकडचा तो होता ! या विचारांनीं आणि हंसाच्या बाबतींत आपण कांहीं एक करूं शकत नाहीं या जाणिवेनं ते अगदीं बेचैन होऊन गेले. जिचा आत्मा संगीतासाठीं भुकेला आहे, आणि जिच्या आयुष्याचं खरं सार्थक संगीताच्या उपासनेंतच होण्यासारखं आहे, तिची आपल्या बरोबर येण्याची इच्छा असूनहि आपण तिला नेऊं शकत नाहीं या गोष्टीचा त्यांना मनस्वी खेद वाटत होता. एका संगीतलुब्ध जीवाला रुक्ष आयुष्यांत कुजत सोडण्याचं पाप आपण करीत आहोंत असं त्यांना सारखं वाटत होतं....

सारी तयारी झाली, आणि तिन्हीसांजा उलटून गेल्यानंतर लालजी फौजदाराचा प्रेमानं निरोप घेऊन ते गाडींत चढले तरी त्यांच्या मनाचा विषाद कायमच होता...गाडी पुन्हां रिपेअर होऊन आल्याबरोबर सारं सामान गाडींत भरण्यांत आलं होतं. लालजी फौजदारांनीं मिठाईचे आणि फळांचे करंडे आणि ताज्या ताज्या गुलाबांच्या गेंदांचे भारे दिले, ते बुंदूनं

मागच्या सीटवर ठेवले होते. मागं बसायला जागा राहिली नव्हती म्हणून गाडींतल्या मधल्या बांकावर हरिप्रसादांसाठीं बैठक आणि गिरद्या त्यानं मांडल्या होत्या. तो स्वतः लक्ष्मण ड्रायव्हरजवळ बसणार होता. सारी व्यवस्था झाल्याची वर्दी आल्यावर हरिप्रसाद माडीवरून खालीं आले होते. गाडींत चढतां चढतां कांपाउंडच्या भिंतीपलीकडच्या घराकडे त्यांनीं नजर टाकली. 'ईश्वर तुझं कल्याण करो बेटा ' असा मनोमय आशीर्वाद त्यांनीं हंसाला दिला. ते गाडींत चढले व आपल्या जागीं बसले. गाडीचीं दारं बंद झालीं. लालजी फौजदारानं पुन्हां एकदां 'नमस्ते' 'केलं. बुंदूनं त्यांचे फार आभार मानले. मिठाईचे आणि फळांचे करंडे त्यांनीं दिले म्हणून तो त्यांच्यावर अगदीं खूष होता. गाडी चालू होण्यापूर्वीं हरिप्रसादांनीं बुंदूला विचारलं, "अरे, नबाबांना तार केली ना?" लालजी फौजदारांनीं उत्तर दिलं, "सकाळींच तार धाडली. आपण जाऊन दाखल व्हाल तों मंडळी आपली वाटच पहात असतील." हरिप्रसाद म्हणाले, "ठीक आहे"...गाडी सुरू झाली, फाटकाबाहेर पडली, शेजारच्या घरापुढून जाऊं लागली. हरिप्रसादांनीं खिडकींतून डोकावून पाहिलं. हंसा कदाचित् आपल्या नजरेस पडेल अशी त्यांच्या मनाला आशा वाटली. पण ती त्यांना दिसली नाहीं...गाडी पुढें सरकली. 'ईश्वर तुझं कल्याण करो बेटा' एखादा मंत्र म्हटल्याप्रमाणें हरिप्रसाद पुन्हां एकदां स्वतःशीं पुटपुटले. मग त्यांनीं डोळे मिटून घेतले. बुंदूचं आणि लक्ष्मणचं बोलणं त्यांना ऐकूं येत होतं...

"आपण आतां केव्हां पोंचूं धारागडला ?"

"आतां किती वाजले ?"

"आठ वाजले असतील."

"मग साडेनवापर्यंत जातों आपण."

जेवायला कांहीं फारसा उशीर होणार नाहीं असा विचार बुंदूच्या मनांत आला आणि तो म्हणाला, " मग कांहीं हरकत नाहीं. तरी पण फास्ट जाऊं दे. "

" फास्ट कशाला ? परवांसारखा अपघात झाला म्हणजे ? "

यानंतरचं त्यांचं बोलणं हरिप्रसादांनीं ऐकलं नाहीं. ते स्वरचिंतनांत गुंग झाले. ते स्वरचिंतन करूं लागले कीं झोपीं गेलेल्या माणसाला बाहेरच्या जगाचा पडत असेल त्यापेक्षांहि अधिक विसर त्यांना पडत असे. आपण प्रवास करीत आहोंत, गाडींत बसलों आहोंत, आपल्याबरोबर कुणी माणस आहेत, आपल्याला अमुक ठिकाणीं जायचं आहे, यांपैकीं कसलीच जाणीव त्यांना उरली नाहीं. स्वरचिंतन करतां करतां अनंताशीं एकरूप होण्याची संवय त्यांना झाली होती...

बुंदू त्यांना खालीं उतरायला सांगत होता. त्यांनीं डोळे उघडून पाहिलं तों गाडीजवळ नबाब उभे होते. पांच सहा दरबारी माणसांचा परिवार थोड्या अंतरावर उभा होता. आपण मुक्कामाला येऊन पोंचलों हें त्यांनीं ओळखलं. ते गाडीखालीं उतरले. आणि नबाबांचे दोन्ही हात त्यांनीं प्रेमानं आपल्या हातीं घेतले. नबाबांनीं विचारलं, " आज प्रवासांत तकलीफ नाहीं ना झाली ? " ते म्हणाले, " बिलकुल नाहीं. " मग नबाबांच्या बरोबर ते चालूं लागले. गाडींतली सतार आणि बाकी काय सामान असेल तें काढण्याची व्यवस्था नेहमींप्रमाणें बुंदू करील अशी त्यांची खात्री होती.

नबाबांनीं त्यांना त्यांच्यासाठीं तयार ठेवलेल्या दालनांत नेलं. " आपण आतां थोडी विश्रांति घ्या. मी एक अर्ध्या तासानं पुन्हां आपल्या भेटीला येतों. " असं म्हणून नबाबांनीं त्यांचा निरोप घेतला. हरिप्रसाद एका कोचावर बसले. एक नोकर पुढें आला आणि अदबीनं विचारूं लागला, " चहा घेणार ना आपण ? "

हरिप्रसाद म्हणाले, " हां, घेऊं या थोडासा. "

तो नोकर लगबगीनं निघून गेला. इतर तीन चार नोकर दूर भिंतीपाशीं उभे राहिले.

तितक्यांत बुंदू धांवत आला आणि म्हणाला, " कधीं पाहिला नाहीं असा चमत्कार झाला आहे. "

हरिप्रसादांनीं विचारलं, " काय, म्हणतोस काय ? "

" आपल्या गाडींत एक तरुण मुलगी आहे. "

" म्हणजे ? "

" मागच्या सीटवर ठेवलेले फळांचे आणि मिठाईचे करंडे मी काढूं लागलों आणि पहातों तों त्या करंड्यावर पसरलेल्या गालिच्याखालीं एक तरुण मुलगी अंग दुमडून पडलेली ! "

" कोण मुलगी ? "

" घेऊन येतों तिला. आपण पहा. मला एकदम हा मोठा चमत्कार वाटला आणि आपल्याला सांगायला आलों. "

" जा, घेऊन ये तिला इकडे. "

बुंदू गेला.

हरिप्रसादांनीं मनाशीं थोडासा तर्क केलाच होता. आणि थोड्या वेळानं बुंदू जेव्हां परत आला तेव्हां त्याच्याबरोबर आलेल्या त्या तरुण मुलीकडे पाहातांच आपण केलेला तर्क बरोबर होता हें त्यांच्या लक्षांत आलं. ती जवळ आली व एकदम त्यांचे पाय धरून म्हणाली, " आपली क्षमा मागतें. "

हरिप्रसाद म्हणाले, " बेटी, हें काय केलंस ? "

ती म्हणाली, " हें केलं नसतं तर मी जिवंतच राहिलें नसतें असं मला वाटलं म्हणून हें साहस केलं. तिन्हीसांजा आपली गाडी तयार होऊन

बंगल्याच्या आंगणांत आलेली मीं पाहिली. आपण आतां जाणार या कल्पनेचं मला मरणप्राय दुःख झालं. आपण गेलांत कीं माझ्या आयुष्यांत एकदां अकस्मात् आलेला संगीताचा आनंद कायमचाच जाणार ही कल्पना मला सहन करवेना. मी घरांतून बाहेर पडलें. गाडीजवळ आलें. सुदैवानं तिथें कुणी नव्हतं. मी गाडींत चढलें. मागच्या सीटवर खूपसे करंडे ठेवले होते आणि त्यांवर गालिचा हंथरला होता. मी त्या गालिच्याखालीं शिरलें आणि लपून पडून राहिलें..."

तिची ती हकीगत ऐकून हरिप्रसादांच्या तोंडावर हास्य दिसलं. पण लगेच कांहींशा गांभीर्यानं ते म्हणाले, "बेटी हें काय केलंस ?"

ती म्हणाली, "केलं खरं. आतां आपल्या पायांजवळ आलें आहे. तारा किंवा मारा !"

"मारीन कसा ?" असं म्हणून हरिप्रसादांनीं तिच्याकडे पाहिलं. आणि नंतर एकदम तिला जवळ ओढून ते म्हणाले, "ये बेटी, बैस. तूं माझ्याकडे यावंस आणि रहावंस असंच ईश्वरी सूत्र असेल. तुझ्यावर मी रागावलों आहे असं समजूं नकोस. या क्षणापासून तुला मी माझी म्हटलं असं समज. संगीताच्या उपासनेसाठीं तूं जन्माला आली आहेस यांत शंकाच नाहीं. त्या उपासनेच्या आड कोणी येऊं शकत नाहीं. आजपासून विद्या हेंच तुझं दैवत समज. तुझं कल्याण होईल." त्यांनीं तिच्या मस्तकावरून हात फिरविला.

तो विचित्र प्रसंग पहात बुंदू, लक्ष्मण आणि नबाबांचे नोकर आपापल्या जागीं चकित होऊन उभे राहिले !

# प्रकरण तिसरें

चंबल संस्थानची राजधानी म्हणजे एक लहानसं परंतु अतिशय देखणं शहर होतं. एका दिशेला छोटया छोटया पहाडांतून गेलेला जवळ जवळ तीन शतकांपूर्वी बनविलेल्या घाटाचा रस्ता, एका दिशेला मैल न् मैल पसरलेलं घनदाट जंगल, तिसऱ्या बाजूस दोन पवित्र नद्यांचा संगम, आणि चौथ्या बाजूस कांहींशा उंचसखल जमिनीवर वसलेली छोटी छोटी गांवं आणि त्यांच्या मधून मोठ्या शहराकडे जाणारी सडक. अशा चतुःसीमांनीं चंबल निसर्गतःच नटलेलं होतं; आणि त्याच्या नैसर्गिक सौंदर्यांत चंबलच्या सिंहासनावर बसलेल्या राजपुरुषांच्या चार पांच पिढ्यांनीं भर घातली होती...या राजांपैकीं कुणी कमी कुणी अधिक रसिक होते, कुणाला या तर कुणाला त्या षोकाचं वेड होतं, परंतु या राजपुरुषांच्या रक्तांत रसिकता होती खास; आणि ज्यानं त्यानं आपापल्या षोकाप्रमाणें

आणि लहरीप्रमाणें चंबल नगरी नटवून सजवून अधिक सुंदर करण्याची खटपट केली होती. षोकाचे इतर विषय पिढीपिढीबरोबर बदलत गेले होते तरी दोन विषयांचा मात्र चंबलच्या साऱ्याच राजांनीं षोक केला होता. हे दोन विषय म्हणजे संगीत, आणि मल्लविद्या! चंबलच्या गादीचा पहिला संस्थापक राजा मोठा बहादर वीर पुरुष होता आणि तो निष्णात तंतकारहि होता. रणांगणावर ज्या कौशल्यानं त्याच्या हातांत समशेर खेळत असे, त्याच कौशल्यानं त्याच्या हातांत बीनासारखं वाद्यहि अनोख्या रागिणींचा विलास करीत असे. समरभूमीवर जितक्या सफाईनं त्याचा हात नररुंडमाला आकाशांत उडवित असे तितक्याच सफाईनं आणि लीलेनं त्याचा हात बीनांतून श्रुतिमनोहर स्वरमाला काढीत असे. या संस्थापक राजाच्या मागून जे राजे चंबलच्या गादीवर आले त्यांनीं आपापल्या आवडीप्रमाणें ज्योतिष, मृगया, अश्वविद्या, असे अनेक षोक केले. परंतु संगीत आणि मल्लविद्या यांची जोपासना करण्याकडे त्यांनीं कधींच दुर्लक्ष केलं नाहीं. संगीताची आणि मल्लविद्येची परंपरा चंबल संस्थानांत अव्याहत चालूं राहिली. आणि या राजांनीं चांगले चांगले तंतकार, गवये आणि नर्तक तर पदरीं ठेवलेच, नामांकित कुस्तीगीरहि बाळगलेच, पण शिवाय दोन्ही विद्यांत स्वतःची थोडी फार गति असावी अशी हौसहि त्यांनीं बाळगली, आणि या दोन्ही विद्यांतले जाणते रसिक राजपुरुष म्हणून लौकिक संभाळला...हल्लीं गादीवर असलेले राजे समशेर बहाद्दर सेना खासखेल शामराजे हे स्वतः सतार वाजविण्यांत निपुण होते. आणि म्हणूनच त्यांनीं हरिप्रसादांना मोठ्या इतमामनं आपल्या दरबारांत ठेवून घेतलं होतं.

चंबलच्या राजांच्या संगीताच्या आणि कुस्तीच्या षोकामुळें इतर कोणत्या राजधानींत क्वचितच आढळणाऱ्या अशा दोन गोष्टी चंबलमध्यें होत्या. एक अतिशय मोठं भव्य थिएटर, आणि दुसरी गोष्ट म्हणजे

कुस्तीचं मैदान! दूरदूरचे नामांकित गवई, तंतकार आणि नर्तक नर्तकी चंबलच्या राजांपुढें हजेरी देण्यासाठीं मुद्दाम येत असत; आणि हे कलावंत आले कीं खास राजांसाठीं त्यांचा मुजरा राजवाड्यावर होत असे, पण तो झाल्यावर मुद्दाम साऱ्या नागरिकांसाठीं त्यांचा एक कार्यक्रम थिएटरमध्यें होत असे. चंबलच्या राजांकडून मिळणारी बिदागी फारशी मोठी नसे, कारण चंबल हें बोलून चालून दुसऱ्या प्रतीचं एक लहानसं संस्थान होतं. परंतु एक तर चंबलचे राजे म्हणजे एक जाणकार रसिक आहेत याची कलावंतांना ओळख असे, व अशा राजांची वाहवा त्यांच्याकडून मिळणाऱ्या बिदागीपेक्षां त्यांना अधिक मोलाची वाटत असे; आणि शिवाय पहिल्या प्रतीचं गायनवादन पिढ्या न् पिढ्या ऐकून त्या संस्कारांनीं तयार झालेल्या चंबलच्या जनतेच्या ठिकाणींदेखील मोठी मार्मिक रसिकता आलेली आहे ही गोष्ट कलावंतांना माहीत झालेली होती, आणि या जनतेपुढें चंबलच्या भव्य 'राजविलास' थिएटरांत आपली कला दाखवण्याची त्यांना हौस वाटत असे. मी चंबलला जाऊन आलो असं सांगण्यांत कलावंतांना एक प्रकारचं भूषण वाटत असे; आणि चंबलच्या आठवणी लोकांना सांगतांना ही मंडळीं 'राजविलास' थिएटरचं आणि त्याला जोडूनच असलेल्या कुस्तीच्या मैदानाचं मोठ्या उत्साहानं वर्णन करीत असत.

'राजविलास' थिएटर म्हणजे खरोखरच एक अतिशय भव्य आणि पाहण्यासारखी इमारत होती; आणि या थिएटरांत किंवा लगतच्या कुस्तीच्या मैदानांत खास राजांच्या आज्ञेवरून एखादा कार्यक्रम असला कीं त्या विस्तीर्ण प्रांगणाला मोठं वैभवशाली स्वरूप येत असे. आज या स्थानाला तसं स्वरूप आलं होतं. कारण हरिप्रसादांनीं चार वर्षे सतत मेहनत करून तयार केलेल्या एका नव्या नर्तिकेचा नृत्यप्रयोग या ठिकाणीं व्हायचा होता...

नृत्यप्रयोग रात्रीं दहा वाजतां सुरू होणार होता. परंतु संध्याकाळपासूनच

कुस्तीचं भव्य मैदान शृंगारून सज्ज करण्यांत आलं होतं. हा नृत्यप्रयोग थिएटरांत न करतां मैदानांत व्हावयाचा होता. थिएटरची बांधणी अशी होती कीं त्याची मागची बाजू मैदानांत कार्यक्रम होण्याच्या वेळेस रंगभूमि म्हणून वापरतां यावी. मोठमोठ्या मल्लांच्या कुस्त्या मैदानांत होत त्या वेळेस या उंच प्रशस्त रंगभूमीवर राजघराण्यांतली मंडळी आणि निवडक दरबारी लोक बसत असत, आणि वर्तुळाकार मैदानाच्या हिरव्यागार गवतानं झांकलेल्या चहुबाजूंच्या उतरणीवर तीस तीस चाळीस चाळीस हजार प्रेक्षक सहज बसत असत. आजच्या नृत्याच्या कार्यक्रमासाठीं ही व्यवस्था अर्थातच बदलण्यांत आली होती. रंगभूमीवर हरिप्रसादांच्या नव्या शिष्येचं नृत्य होणार होतं. रंगभूमीपासून थोड्याच अंतरावर असलेल्या प्रत्यक्ष मल्लयुद्धाच्या आखाड्यांत अर्धवर्तुलाकृति रांगा बनवून सुंदर सुंदर कोच, खुर्च्या अशी बैठक खाशा स्वाऱ्यांसाठीं आणि निवडक निमंत्रितां-साठीं घातलेली होती. सामान्य लोक नेहमींप्रमाणें चौफेर उतरत्या हिरवळीवर बसणार होते. कुस्तीच्या खड्डयांत निदान तीनशें जागा असल्या पाहिजेत असा खाजगी कारभाऱ्यांना हुकूम झाला होता. कारण हरिप्रसादांनीं तयार केलेल्या शिष्येचा हा पहिला जाहीर मुजरा पाहण्यासाठीं राजेसाहेबांनीं आपल्या विशेष मैत्रींतले जवळचे दूरचे संस्थानिक आणि धनिक बोलावले होते. ही सारी बडी बडी मंडळी चंबलमध्यें एक दोन दिवस मुक्काम करण्यासाठींच येणार होती, व त्यामुळें राजघराण्यांत एखाद्या लग्नाचा समारंभ निघाला कीं त्यासाठीं येणाऱ्या पाहुण्यांची सरफराई ठेवण्यासाठीं दरबारी नोकरांची जशी धांदल उडून जात असे तशीच आजहि उडाली होती. आणि या पाहुण्यांच्या तोंडीं एकच विषय होता. हरिप्रसादांनीं चार वर्षं सतत मेहनत घेऊन तयार केलेली ही रंभा नांवाची शिष्या कोण ? आणि तिचा पहिला मुजरा एवढ्या इतमामानं स्वतः राजे साहेबांनीं करावा इतकी ही रंभा नृत्यविद्येंत खरोखर प्रवीण झालेली आहे काय ?...

या प्रश्नांची चर्चा फक्त आजच्या कार्यक्रमासाठीं मुद्दाम आलेल्या पाहुण्यांतच चालली होती असं नव्हे, चंबलच्या नागरिकांतहि ती घरोघर चालली होती. कारण त्यांनींहि आजपर्यंत हरिप्रसादांची ही नवी शिष्या प्रत्यक्ष डोळयांनीं कधीं पाहिली नव्हती. गेल्या तीन चार वर्षांत त्यांनीं फक्त बातम्या ऐकल्या होत्या कीं हरिप्रसाद एका तरुण मुलीला नृत्य शिकवीत आहेत. ती मुलगी कोण, कुठून आली, हरिप्रसादांकडे शिकण्या-साठीं केव्हां राहिली, इत्यादि गोष्टींबद्दल लोकांत नाना प्रकारचे तर्क प्रचलित होते. परंतु एकमेकांशीं ज्यांचा मेळ नव्हता असे हे तर्क लोकांत होते याचं कारण असं कीं खरा प्रकार कुणालाच निश्चित माहित नव्हता. हरिप्रसाद एका मुलीला शिकवीत आहेत ही गोष्ट लोकांना हळूं हळूं प्रथम समजली याचं तरी कारण असं कीं हरिप्रसाद बाहेरगांवचीं आमंत्रणं स्वीकारीनासे झाले. पूर्वीं नवरात्राचा उत्सव सोडला तर हरिप्रसाद चंबलमध्यें फार थोडे टिकायचे. बाहेरगांवच्या आमंत्रणावरून ते नेहमीं चंबलबाहेर असायचे. परंतु धारागडच्या नबाबांकडची बैठक आटपून आल्यापासून हरिप्रसाद कोठेंहि बाहेर जाईनासे झाल्याचं लोकांना हलके हलके समजलं. देवीच्या देवळांतली रोज सकाळची खेप वगळली तर ते चंबलच्या शहरांतहि लोकांना कुठें दिसेनासे झाले. त्यांच्या बंगल्यावर जाऊन त्यांची भेट कुणी मागितली तर ती होईनाशी झाली. लोकांना आश्चर्य वाटूं लागलं कीं हा काय प्रकार आहे ? आणि मग हळूं हळूं त्यांना समजलं कीं एका नव्या शिष्येला शिकविण्यासाठीं हरिप्रसादांनीं बाकीच्या सर्व गोष्टी सोडून दिल्या आहेत. हरिप्रसादांची ही नवी शिष्या दिसायला कशी आहे, तिची तालीम कशी काय चालली आहे, इत्यादि गोष्टींबद्दल लोकांत साहजिकपणें कुतुहूल होतं, आणि या कुतूहलाचं समाधान करून घेण्यासाठीं चौकस माणसं परोपरीचे प्रयत्नहि करीत असत. तथापि कुणालाच कोणतीही गोष्ट निश्चितपणें कळली नव्हती. हरिप्रसादांच्या नव्या शिष्येभोंवतीं आणि

तिच्या शिक्षणाभोंवतीं अगदीं कमालीच्या गुप्ततेचा पडदा टाकण्यांत आला होता...कारण हरिप्रसादांची स्वतःची इच्छा अशी होती, आणि ती खुद्द राजेसाहेबांनाहि वाजवी वाटली होती, कीं आपली शिष्या आपल्या मनाजोगी तयार होईपर्यंत कुणालाहि दिसतां कामा नये. ज्या दिवशीं जाहीर मुजरा करण्याइतपत तिची तयारी झाली असं आपल्याला वाटेल त्या दिवशींच ती जगाच्या नजरेस पडली पाहिजे, आणि तिला पाहून जगानं स्तिमित झालं पाहिजे. हरिप्रसादांची ही मनीषा राजेसाहेबांना इतकी योग्य वाटली होती कीं गेल्या चार वर्षांत रंभाची तालीम पाहण्याची इच्छा त्यांनीं एकदांदेखील दाखविली नव्हती. ते फक्त कधीं कधीं हरिप्रसादांना विचारीत, " काय, कसं चाललंय ? "

हरिप्रसाद म्हणावयाचे, " उत्तम चाललंय सरकार, "

राजेसाहेब हळूंच हंसून विचारीत, " रंभेला गोषांतून बाहेर केव्हां काढणार ? "

हरिप्रसाद म्हणत, " अजून अवकाश आहे. "

" किती ? "

" तें सांगता येणार नाहीं सरकार. मनाजोगी तयारी झालेली मला ज्या दिवशीं दिसेल त्या दिवशीं मी आपण होऊन येईन आणि सरकारांना विनंति करीन, एकदां येऊन पहावं म्हणून. "

राजे म्हणत, " मी एकटा पाहणार नाहीं. साऱ्या दुनियेनं तुमच्या शिष्येचा पराक्रम पाहून तोंडांत बोटं घालावींत अशी माझी इच्छा आहे. आणि त्यासाठीं चंबलला कधीं झाला नाहीं असा समारंभ मी करणार आहे. "

हरिप्रसाद हात जोडून म्हणत, " आपली मेहरबानी सरकार. "

अशा प्रकारचं भाषण राजेसाहेब आणि हरिप्रसाद यांच्यामध्यें कित्येकदां होत असे. परंतु हवी ती वेळ आल्याखेरीज आपल्या शिष्येचं नृत्य कुणालाहि दाखवायचं नाहीं, या हरिप्रसादांच्या इच्छेचा मान राजेसाहेबांनीं कसोशीनं राखला होता. ज्या गुप्ततेचा पडदा हरिप्रसादांनीं आपल्या नव्या शिष्येभोंवतीं टाकला होता ती गुप्तता कटाक्षानं राखण्याच्या बाबतींत राजेसाहेबांनीं शक्य तें सहाय्यच दिलं होतं. गेल्या चार वर्षांत शहराच्या सीमेवरचा हरिप्रसादांचा बंगला म्हणजे लोकांना एक रहस्यमय ठिकाण वाटूं लागलं होतं. त्या बंगल्याभोंवती अष्टौप्रहर पहारादेखील असे. या पहाऱ्याबद्दल राजेसाहेबांना कुणी विचारलं तर ते सांगत, " हरिप्रसादांना एक गुप्त धन सांपडलं आहे. तें इतक्या मोलाचं आहे कीं जगाच्या दृष्टीला तें पडूं नये असं त्यांना वाटतं."

हे उद्‌गार स्वतः हरिप्रसादांनीं राजेसाहेबांजवळ काढले होते, म्हणून राजेसाहेब इतरांना ते सांगत. खरोखरीच हंसाविषयीं हरिप्रसादांची अशीच भावना होती कीं, ईश्वराच्या कृपेनं हें एक गुप्त धन माझ्या हातीं आलेलं आहे...ते मनाशीं विचार करीत, प्रथम पखवाज वाजविण्याबद्दल आणि नंतर सतार वाजविण्याबद्दल मी एवढी कीर्ति मिळविली, परंतु माझ्या पश्चात् माझं नांव लोकांनीं घ्यावं असं कांहीं तरी मागं ठेवून जाण्याची माझी इच्छा होती ती या मुलीमुळें मला पूर्ण करून घेतां येणार आहे. संगीताची दुनिया हिनं जिंकावी, आणि लोकांना म्हणावं, ' ही हरिप्रसादांची शिष्या ', असं झालं तर मी हयातींत मिळविलेली कीर्ति माझ्या पश्चात्‌हि कायम राहील. मी एक प्रकारें अमर होईन...अमरत्व मिळविण्याचं एक साधन, संगीत कलेची जी उपासना आपण केली ती आपल्या मृत्यूनंतरहि पुढें सतत चालविण्याचं आणि आपल्या नांवाच्या आठवणीलादेखील मुजरा करायला लावून मृत्यूवर विजय मिळविण्याचं एक साधन या दृष्टीनं ते हंसाकडे पहात. त्यांना ती पहिल्यापासून एखाद्या गुप्त

धनासारखी वाटली, प्रिय झाली, आणि आपल्याला अवगत असलेली सारी विद्या तिला देऊन तिला मोठी करणं हें एकच ध्येय त्यांनीं मनाशीं ठेवलं...

तिच्याविषयींच्या त्यांच्या या विचारांची हंसाला प्रथम कांहीं दिवस मुळींच कल्पना नव्हती. तिनं साहस करून त्यांचा आश्रय घेतला होता तो केवळ बापाच्या घरांतल्या जाचांतून स्वतःची सुटका करून घेण्यासाठीं, आणि संगीताची भूक भागविण्यासाठीं. निसर्गानं तिला कंठमाधुर्याची जी देणगी दिली होती तिचा मोठेपणा तिला कळत नव्हता, आणि संगीताची उपासना करण्याची आपली विशेष पात्रता आहे याची जाणीवहि तिला नव्हती. त्या बाबतींतल्या महत्त्वाकांक्षेचा तर तिच्या मुग्ध अंतःकरणाला वासदेखील कधीं लागलेला नव्हता. यामुळें हरिप्रसादांकडे ती येऊन राहिल्यावर त्यांची सेवा करणं आणि त्यांचं वाजविणं पोटभर ऐकणं या दोन गोष्टींच्या आनंदांतच ती सर्वस्वी रमून गेली. या आनंदापुढें स्वर्ग तुच्छ होता. या आनंदापलीकडे तिला कांहीं नको होतं. हा आनंद कधीं संपूं नये येवढंच तिचं देवाजवळ आतां मागणं उरलं होतं.

पण एके दिवशीं हरिप्रसाद तिला म्हणाले, " बेटा, तूं मजेंत आहेस ना ? "

ती म्हणाली, " हा काय प्रश्न ? आपला सहवास मला मिळाला. माझ्या आयुष्याचं सार्थक झालं ! "

त्यांनीं मान हालविली. ते म्हणाले, " नाहीं बेटा. तुझ्या आयुष्याचं सार्थक इतकं मामुली नाहीं. फार मोठी कामगिरी तुझ्या हातून व्हायला हवी. " त्यांचा आशय न समजल्याप्रमाणें तिनं त्यांच्याकडे पाहिलं. तेव्हां ते म्हणाले, " माझ्या आयुष्याचं सार्थक करण्याची जबाबदारी पार पाडायला हवीस तूं ! "

" मी ? "

" होय. तूं ! " असं म्हणून त्यांनीं तिच्याकडे हंसत पाहिलं, आणि क्षणमात्र स्तब्ध राहून ते पुढें म्हणाले, " स्वतःविषयीं काय कल्पना आहे तुझी ? "

" आपली चाकरी करण्याचं व आपल्या प्रेमळ छत्राखालीं राहण्याचं भाग्य जिला मिळालं आहे अशी एक सामान्य मुलगी—"

हरिप्रसादांनीं मान हालविली. " तूं सामान्य नाहींस बेटी " ते म्हणाले, " निदान सामान्यच राहण्यासाठीं तुझा जन्म नाहीं ! तूं असामान्यत्व मिळवावसं म्हणूनच ईश्वरानं तुला माझ्याकडे आणून सोडलं ! मी तुला असामान्यत्व मिळवून देईन. तूं मोठी झालेली मी पाहणार आहे. दुनियेनं तुझ्यावर प्रशंसेची फुलं उधळलेलीं मी पाहणार आहे. हें एक माझं स्वप्न आहे. तें साकार करणं तुझ्या हातांत आहे. "

त्या दिवसापासून हंसाचं शिक्षण सुरू झालं होतं.

गायनाचं नव्हे नृत्याचं !

हंसाच्या कंठमाधुर्यानं हरिप्रसाद प्रथम तिच्याकडे आकर्षित झाले होते. तिला गायनाचं शिक्षण दिलं तर ती अलौकिक गायिका होईल हें त्यांना कळत होतं. पण हंसाची जी मूर्ति घडविण्याची महत्त्वाकांक्षा त्यांच्या मनांत उद्भवली होती ती गायिकेची नव्हती. नर्तिकेची होती. हरिप्रसादांनीं तयार केलेली शिष्या म्हणून जिला संगीताच्या दुनियेंत मानाच्या सिंहासनावर बसलेली त्यांना पहावयाची होती ती गायिका नव्हे तर नर्तिका असावयास हवी होती. कारण ती नर्तिका असेल तरच त्यांचा एक अपमान भरून निघणार होता, त्यांची एक प्रतिज्ञा पूर्ण होणार होती. ज्या प्रसंगीं त्यांचा तो अपमान झाला होता, व त्यांनीं ती प्रतिज्ञा केली होती, तो प्रसंग गेलीं पांच वर्षे त्यांच्या अंतःकरणांत सलत राहिला होता... मानपूरच्या महाराजांच्या दरबारांत होळीच्या उत्सवांत तो प्रसंग घडला

होता. महाराजांच्या प्यारेलाल नांवाच्या नामांकित कथ्थकाची रेहना नांवाची शिष्या नाचत होती. लोक वाहवा देत होते. महाराज व त्यांचा परिवारहि खूष होता. हरिप्रसाद निर्विकार मुद्रेनं गप्प बसले होते. प्यारेलाल कसबी विद्वान होता, पण स्वभावानं खवचट होता. त्यानं महाराजांकडे वळून सवाल टाकला.

"महाराज, माझ्या रेहनाचं नृत्य सगळ्यांना पसंत आहे, पण राजे शामराज यांच्या दरबारचे नामदार तंतकार कां असे शुक्राचार्यांसारखे बसले आहेत ? आपण विचारावं तरी—"

प्यारेलालनं नुसत्या हरिप्रसादांच्याच नव्हे तर शामराजांच्याहि रसिकतेला टोला दिलेला पाहून महाराजांना गुदगुल्या झाल्या. त्यांनीं हरिप्रसादांना विचारलं, "क्यूं प्रसादजी, रेहनाचं नृत्य आपल्या पसंतीला उतरलं नाहीं काय ?"

हरिप्रसाद म्हणाले, "सरकार, मुजरा आपल्यापुढें चालला आहे. माझ्यापुढें नाहीं. तो आपल्या पसंतीला उतरला म्हणजे झालं."

हरिप्रसादांच्या उत्तरांतली खोंच महाराजांना कळल्यावांचून राहिली नाहीं. पण ती त्यांना आवडली. त्यांनीं हंसून विचारलं, "तरी पण आपला अभिप्राय आपण मला सांगा ना ?"

हरिप्रसाद म्हणाले, "महाराज, माझा अभिप्राय आपल्याला आवडणार नाहीं. प्यारेलालना तर मुळींच आवडणार नाहीं. माझ्या गुरूनीं मला असं सांगितलं आहे कीं मैफलींत अप्रिय बोलूं नये."

"माझं कुतूहल आपण वाढवीत आहांत. आपण स्पष्ट काय तें बोलावं अशी माझी इच्छा आहे."

हरिप्रसाद म्हणाले, "महाराज, आपली इच्छा मला मानली पाहिजे. मला असं विचारायचं आहे कीं ही रेहना कोणता ताल नाचते आहे."

महाराजांनीं प्यारेलालकडे पाहिलं तेव्हां तो म्हणाला, " आडा चौताला नाचते आहे ती."

हरिप्रसाद म्हणाले, " पहा महाराज. आडा चौतालाच्या चौदा मात्रा आहेत. आणि ही रेहना सोळा मात्रांचे तोडे घेऊन राहिली आहे. तबल्याच्या संगतीनं हिचा नाच चाललेला नाहीं हिच्या संगतीनं तबला वाजतो आहे. याला नाच म्हणत नाहींत सरकार. नाचाची थट्टा चालली आहे ही. "

प्यारेलाल एकदम उसळून म्हणाला, "महाराज, मला असं विचारायचं आहे कीं शामराजांचे आश्रित हे हरिप्रसाद नृत्यांतले दर्दी केव्हांपासून झाले ? यांचे आजोबा बडे पखवाजी होते. यांचे बापहि पखवाजी होते. यांनीं तर पखवाज सोडून आतां हातांत सतार घेतली आहे. नृत्यावर अभिप्राय द्यायचा यांना काय अधिकार आहे ? हे स्वतः कधीं नृत्याचा मुजरा करायला उभे राहिले आहेत ? माझ्याबरोबर मुजरा करायला उभं राहण्याची यांची छाती आहे ? किंवा यांनीं कुणाला कधीं नाच शिकविला आहे ? "

हरिप्रसाद म्हणाले, " हें पहा प्यारेलाल, पखवाज म्हणजे नृत्यकलेचा बाप आहे. तूं मोठा कसबी कथ्थक असशील. परंतु लय आणि ताल यांच्या बाबतींत माझ्या आसपासदेखील येण्याची तुझी लायकी नाहीं. शिवाय माझ्या आईचे वडील एक अजोड कथ्थक होऊन गेले हेंहि तुला माहीत आहे. माझा मामेभाऊ कृष्णलाल नामदार कथ्थक आहे हेंहि तुला माहीत आहे. नृत्य मी शिकलों नाहीं. पण मनांत आणीन तर तुझ्यासारखे दहा कथ्थक मी निर्माण करीन. नृत्य म्हणजे कांहीं नुसती पावलांची तयारी नाहीं. लय आणि ताल ज्या पावलांना सांभाळतां येत नाहीं ते कितीहि तयार असले तरी त्यांनीं नाचाच्या मुजऱ्याला उभं राहूं नये. या पोरीला तूं नाच शिकविला नाहींस, डोंबाऱ्याची कसरत शिकवली आहेस."

प्यारेलाल म्हणाला, " अरे, नृत्यविद्येंत तुला काय कळतंय ? तूं नुसतं सतारीवर दिडदा दिडदा कर."

हें ऐकतांच सारी सभा मोठ्यांदा हंसली. स्वतः महाराजहि थोडेसे हसले. तें हंसणं हरिप्रसादांच्या जिव्हारीं लागलं. ते उठले आणि म्हणाले, " महाराज, ज्या सभेंत एक कलावंत दुसऱ्याचा असा अपमान करूं शकतो त्या सभेंत अधिक बसण्याची माझी इच्छा नाहीं." ते उठून जाऊं लागले.

महाराजांनीं चटकन् आसनावरून खालीं उतरून त्यांचे हात धरले व ते म्हणाले, " आपण जाऊं नका. बसा. आपला जो अपमान झाला त्याबद्दल मी—"

हरिप्रसाद म्हणाले, " नाहीं महाराज, आतां मी या सभेंत बसणार नाहीं. आणि पुन्हां आपल्या दरबारच्या होळीच्या उत्सवांत येईन तो नृत्यशिक्षक म्हणून माझी योग्यता सिद्ध करण्यासाठींच येईन. खरं नृत्य कसं असतं तें आपल्याला दाखवायसाठींच येईन. तोंपर्यंत आपला दरबार वर्ज्य समजणं हेंच प्यारेलालनं माझा जो अपमान केला त्याला साजेसं उत्तर आहे."

असं म्हणून हरिप्रसाद दरबारांतून उठून आले होते !...

या प्रसंगाचं शल्य हरिप्रसादांच्या मनांत पांच वर्षं सलत राहिलं होतं. आणि म्हणून हंसाला गाण्याची तालीम दिली तर ती एक मोठी गायिका होईल हें स्पष्ट दिसत असतांनाहि त्यांनीं तिला गाणं शिकविण्याचं मनांत आणलं नाहीं. त्यांनीं कृष्णलालला बोलावून घेतलं, व त्याच्या साहाय्यानं ते तिला नृत्य शिकवूं लागले. हरिप्रसादांनीं तयार केलेली एक नर्तिका म्हणून जगाची वाहवा हंसानं मिळविली पाहिजे, या महत्त्वाकांक्षेनं त्यांनीं तिला शिकवायला आरंभ केला.

त्याचं तें शिक्षण म्हणजे एक खडतर व्रत होतं. आठ आठ दहा दहा तास ते हंसाला मेहनत करावयास लावीत. परंतु हंसानं त्या मेहनतीचा कधीं कंटाळा केला नाहीं. तिला शिकविण्यापुढें जगांतल्या इतर साऱ्या गोष्टींचा हरिप्रसादांनीं त्याग केला होता. तिनं शिकण्यापलीकडे जगांत दुसरी कोणतीहि गोष्ट नाहीं अशी वृत्ति ठेवली होती. ती जसजशी तयार होऊं लागली तसतसा तिच्या ग्रहणशक्तीबद्दल हरिप्रसादांना अधिकाधिक विश्वास वाटूं लागला. तिच्या गळ्यांत ज्याप्रमाणें साहजिक माधुर्य सांठलेलं होतं त्याप्रमाणें तिच्या डोक्यांत लय होती, पावलांत हलकेपणा होता, अंगांत साहजिक झोक होता, अंतःकरणांत विविध भावांची संवेदना होती, मुद्रेवर नास्य होतं. ही मुलगी आपली महत्त्वाकांक्षा पूर्ण करणार याबद्दल हरिप्रसादांना जास्त जास्त खात्री वाटूं लागली. बारा बारा चौदा चौदा घंटे ते तिला शिकवूं लागले...

अशा प्रकारें चार वर्षं गेल्यानंतर हरिप्रसाद एके दिवशीं शामराजांच्या भेटीला गेले होते व म्हणाले होते, " महाराज, माझ्या शिष्येची तयारी पूर्ण झाली. आतां आपण म्हणाल त्या दिवशीं ती आपल्यापुढें मुजरा करील. "

महाराज म्हणाले होते, " फार आनंदाची गोष्ट आहे. मागं मीं आपणांला सांगितल्याप्रमाणें आपल्या शिष्येचा पहिला मुजरा मी मोठ्या थाटामाटानं आणि समारंभानं घडवून आणणार आहे. आमच्या दरबारच्या नेहमीच्या यादीप्रमाणें आमंत्रणं रवाना होतील. आपल्याला मुद्दाम कुणाला आमंत्रण धाडायचं असेल तर सांगा. "

" मानपूरच्या महाराजांना मुद्दाम पाचारण करावं सरकार. आणि त्यांना लिहावं, आपल्या दरबारचे कथ्थक प्यारेलाल व त्यांची शिष्या रेहना यांना मुद्दाम घेऊन या. "

नऊ वर्षांपूर्वी मानपूरच्या दरबारांत झालेला प्रसंग आणि हरिप्रसादांनीं केलेली प्रतिज्ञा शामराजांना माहीत होती. ते हंसले व म्हणाले, " हां हां प्रसादजी, मानपूरच्या महाराजांना जरूर आग्रहानं बोलावतों. आणि आपल्या शिष्येचा मुजरा पहायला प्यारेलाल रेहनाला घेऊन येईल याबद्दलहि खात्री ठेवा. पण प्रसादजी, माझी एक सूचना ऐकाल काय ? "

" आज्ञा करावी सरकार. "

" आपल्या शिष्येचं नांव बदलून टाका. हंसा हें नांव कांहीं चांगलं नाहीं. यापेक्षां अधिक चांगलं नांव पाहिजे. आपली शिष्या मोठी खूपसुरत आहे असं ऐकतों. रंभा असं नांव कां देत नाहीं तिला ? "

हरिप्रसाद हंसले आणि म्हणाले, " सरकार, वीस वर्षांपूर्वी या मुलीचा जन्म झाला आणि तिच्या आईबापांनीं तिचं नांव हंसा ठेवलं. परंतु तिचं खरं आयुष्य चार वर्षांपूर्वी इथें आपल्या नगरींत सुरू झालं. आपल्या राजधानींतच तिचा खरा जन्म झाला. आपण तिचे पिते आहांत. तिला आपल्या आवडीचं नांव ठेवण्याचा आपल्याला खचित अधिकार आहे. आजपासून तिला आपण ' रंभा ' म्हणूनच हांक मारूं. आपण सुचविलेलं नांव मला फार आवडलं. "

मग चंबलच्या दरबारातर्फे आमंत्रणं रवाना झालीं होतीं. त्या आमंत्रणांत असंच लिहिलं होतं, कीं ' आमच्या दरबारचे नामदार तंतकार श्री. हरिप्रसादजी यांची शिष्या रंभा आमच्या खास आज्ञेवरून पहिला जाहीर मुजरा करणार आहे. हा मुजरा पाहण्यासाठीं आपण उपस्थित रहावं अशी विनंति आहे. '

या आमंत्रणाला मान देऊन बहुतेक सारे निमंत्रित चंबलमध्यें येऊन दाखल झाले होते. राजधानींत एखादा लग्न-समारंभ असल्याप्रमाणें धांदल उडाली होती. ' राजविलास ' थिएटरपुढचं प्रांगण सूर्यास्त

झाल्याबरोबर रोषनाईनं फुलून गेलं होतं. मैदानाचं प्रवेशद्वार आणि आंतील भागहि फार सुंदर रीतीनं शृंगारण्यांत आला होता. रंगभूमीची सजावट कसोशीनं केलेली होती. जिकडे तिकडे दिवेच दिवे उजळले होते. लोकांच्या झुंडीच्या झुंडी मैदानाकडे लोटूं लागल्या होत्या. नऊ वाजतां मैदानाची चौफेर उतरण माणसांनीं खचून भरून गेली. साडेनऊ वाजल्या-नंतर बड्याबड्या पाहुण्यांच्या गाड्या थिएटरपुढच्या भव्य पटांगणांत येऊन उभ्या राहूं लागल्या, आणि पाहुणे मैदानांत प्रवेश करून आसनस्थ होऊं लागले. दहा वाजण्याच्या सुमारास कुस्तीच्या आखाड्यांत अर्ध-वर्तुलाकृति रांगांनीं मांडलेल्या साऱ्या जागा भरून गेल्या. मग शामराजे आपल्या लवाजम्यानिशीं वाजत गाजत येऊन दाखल झाले. त्यांनीं आपल्या जागीं बसल्यावर खाजगी कारभाऱ्यांना खुणेनं बोलावून विचारलं, "केव्हां सुरवात होणार ?"

खासगी कारभाऱ्यांनीं सांगितलं, "हरिप्रसाद आपल्या आज्ञेचीच वाट पहात आहेत."

"त्यांची सारी तयारी आहे ना ?"

"होय."

"पण एकदां आंत जा आणि त्यांना विचारून या."

खासगी कारभारी आंत धांवत गेले. रंगपटाच्या खोलीच्या दारापाशीं हरिप्रसाद उभे असलेले दिसतांच ते म्हणाले, "प्रसादजी, सरकारनीं विचारलंय आपली तयारी आहे काय ?"

हरिप्रसाद म्हणाले, "आमची सारी तयारी आहे. हुजुरांची आज्ञा झाली कीं आम्ही सुरवात करतों."

रंगपटाच्या खोलींत एका भव्य आरशापुढें उभ्या राहिलेल्या रंभानं तो संवाद ऐकला. 'सारी तयारी आहे'! हरिप्रसादांच्या तोंडचे ते शब्द

ऐकल्याबरोबर तिच्या अंगावर रोमांच उठले, ते अनेक भावनांचे होते. जो प्रसंग आपल्या आयुष्यांत कधीं येईल असं चार वर्षांपूर्वी तिला स्वप्नांतहि कधीं वाटलं नव्हतं, पण ज्या प्रसंगासाठीं गेल्या चार वर्षांची तपश्चर्या तिनं केली होती, तो प्रसंग अखेर अगदीं समीप आला होता ! या क्षणीं तिला हर्ष होत होता, या प्रसंगाच्या परीक्षेंतून आपण यशस्वीपणानं पार पडूं ना अशी किंचित् भीति वाटत होती. आत्मविश्वासाच्या स्फुरणाचा ती अनुभव घेत होती; त्याचप्रमाणें अनामिक भयानं तिचं अंतःकरण किंचित् कंपित होत होतं. गेल्या चार वर्षांत आपण किती कठोर अभ्यास केला त्याच्या अनेक आठवणी तिच्या मनांत उचंबळून येत होत्या. अष्टौप्रहर तिनं नृत्यकलेचा निदिध्यास केला होता. बाहेरच्या जगाकडे नजरदेखील टाकली नव्हती. चंबल शहरांतील एकदेखील ठिकाण तिनं कधीं पाहिलं नव्हतं. हरिप्रसादांच्या बंगल्याबाहेर ती कधीं पडली नव्हती. दिवस आणि रात्र एकामागून एक येत होते, जात होते. परंतु ती कालगणना तिच्या मनानं कधीं केली नव्हती. चांदण्या रात्री आणि अंधाऱ्या रात्रीं एकामागून एक येत होत्या आणि जात होत्या. परंतु तिला त्यांचं येणं जाणं कधीं कळत नव्हतं. अभ्यास हा एकच शब्द तिचं सबंध जीवित भरून राहिला होता. त्या अभ्यासाच्या व्रताचं आज उद्यापन होतं. त्या उद्यापनाची घटका आतां येऊन ठेपली होती. ज्या जगाची शुद्ध ती चार वर्षं विसरली होती त्या जगापुढें एक नर्तिका म्हणून ती आतां उभी राहणार होती ! हर्षाचा उन्माद, यश संपादण्याची अधीरता, यशाऐवजीं अपयश तर येणार नाहीं अशा शंकेचा थरकांप—अशा अनेक भावना एकमेकींत गुंफल्या जाऊन तिच्या अंतःकरणांत एकदम हेलावल्या...समोरच्या आरशांतल्या आपल्या प्रतिबिंबाकडे पाहून तिनं अंगाला शहारे दिले...

बाहेरून हरिप्रसादांनीं विचारलं, " रंभा, तयार झालीस ? "

तिनं उत्तर दिलं, " होय पिताजी, मी तयार आहे ! "

ती बाहेर आली. तिनं हरिप्रसादांच्या पायांवर मस्तक ठेवलं. मग तिनं घुंगुर उचलून ते कपाळावर टेकले, आणि खालीं वांकून ती ते आपल्या पायांवर बांधूं लागली...

घंटा झाली. मैदानांतले दिवे मालवले गेले. मखमलीचा पडदा दूर झाला. झगझगीत प्रकाशानं उजळून गेलेल्या रंगभूमीवरचा देखावा प्रेक्षकांच्या दृष्टीस पडला, आणि त्याच वेळेस बीन, सतार, सरोद, मँडोलिन सनई अशा अनेक वाद्यांच्या ताफ्यांतून निघालेले हमीर रागिणीचे अगदीं ठाय लयींतले स्वर लोकांना ऐकूं आले. रंगभूमीवर कैलासाचा भव्य देखावा मांडलेला होता, आणि मधोमध नृत्याच्या एका पवित्र्यांत उभी असलेली भव्य शिवमूर्ति उभी असलेली दिसत होती. त्या शिवमूर्तीपुढें मस्तक नम्र करून अंग झुकवून दोन्ही हात जुळवून नमस्कार करणारी रंभा निश्चल उभी होती. पखवाजावरचं एक आवर्तन संपूर्ण होईपर्यंत तिचं अंग लवमात्रदेखील हाललं नाहीं. त्या भव्य शिवमूर्तीप्रमाणेंच त्या नटराजाला वंदन करणाऱ्या या स्त्रीचीदेखील एक मूर्तिच घडवून उभी केली आहे कीं काय असा प्रेक्षकांना क्षणमात्र भास झाला असेल.

परंतु तालाचं एक आवर्तन संपल्यानंतर पखवाजावर नव्या आवर्तनाची सम जेव्हां खणखणून वाजली, त्याच वेळेस रंभाच्या पायांतले घुंगुरही वाजलेले लोकांनीं ऐकले. आणि मग रंभाची हालचाल होऊं लागलेली त्यांना दिसूं लागली. रंगपूजा नृत्याचा प्रारंभ अत्यंत धीम्या लयींत तिनं केला. तिच्या हातांची हालचाल इतकी नाजुक व सावकाश होत होती कीं जणूं वाऱ्याच्या मंद झुळकेनं उमलणारं पुष्प श्वास सोडण्यासाठीं आपल्या पाकळ्या वर खालीं करीत होतं. पुढें मागं सरकण्याची तिची गति इतकी मंद होती, आणि तिचं खालीं झुकणं आणि वर होणं इतकं मोहक होतं, कीं

जणुं सौन्दर्याचं एक निराकार स्थिर स्वप्नच हळूं हळूं जागृत होऊन आकार घेत होतं आणि हालूं लागलं होतं. ठराविक मात्राचे इशारे देणाऱ्या तिच्या पायांतल्या घुंगुरांचा छुम छुम असा ध्वनि म्हणजे जणुं त्या साकार होत चाललेल्या स्वप्नाची मंजुळ लाघवी भाषा होती. या आभासाचा रोमांचकारक प्रत्यय घडल्यामुळें प्रेक्षागृहांतले हजारों लोक अगदीं स्तब्ध बसून स्तिमित नजरेनं पहात राहिले...

सूर्याच्या पहिल्या कोवळया सोनेरी किरणांची छटा बदलावी आणि प्रकाश अधिकाधिक सर्वव्यापी व प्रखर होत जावा त्याप्रमाणें तालाच्या मात्रांमधली अंतरं पखवाजावरच्या बोलांनीं भरून निघूं लागलीं, रंभेच्या पदन्यासागणिक निघणारा छुमुछुम ध्वनि अधिक प्रमाणांत कानांवर पडूं लागला, परोपरीच्या अर्थपूर्ण मुद्रा दाखविणारे तिचे करपल्लव अधिक स्पष्ट हालचाल करूं लागले, तिच्या भुजलता अधिक मोकळेपणानं क्रीडा करूं लागल्या. आतां स्वप्नाला पूर्ण आकार आला होता. तालाच्या तलम पायघड्यांवर रंभाचीं पावलं स्वच्छंद बागडूं लागलीं होतीं. उपवनांतल्या कदंबवृक्षांभोंवतीं वळसे घालीत शिवाशिव खेळल्याप्रमाणें आडलयीच्या तुकड्यांच्या संगतीनं ती जात होती. एका आवर्तनाच्या अखेरींतूनच दुसऱ्या आवर्तनाचा प्रारंभ होत होता. आतषबाजीच्या वेळेस उंच आकाशांत जाऊन फुटलेल्या गोळयाचा खालीं येतांना पुन्हां स्फोट व्हावा, आणि विविध रंगांच्या अग्निबुंदांच्या ओघळत्या धारांचे फवारे दिसावे, तद्वत् बोलांतून बोल उठून घुमूं लागले, आणि सारं वातावरण लयबद्ध छुमछुमाटानं भरून गेलं. हजारों प्रेक्षकांची ती सभा चित्रासारखी बसली होती. सारीं माणसं लयीनं इतकीं भारलीं गेलीं होतीं आणि तिच्याशीं इतकीं एकरूप झालीं होतीं कीं प्रवाहांत सांपडलेल्या माणसाला त्याबरोबर वाहत जातां जातां प्रवाहाचा संथपणा केव्हां संपला, त्याचा वेग केव्हां वाढला, आणि अखेर पाणी खळ-

खळाट करीत केव्हां वाहूं लागलं हें लक्षांतच येऊं नये, त्याप्रमाणं नृत्याच्या लयीच्या एकींतून दुसरी अशा क्रमानं उत्पन्न झालेल्या अवस्था त्यांना धड कळल्याहि नाहींत...

अखेर ऐकणारांच्या कानांना घेरी यावी इतकीं कमाल मर्यादेची द्रुत लय जेव्हां सुरू झाली, एकमेकाचा उच्चार जवळजवळ छाटींतच पखवाजांतून बाहेर पडणारे बोल आणि त्या बोलांना लपेटून निघाल्यासारखे वाटणारे रंभाच्या पावलांचे ‘ ता थै थै ता ’ असे रुणझुणणारे शब्द अशा दोन ध्वनिप्रकारांची एक प्रकारची हातघाईची झुंजच जेव्हां सुरू झाली, तेव्हां मात्र जणुं लयीचा तो ताण असह्य झाल्यामुळें सारे प्रेक्षक भानावर आले. एक प्रकारच्या गोड धुंदीनं आपला जीव अगदीं गुदमरून गेला आहे असं साऱ्यांना वाटलं. त्या गुदमराटांतून आपण केव्हां एकदां सुटतों अशी घाई त्यांच्या जीवाला झाली. तालावर कानांचं लक्ष ठेवणं कठीण झालं, रंभाच्या पायांवर डोळयांची नजर ठरणं मुष्कील झालं. नृत्याच्या त्या विलक्षण द्रुत लयीचा प्रचंड झोत अंगावर घेतां घेतां साऱ्या पंचेंद्रियांची संवेदना बधिर होऊन तर जाणार नाहीं अशी भीति प्रेक्षकांना वाटूं लागली. दीर्घ तपश्चर्येनं प्राप्त करून घेतलेलं एखादं दिव्य अस्त्र योध्याच्या हातून सुटल्यानंतर अनावर होऊन फिरत रहावं आणि आतां त्यांची गति कधीं थांबणारच नाहीं असं वाटावं, त्याप्रमाणें कमालीच्या चेढलेल्या लयींतहि पायाच्या छुमकारानं तालाच्या चारी मात्रा साफ स्पष्ट दाखविणाऱ्या रंभाची गति कधीं संपेल कीं नाहीं असं वाटूं लागलं...

परंतु अखेर एखाद्या भिंगरीप्रमाणें पाहणाऱ्याला मोजतां येऊं नयेत इतक्या गिरक्या एकामागोमाग घेतल्यानंतर समेवर येऊन दोन्ही हात उभारून पसरलेल्या पवित्र्यांत रंभा स्थिर उभी राहिली. तिनं हास्य केलं. प्रणाम केल्याप्रमाणें मस्तक झुकाविलं. आणि तिचीं ती नम्र हास्यवदन

लावण्यमय मूर्ति प्रेक्षकांच्या डोळ्यांना दिसली न दिसली तोंच घंटा वाजली, पडदा पडला, मैदानांतले सगळे दिवे एकदम प्रज्वलित झाले. क्षणभर सारे लोक एक प्रकारच्या बेहोषींतच राहिले. मग त्यांना आठवण झाली कीं जें अपूर्व नृत्य आपण पाहिलं त्याबद्दल नर्तिकेला आपण शाबासकी दिली पाहिजे. ही आठवण हजारों अंतःकरणांत जणुं एकदमच झाली. आणि त्यामुळें एखाद्या कवायतींतला संकेताचा हुकूम ऐकतांच क्रिया घडावी त्याप्रमाणें एकूण एक प्रेक्षकांच्या हातांनीं टाळ्यांचा जो गजर केला तो वातावरणांत भरून राहिला.

तो गजर ऐकतांच आपल्याला आनंदानं भोंवळ येईल असं भय रंभाला वाटलं. मूर्च्छा यायचीच असेल तर हरिप्रसादांच्या पायापाशीं यावी असं वाटल्यामुळें ती त्यांच्याकडे धांवत गेली. " पिताजी ! " असा उद्गार काढून तिनं त्यांचे पाय घट्ट धरले. " बेटी ! " असं म्हणून त्यांनीं तिला उचलून छातीशीं धरलं व तिच्या मस्तकावरून कौतुकानं हात फिरविला... नृत्याच्या कार्यक्रमांतलं हें पहिलं नृत्यच इतकं यशस्वी झालं होतं कीं आतां कार्यक्रमाला उत्तरोत्तर अधिकाधिक रंग चढणार याबद्दल संशयाला जागाच नव्हती...नऊ वर्षांपूर्वी मानपूरच्या महाराजांच्या दरबारांत झालेला अपमान आज साफ पुसला गेला असं हरिप्रसादांना वाटलं...त्यांनीं नऊ वर्षांपूर्वी केलेली प्रतिज्ञा आज पूर्ण झाली होती. त्यांनीं निर्माण केलेली एक अलौकिक नर्तिका आज संगीताच्या दुनियेंत पदन्यास करीत होती...यापुढें या दुनियेवर रंभाचं राज्य चालणार होतं...आणि रंभाचे गुरु म्हणून त्यांचंहि...रंभाची पाठ थोपटीत ते म्हणाले, " बेटी, आज तूं माझ्या आयुष्याचं सार्थक केलंस !"

# प्रकरण चवथें

" पिताजी, मी थोडी बाहेर जाऊन येऊं काय ? "

हरिप्रसादांनीं विचारलं, " बाहेर म्हणजे कुठें जाणार बेटी ? आणि किती वेळ ? "

रंभा म्हणाली, " तें मला माहीत नाहीं पिताजी. यांना विचारा. हे गाडी घेऊन आले आहेत आणि मला म्हणताहेत बाहेर येणार काय ? "

रंभाच्या मागेंच एक तरुण उभा होता. त्याच्याकडे पाहून हरिप्रसाद म्हणाले, " हिच्याबरोबर मलाहि बाहेर चला असं कां म्हणत नाहींस तूं ?"

हा प्रश्न करून हरिप्रसाद हंसले आणि त्यांचं हसणं ऐकून त्या तरुणाचा चेहरा गोरामोरा झाला, आपल्या मनाचा गोंधळ त्यांच्या लक्षांत येऊं नये म्हणून तो चटकन म्हणाला, " आपणांलाहि यावंसं वाटत असेल तर मोठ्या खुशीची गोष्ट आहे. चलावं, आपणहि अवश्य चलावं आमच्या-बरोबर. "

हरिप्रसाद पुन्हां हंसले व म्हणाले, " आतां मागाहून बोलावून काय उपयोग ? अशा बोलावण्यानं आम्हीं येत नसतों. " मग ते रंभाकडे वळून म्हणाले, " जा बेटी, पण लौकर परत ये. थिएटरमध्यें जायसाठीं वेळेवर निघालं पाहिजे हें लक्षांत आहे ना ? "

" होय, होय, लक्षांत आहे पिताजी. " असं म्हणून रंभा हंसत हंसत आपल्या खोलीकडे धांवली.

तो तरुणहि तिच्या मागोमाग गेला.

त्या दोघांच्या पाठमोऱ्या आकृतींकडे हरिप्रसाद पहात राहिले. त्यांची चर्या गंभीर झाली. त्यांच्या भुवयांमधोमध आठी उभी राहिली...रंभाला त्यांनीं जायला परवानगी दिली होती. परंतु त्यांच्या मनांत येत होतं, हें लक्षण कांहीं ठीक नाहीं. त्यांनीं तिला नाराज केलं नव्हतं, पण ते मनांतून ओळखून होते कीं तिला नाराज करण्याची वेळ लौकरच केव्हां तरी येणार आहे...ती वेळ येऊं नये अशी ते परमेश्वराची प्रार्थना करीत होते. परंतु त्या वेळेच्या पावलांची चाहूल आतांशा अधिकाधिक स्पष्टपणानं त्यांच्या कानीं येऊं लागली होती...

चंबलच्या पहिल्या जाहीर मुजऱ्यानंतर रंभाच्या नृत्याचा लौकिक झपाट्यानं पसरला होता. तिचा तो पहिला जाहीर कार्यक्रम पाहिल्यानंतर मानपूरच्या महाराजांनीं हरिप्रसादांना मोठ्या इतमामानं बोलावून घेतलं होतं, रंभाच्या नृत्याचा कार्यक्रम आपल्या दरबारांत करविला होता, भर सभेंत प्यारेलालला हरिप्रसादांची क्षमा मागावयास लावलं होतं आणि रंभाचा व हरिप्रसादांचा मोठा सन्मान केला होता. त्यानंतर रंभाच्या नृत्याचे कार्यक्रम करण्याच्या बाबतींत राजेरजवाड्यांत आणि धनिकांत अहमहमिकाच लागली होती. रामपूर, जयपूर, उदेपूर, इंदूर, ग्वाल्हेर, बडोदा अशा साऱ्या मोठमोठ्या संस्थानिकांच्या दरबारांत रंभाचे मुजरे

झाले होते. कंत्राटदारांनीं मोठमोठ्या रकमा देऊं करून मोठमोठ्या शहरीं रंभाच्या नृत्याचे जलसे घडवून आणले होते...कीर्ति आणि पैसा यांची अखंड बरसात अंगावर घेत हरिप्रसाद आणि रंभा आयुष्याचा मार्ग चालत होती...आणखी खूपखूप विद्या ते तिला देणार होते. ती आणखी मोठी झालेली ते पाहणार होते. त्यांनीं शिकवावं, तिनं शिकावं, हें एकच ध्येय त्यांच्यापुढें आतां होतं...

परंतु कलकत्त्यास असतांना त्यांना एक सुशिक्षित धनिक गृहस्थ म्हणाले होते, " प्रसादजी, रंभाचं नृत्य अप्रतिम आहे याबद्दल वाद नाहीं. पण त्याला तुम्ही आधुनिक स्वरूप दिलं पाहिजे. "

हरिप्रसादांनीं विचारलं होतं, " म्हणजे कसं म्हणतां ? "

ते गृहस्थ म्हणाले होते, " तुमच्या नृत्याच्या कार्यक्रमाला एकेरीपणा आहे. त्यामुळें शास्त्रोक्तपणाची गोडी त्यांत भरपूर असली तरी आधुनिकतेची शोभा त्यांत नाहीं. "

हरिप्रसाद म्हणाले होते, " अजूनहि आपलं म्हणणं मला नीटसं कळलं नाहीं."

" याचं कारण आपण जुन्या संस्कारांत वाढलेले आहांत. मी स्पष्ट बोलतों याचा राग मानूं नका. पण आपण आपल्या नृत्याची एकंदर मांडणी थोड्या नव्या दृष्टीनं केली पाहिजे. आणि त्यासाठीं दुसऱ्या कुणाचं तरी साहाय्य घेतलं पाहिजे."

हरिप्रसाद म्हणाले होते, " मी जुन्या संस्कारांत वाढलों आहे, हें आपलं म्हणणं खरं आहे. परंतु नृत्याचं शास्त्र बिघडूं न देतां नवीन काय करण्यासारखं आहे तें सांगणारा कुणी मला भेटला तर त्याचं ऐकण्यांत मला कमीपणा वाटणार नाहीं. असा कुणी माणूस आपल्या पाहण्यांत आहे ? "

" आहे. म्हणूच हा विषय मी आपल्याजवळ काढला."

" मग त्याची माझी भेट करवून द्या."

" जरूर. उद्यांच घेऊन येतों त्याला आपल्याकडे."

अशा प्रकारें या धनिक गृहस्थांच्या मार्फत हेमचंद्र प्रथम हरिप्रसादांकडे आला होता.

त्याच्याशीं थोडंसं बोलणं केल्याबरोबर हरिप्रसादांच्या लक्षांत आलं होतं कीं हा तरुण जसा देखणा आहे तसाच मोठा डोकेबाजहि आहे. नृत्यशास्त्रांत त्याची गति फार नव्हती. रंभाच्या मानानं नृत्यकलेंत तो एक बच्चा होता. परंतु त्याला जें कांहीं अवगत होतं तें शास्त्रशुद्ध होतं. आणि नृत्याच्या आधुनिक थाटाच्या प्रदर्शनाबद्दल त्याच्या ज्या कल्पना होत्या त्यांत सौंदर्यदृष्टि होती...त्यांनीं त्याच्या सूचना मान्य केल्या...

आणि त्या दिवसापासून हेमचंद्र तर हरिप्रसादांकडे अध्ययनासाठीं व नृत्याच्या कार्यक्रमांत रंभाच्या जोडीनं भाग घेण्यासाठीं राहिलाच, पण शिवाय हेमचंद्राच्या सल्ल्यावरून हरिप्रसादांनीं आणखी चार तरुण मुली आणि सहा तरुण पुरुष शिकवून तयार करण्यासाठीं आपल्याकडे ठेवले. वादकांच्या ताफ्यांतहि आणखी कांहीं माणसांची भरती केली. आधुनिक विषयांवर कांहीं नवे नाच बसविले. त्यासाठीं नवे देखावे करवून घेतले. वेषभूषांची व्यवस्था केली...

सारांश त्यांच्या उद्योगाला एका कंपनीचं स्वरूप आलं. असा पसारा हरिप्रसादांच्या मूळच्या प्रकृतीला मानवण्यासारखा नव्हता. परंतु हेमचंद्र हा एक मोठा साहाय्यक त्यांना लाभला होता. तो कलावंत होता त्याप्रमाणेंच सारे व्याप संभाळण्याची पात्रताहि त्याच्या अंगीं होती. हरिप्रसादांच्या सहवासांत कसोशीनं अध्ययन करून तो आपल्या कलेंत तर अधिकाधिक

प्रवीण होत होताच, पण शिवाय कंपनीच्या एकंदर परिवाराची सर्व व्यवस्था उत्तम प्रकारें संभाळीत होता...रंभा ज्याप्रमाणें हरिप्रसादांना पहिल्यापासून प्रिय झाली होती त्याप्रमाणेंच हेमचंद्रावर त्यांचं प्रेम जडलं होतं...

परंतु प्रेम ही एक विचित्र वस्तु आहे. ती एकमार्गी असते तेव्हां ठीक असतं, पण प्रेमाचे अनेक धागेदोरे निर्माण झाले कीं त्यांची सरळ गुंफण सहसा होत नाहीं.

हरिप्रसाद रंभावर प्रेम करीत होते, हेमचंद्रावरहि त्यांचं प्रेम होतं. परंतु त्यांच्या प्रेमांतल्या या दोन व्यक्तींमध्यें प्रेमाचं आकर्षण सुरू झाल्याची शंका ज्या दिवशीं त्यांना प्रथम आली त्या दिवशीं ते फार अस्वस्थ झाले होते...जो वाढलेला पसारा आपण निर्माण केला त्यांतून आपली मूळची महत्त्वाकांक्षा जाळून खाक करणारा अग्नि निर्माण होणार कीं काय असं भय त्यांना वाटूं लागलं...एखाद्या तपस्व्यानं सिद्धि मिळवावी त्याप्रमाणें त्यांनीं रंभा निर्माण केली होती. रंभानं विद्या आणि नृत्यकला यांच्या उपासने-व्यतिरिक्त जन्मभर दुसरी कोणतीहि गोष्ट करूं नये, विद्येच्या लालसेखरीज दुसरी कोणतीहि भावना तिनं आपल्या अंतःकरणांत ठेवूं नये, तिनं एखाद्या तपस्विनीप्रमाणें कलेशीं पूर्णपणें एकनिष्ठ राहून आयुष्य कंठावं अशी त्यांची इच्छा होती. ही आपली इच्छा त्यांनीं तिला सांगितलेली होती व तिनं तशी त्यांच्या पायांची शपथहि घेतली होती...म्हणून रंभा बावीस वर्षांची झाली, तिच्या लावण्याचा ऐन बहर तिच्या अंगाअंगावर दिसूं लागला तरी हरिप्रसाद निश्चित होते. विद्येपासून लक्ष विचलित करणाऱ्या प्रेमाचा उद्भव ती आपल्या अंतःकरणांत कधींहि होऊं देणार नाहीं याविषयीं त्यांची खात्री होती...

पण त्यांच्या या निश्चित अवस्थेला एके दिवशीं अकस्मात् धक्का बसला होता. हेमचंद्र आणि रंभा उभयतांत प्रेमाची नाजूक भावना उत्पन्न

झाल्याचा संशय त्यांना आला होता. ते मनाशीं म्हणाले होते, असा कांहीं प्रकार घडत असेल तर त्याला वेळींच प्रतिबंध केला पाहिजे. परंतु हेमचंद्र आणि रंभा यांची ताटातूट करणं सोपं नव्हतं. म्हणून ते स्वस्थ राहिले होते. आणि शिवाय त्यांना पुष्कळदां वाटे कीं आपल्याला कदाचित् उगीचच संशय येत असेल. हेमचंद्र आणि रंभा या दोघांनीं एकमेकांशीं मनमोकळे-पणानं आणि कांहींशा खेळकरपणानंहि वागावं हें स्वाभाविक होतं. पण पुन्हां असं कांहीं तरी घडे कीं मनाची ही समजूत कायम ठेवणं त्यांना कठीण होई. मग ते फार अस्वस्थ होऊन जात...

आतांहि हेमचंद्र आणि रंभा यांच्या पाठमोऱ्या आकृतींकडे पाहतांना ते असेच अस्वस्थ झाले. ते मनाशीं म्हणाले, हें लक्षण कांहीं ठीक नाहीं. त्यांची चर्या गंभीर झाली. त्यांच्या भुवयांमधोमध आठी उभी राहिली.

आपल्या छोट्या खोलींत ड्रेसिंग टेबलापुढें उभं राहून बाहेर जाण्याची तयारी करतां करतां दाराबाहेर उभ्या राहिलेल्या हेमचंद्राशीं रंभा बोलत होती.

" कुठें जायचं आहे आपल्याला ? "

" माझ्या एका मित्राकडे. "

" माझ्या ओळखीचे आहेत काय ते ? "

" नाहींत. "

" मग मी कशी येऊं ? "

" तुझी ओळख करून घेण्याची त्यांची व त्यांच्या बहिणींची फार इच्छा आहे. तुला घेऊन येण्यासाठीं त्यांनीं मला वारंवार आग्रहानं सांगितलेलं आहे, आणि गाडी पाठवून दिली आहे. त्यांना आणि त्यांच्या बहिणींना तुझ्याविषयीं फार आदर आहे. "

" किती बहिणी आहेत त्यांना ? "

" इतक्या आहेत कीं मी त्यांच्याकडे इतकेदां गेलों पण मला मोजतां आल्या नाहींत. " असें म्हणून हेमचंद्र हंसला.

रंभालाहि हसूं आलं. थोडं थांबून तिनं विचारलं, " त्या साऱ्या मुली देखण्या आहेत का ? "

" मी त्यांना नीटसं निरखून पाहिलेलं नाहीं. पण श्रीमंत लोकांच्या बायका आणि मुली क्वचितच देखण्या असतात. अंगांत वात शिरून खूप लठ्ठ तरी झालेल्या असतात किंवा मरायला टेंकल्याप्रमाणें वाळकुड्या तरी असतात. "

रंभा मोठमोठ्यांदा हंसली. तिनं विचारलं, " फार श्रीमंत आहेत का ही मंडळी ? "

" त्यांची गाडी बघशील आणि एका लहानशा टेकडीवरचा त्यांचा बंगला पाहशील तेव्हां तुझं तुलाच कळेल. "

" या लोकांची आणि तुमची ओळख केव्हां झाली ? "

" मग सांगतों तुला सगळं. तूं आधीं आटप. "

" आटपतेंच आहे. " असं रंभानं उत्तर दिलं. परंतु वेशभूषेची तिनं घाई केली नाहीं. तिच्या मनांत जे विचार येत होते ते बंद करण्याची तिची इच्छा नव्हती. आणि आपण खोलीबाहेर पडलों व हेमचंद्राबरोबर निघालों कीं आपले ते विचार बंद पडतील असं तिला वाटत होतं. आटपण्याची तिची मुळींच इच्छा नव्हती. किंबहुना तिची तयारी आटपली होती तरीदेखील ती उगीचच आरशापुढें रेंगाळली होती, कानांतले इअररिंग्ज चांगले बसले होते तरीसुद्धां आरशापुढें किंचित वांकून उजव्या डाव्या हातांचीं बोटं कानाच्या पाळीवर अलगद ठेवून ती इअररिंगशीं उगीचच चाळा करीत होती. तिच्या मनांत येत होतं, ज्या ज्या शहरीं

जावं त्या त्या शहरीं या हेमचंद्राचे मित्र बरे असतात, आणि त्याचे हे मित्र माझी ओळख करून घ्यायसाठीं बरे उत्सुक असतात! आजपर्यंत कोणकोणत्या शहरीं कुणाकुणाशीं त्यानं तिच्या ओळखी करून दिल्या होत्या त्याची आठवण ती मनाशीं करून पाहूं लागली. त्या निरनिराळया लोकांच्या आठवणी कांहीं तिला नीटशा राहिल्या नव्हत्या. परंतु तिला एवढं आठवत होतं, कीं ज्या ज्या लोकांकडे तो तिला घेऊन गेला होता त्या त्या लोकांच्या संगतींत तिचा वेळ फार चांगला गेला होता, आणि बाहेरचं जग तिला पाहतां आलं होतं. पूर्वीचं तिचं आयुष्य आणि हेमचंद्र आल्यापासून सुरू झालेलं तिचं आयुष्य यांत मुख्य फरक हाच होता. बाहेरच्या जगाशीं तिचा जास्त जास्त संबंध येऊं लागला होता. पूर्वीं ती सहसा कुठेंहि बाहेर जात नसे. नृत्यकलेचा तिचा अभ्यास अजूनहि जोरानं चालूं होता, त्यांत तिचे रोजचे तीन चार तास सहज जात. आठवड्यांतून एखाद दुसरा तरी नृत्याचा जाहीर कार्यक्रम असे. त्यांत रात्रीचा बहुतेक वेळ जात असे. पुष्कळदां हरिप्रसाद सतार वाजवायला बसत. ती ऐकत तीन चार घंटे सहज निघून जात. बाहेर जायला तिला वेळच होत नसे. फार तर एखादे वेळेस हरिप्रसादांच्याबरोबर ती गंमतीनं बाजारांत जात असे किंवा ज्या शहरीं मुक्काम असेल त्या शहरांतलं एखादं प्रेक्षणीय स्थळ बघण्यासाठीं ते तिला घेऊन जात असत. परंतु यापलीकडे बाह्य जगापासून ती सर्वस्वी अलिप्त राहिली होती.

विद्येची उपासना ही एकच गोष्ट म्हणजे तिचं सबंध आयुष्य झालेलं होतं. ही विद्या आणि विद्या देणारे तिला पित्यासमान असणारे तिचे गुरु हरिप्रसाद याखेरीज दुसरा कसलाहि सहवास तिला घडत नव्हता. तिचं आयुष्य एक प्रकारच्या एकलकोंडेपणांत जात होतं. परंतु त्या एकलकोंडे-पणाची जाणीव मात्र तिला बिलकुल नव्हती. त्यांतच ती रमलेली होती...

परंतु हेमचंद्र आला आणि मग मात्र पूर्वी आपण किती एकलकोंडेपणानं रहात होतों याची तिला जाणीव होऊं लागली. त्याच्याबरोबर इकडे तिकडे हिंडतांना, समाजांत मिसळतांना तिला वाटूं लागलं मीं न पाहिलेलं असं केवढं तरी जग आहे. माझ्या परिचयासाठीं जीं उत्सुक आहेत अशीं किती तरी माणसं आहेत...नव्या नव्या लोकांचा तिच्याशीं परिचय झाला कीं ते लोक तिची मुक्तकंठानं प्रशंसा करीत. या प्रशंसेचा आनंद कांहीं वेगळाच होता, व रंभाला तो हवासा वाटणं साहजिक होतं. कोणत्याहि नामांकित कलावंताच्या कलेवर दुनिया खूष असते. दुनियेची ही खुषी कलावंताला आपल्या ठिकाणीं एकलकोंडपणानं राहूनहि माहीत असतेच. तशी ती रंभालाहि माहीत होती. परंतु लोक आपल्याला चाहतात एवढं माहीत असणं निराळं, आणि चाहत्या लोकांत मिसळल्यावर त्यांच्या तोंडून बाहेर पडणारे अमर्याद प्रशंसेचे उद्गार प्रत्यक्ष ऐकणं निराळं. या दुसऱ्या गोष्टींत कलावंताला विशेष सुख मिळत असतं. या सुखाची रंभाला पूर्वी कल्पना नव्हती. परंतु हेमचंद्राबरोबर ती हिंडूं फिरूं लागल्यापासून या सुखाचा अनुभव तिला येऊं लागला. आणि या नव्या सुखाची चटक लागल्यामुळेंच हेमचंद्राचा सहवास तिला विशेष प्रिय वाटूं लागला. हरिप्रसादांच्या तालमींत आपण विद्येनं खूप संपन्न होत होतों, परंतु आपल्या मनावर होणारे संस्कार एकेरी राहिले असते, आपल्या आयुष्यांत विविधता आली नसती, आपण एकप्रकारें असंस्कृत राहिलों असतों, जगाची ओळख आपल्याला झाली नसती, जगांतल्या अनेक गोष्टींत अनेक आनंद भरले आहेत त्यांचा आस्वाद घेण्याची पात्रता आपल्या अंगीं आली नसती, पण आतां हेमचंद्राच्या सहवासामुळें पूर्वी जें झालं नसतं तें होत आहे, असं रंभाला वाटूं लागलं. आपलं मन प्रगल्भ होत आहे, आपल्या अंतःकरणावर विविध संस्कार होत आहेत, जगापासून अलिप्त एका बंद खोलींत राहिल्याप्रमाणें आपण पूर्वी राहिलों होतों, त्या बंदिस्त एकलकोंडे-

पणांतून आपण आतां बाहेर पडलों आहोंत, जग पहात आहोंत, जगांत वावरायला जास्त लायख होत आहोंत, आपल्या आनंदाचं क्षेत्र वाढत आहे, केवळ विद्येनंच नव्हे तर इतर सर्व बाजूंनीं आपली वाढ होत आहे, हें रंभाला जास्त जास्त कळूं लागलं. आणि त्यामुळें हेमचंद्राचा सहवास तिला अधिकाधिक हवासा वाटूं लागला...कुण्या नव्या लोकांशीं परिचय करून देण्यासाठीं हेमचंद्र तिला घेऊन जाणार असला कीं ती त्याची चरकांति चेष्टा करायची. परंतु मनांतून तिला तें बरं वाटत असे...याच वृत्तीनं ती आजही त्याच्याबरोबर जायला निघाली होती. ती मोठ्या खुषींत होती...

" आटपलं कीं नाहीं अजून ? "

हेमचंद्राचे ते शब्द ऐकल्यावर रंभा आपल्या विचारांच्या तंद्रींतून बाहेर पडली, आणि " आटपलं, आटपलं " असं म्हणून ती आरशापुढून दूर झाली.

गाडींत बसतांना तिनं गाडीकडे पाहून घेतलं, आणि ' आहे खरी बादशाही थाटबाज भली जंगी गाडी ! ' अशा अर्थाची खूण करण्यासाठीं हेमचंद्राकडे पाहून डोळे मिचकावले. गाडींत बसल्यावर तिनं त्याला विचारलं,

" या लोकांची तुमची कुठली ओळख ? "

तो म्हणाला, " यांचं माझं दूरचं नातं आहे. "

" जिथें जावं तिथें तुमच्या नात्यांतली कुणी ना कुणी माणसं असतात हा काय चमत्कार आहे ? "

तो म्हणाला, " हा चमत्कार मीं नाहीं केलेला. माझ्या आईबापांनीं, आणि त्यापूर्वीं त्यांच्या आईबापांनीं केला आहे. त्यांनीं लावलेल्या झाडांचीं फळं फक्त मी चाखतों आहे. "

"सारीं फळं गोडच आहेत का ?"

"नाहीं. कांहीं फळं खारट तुरट आहेत. आणि याचं कारण मीं तुला एकदां सांगितलंय."

तो हंसला. परंतु ती हंसली नाहीं. कारण जी गोष्ट तो हंसण्यावारी नेत होता ती तिला गंभीर वाटत होती. ज्यांना तो खारट तुरट फळं म्हणत होता तीं माणसं म्हणजे त्याच्या आजोबांच्या तऱ्हेवाईक लग्नामुळें उत्पन्न झालेल्या नात्यांतलीं माणसं होती. या नातलगांपैकीं एखाद्या गांवीं कुणी कुठें भेटलं कीं त्याला तो टाळीत असे हें तिला माहीत झालं होतं... त्याच्या घराण्याचा जो थोडासा इतिहास त्याच्याकडून तिला कळला तो मोठा चित्तवेधक होता. त्याच्या बापाच्या वेळेस त्याच्या कुटुंबाला गरिबी आली होती. परंतु एके काळीं मोठ्या वैभावांत आणि दिमाखांत राहणारं असं जमीनदाराचं त्याचं घराणं होतं. त्याचे आजोबा नेपाळांत सहज फिरतीवर गेले असतांना एक खूबसुरत मुलगी घेऊन घरीं आले होते, व घरांतल्या वडील माणसांच्या मताला आणि लोकमताला न जुमानतां त्यांनीं त्या मुलीशीं लग्न केलं होतं. तिच्यापासून मूल होईना म्हणून त्यांनीं दुसरं लग्न केलं होतं. हेमचंद्राचा बाप म्हणजे या दुसऱ्या लग्नापासून त्याच्या आजोबांना झालेला मुलगा. परंतु हेमचंद्राच्या वडिलांच्या जन्मानंतर लौकरच त्याच्या आजोबांची ही स्त्री मरण पावली होती; व तिच्या मृत्युनंतर त्यांनीं खुशाल एका मुसलमान बाईशीं लग्न केलं होतं. त्यांच्या उधळ्या स्वभावामुळें आणि सर्वस्वी गैरहिशोबी कारभारामुळें घराण्याच्या वैभवालाहि ओहोटी लागली होती. हेमचंद्राचा बाप अगदीं निराळ्या वृत्तीचा निघाला होता. कुटुंबाची श्रीमंती संपुष्टांत आली होती तरी आपल्या वडिलांना मुसलमान स्त्रीपासून झालेल्या परिवारालाहि त्यांनीं घरांत थारा दिला होता. आणि त्यांच्या वडिलांची पहिली नेपाळी बायको

अजून जिवंत होती तिलाहि त्यांनीं प्रेमानं संभाळलं होतं, इतकंच नव्हे तर तिच्या देशांतून तिचे नातेवाईक आले त्यांनादेखील यथाशक्ति आश्रय दिला होता. या साऱ्या गोष्टी सांगतांना हेमचंद्र रंभाला म्हणाला होता,

" आमच्या घरांत फार गंमतीचं वातावरण आहे. तिथें तुला नेपाळी भाषा ऐकायला मिळेल, अस्सल उर्दू भाषा कानावर पडेल, आणि हिंदी तर अर्थात् ऐकूं येईल. आमच्या घरांत धर्माचार आणि सण होतात ते देखील असेच हरतऱ्हेचे. आणि आमच्या दूरच्या नात्यांतलीं माणसं इतकीं पसरलेलीं आहेत कीं त्यांपैकीं एखादं कुणी कुठें भेटेल त्याचा नेमच नाहीं."

या त्याच्या बोलण्याची रंभाला आतां आठवण झाली. तिनं त्याला विचारलं, " ज्यांच्याकडे आपण आतां निघालों आहोंत तीं फळं कशी आहेत ? गोड कीं खारट तुरट ? "

तो हंसून म्हणाला " गोड आहेत. माझ्या आईच्या चुलतमामाच्या मेहुण्याचा मुलगा आहे हा जयपाल—"

तिनं विचारलं, " ज्यांच्याकडे आपण निघालों त्यांचं नांव जयपाल होय ? "

" हं. फार श्रीमंत आहे स्वारी. आणि जसा श्रीमंत आहे त्याप्रमाणें श्रीमंतीचा उपभोग कसा घ्यावा हे त्याला माहित आहे. त्याला आणि त्याच्या बहिणींनाहि. "

तिनं एकदम विचारलं, "" नात्यांतल्या मुलीशीं लग्न करण्याची चाल तुमच्यांत आहे काय ? "

" म्हणजे काय ? "

" नाहीं, जयपालांच्या बहिणींचा उल्लेख तुमच्या तोंडून वरचेवर होतोय म्हणून विचारलं, "

त्यानं एकदम मोठाले डोळे करून तिच्याकडे पाहिलं. ती हंसली, आणि हळूंच म्हणाली, " कां ? चिडायला काय झालं ? "

तो म्हणाला, " चिडलों कधीं ? तुझ्या मूर्ख प्रश्नाचा राग आला एवढंच. "

गाडी जेव्हां फाटकांतून आंत शिरली तेव्हां रंभाच्या लक्षांत आलं कीं तें फाटक एका छोट्याशा टेकडीच्या पायथ्याशीं होतं, आणि विस्तीर्ण बागेच्या वाफ्यांतून रस्ता माथ्यावरच्या बंगल्यापर्यंत गेला होता. उताराच्या मध्यावर एके ठिकाणीं टेनिस कोर्ट होतं. आणि त्यावर चार मुली खेळत होत्या आणि सहा सात जणी खुर्च्यांवर बसल्या होत्या. गाडीचा हॉर्न ऐकतांच आणि गाडी पाहतांच खुर्च्यांवर बसलेल्या त्या मुलींनीं टाळ्या वाजवून " आपली गाडी आली " " आपली गाडी आली " असा ओरडा केला. खेळणाऱ्या मुलींनीं खेळ ताबडतोब बंद केला व त्या साऱ्या जणी कोर्ट सोडून ज्या धांवत सुटल्या त्या गाडी पोर्चमध्यें आली त्याच वेळेस पोर्चमध्यें येऊन दाखल झाल्या. त्यांनीं गाडीला गराडाच घातला. हेमचंद्रानं रंभाच्या कानांत सांगितलं, " यांपैकीं जयपालांच्या बहिणी कोणत्या तें मला नक्की सांगतां येणार नाहीं, कदाचित् सगळ्याच असतील. " तें ऐकून रंभाला अनावर हंसूं आलं.

गाडीभोंवतीं जमलेल्या त्या मुलींनीं रंभाला जवळजवळ गाडींतून खालीं ओढूनच घेतलं. हातांत रॅकेट घेतलेली सगळ्यांत लठ्ठ आणि मोठाड मुलगी होती तिनं रंभाला साऱ्या जणींचीं नांवं इतक्या घाईनं आणि एकामागून एक सांगितलीं कीं त्यांपैकीं एकहि रंभाच्या लक्षांत राहिलं नाहीं.

आणि नंतर रंभाशीं बोलण्याची अशी कांहीं शर्यत त्या मुलींमध्यें लागली कीं कुणाच्या प्रश्नाला काय उत्तर द्यावं तें रंभाला कळेनासं झालं. ती अगदीं भांबावून गेली.

त्या मुलींच्या वागण्यानं जशी ती भांबावून गेली तशीच ज्या प्रशस्त दिवाणखान्यांत ती बसली होती तिथली सजावट पाहूनहि ती गोंधळून गेली. इतका प्रशस्त दिवाणखाना आणि अशी सजावट तिनं पूर्वी कधीं पाहिली नव्हती. त्या मुलींनीं तिला उठायला लावून दिवाणखान्याच्या भोंवतालच्या व्हरांड्यांतहि नेलं आणि तेथून शहराची शोभा कशी दिसत होती तें दाखविलं. त्यांनीं आपापल्या वह्या काढल्या आणि त्यांत तिची सही घेतली, त्या वेळेस स्वतःच्या अक्षराची रंभाला लाज वाटली. त्या मुलींनीं तिला आमच्या क्लबांत या, आमच्या शाळेंत या, असे अनेक प्रकारचे आग्रह केले. त्यांच्यापैकीं एकजण रंभाला म्हणाली,

"तुम्हांला पोहण्याची हौस आहे काय?"

"पोहण्याची?" असा उद्गार काढून रंभानं मान हालविली.

"तरी पण नुसती गंमत पहायला आमच्या पोहण्याच्या क्लबांत या कीं."

रंभानं पुन्हां मान हालविली. बायकांचा पोहण्याचा क्लब असतो अशी तिची स्वप्नांतहि कल्पना नव्हती.

तिच्या मनांत आलं, या जगांत काय काय प्रकार भरलेले आहेत! बायका टेनिस खेळतात! बायका पोहतात! मला सर्वस्वी अज्ञात अशा किती गोष्टी आहेत? केवळ संगीताच्या जगांत वावरतांना त्याबाहेरचं जग मला मुळीसुद्धां माहीत नव्हतं!...आणि आतां तें माहीत होऊं लागलं तों त्यांतल्या किती नव्या नव्या तऱ्हा मी पाहतें आहे...

तिनं पाहिलं तों हेमचंद्र अगदींसुद्धां गोंधळून न जातां सगळ्यांशीं बोलत चालत होता. विनोद करीत होता. चहाच्या वेळेस जयपालांनीं कसल्या तरी विषयावर बोलणं काढलं तेव्हां त्यावर त्यांच्याशीं त्यानं किती वाद केला. त्यानं खूप जग पाहिलं होतं. जगांत तो सहज मिसळूं शकत होता.

त्याच्या मानानं नी स्वतः किती मागासलेली होती...जयपाल तिच्या नृत्याची प्रशंसा करूं लागले तेव्हां त्यांच्या बोलण्याला योग्य अशीं उत्तरं देण्याचं काम हेमचंद्रानंच केलं. समाजांत वावरतांना तो तिला नेहमीं अशीच संभाळून घेत असे, आणि तिच्यांतल्या उणीवा उघड होऊं देत नसे. प्रशंसा ऐकतांना ती खालीं मान घालून गप्प बसली कीं तो म्हणे, "ती अगदीं अबोल आहे. आणि कुणी स्तुति करूं लागलं कीं ती जास्तच अबोल होते." त्याचे हे शब्द तिला फार आवडत असत...जयपाल हेमचंद्राला म्हणाले.

"या तोंडाचा कोणताच उपयोग करीत नाहींत काय ?"

हेमचंद्रानं विचारलं, "म्हणजे काय ?"

जयपाल म्हणाला, "नाहीं, या बोलत नाहींत, आणि खातहि नाहींत, म्हणून विचारतों"

भावाचा तो विनोद ऐकतांच सगळ्या बहिणी निरनिराळ्या आवाजांत आणि निरनिराळ्या तऱ्हेनं पण मोठमोठ्यांदा हंसल्या. तो एक कोरसच झाल्यासारखं रंभाला वाटलं. परंतु त्या साऱ्या मुली जयपालच्या बहिणीच होत्या कीं नाहीं हें तिला अजूनहि नीटसं कळलं नव्हतं.

आणि अखेर त्या मंडळींचा निरोप घेऊन ती हेमचंद्राबरोबर परत निघाली तरी देखील तें तिला कळलं नव्हतंच !

तिनं हेमचंद्राला विचारलं, "त्या मुलींच्या घोळक्यांत जयपालांच्या बहिणी किती होत्या आणि बहिणींच्या मैत्रिणी किती होत्या ?"

तो म्हणाला, "मी तुला पुन्हां शपथेवर सांगतों, मला याचा अंदाज अजून लागलेला नाहीं, वाटलं तर आज रात्रीं तूं जयपालना विचार. ती सारी मंडळी आपला जलसा पहायला आज रात्रीं येणार आहेत."

"त्यांनीं पूर्वीं दोनदा पाहिला आहे म्हणे."

" तरी पुन्हां येणार आहेत. त्या साऱ्या मुलींना तूं वेड लावलं आहेस."

" मी कीं तुम्ही ? "

हेमचंद्रानं डोळे वटारले तेव्हां ती मघांशीं एकदां हंसली होती त्याप्रमाणं पुन्हां एकदां हंसली.

रात्रीं नृत्यप्रयोगाच्या वेळेस मधल्या विश्रांतींत जयपाल आंत आले. हेमचंद्र रंभाच्या कानांत हळूंच म्हणाला, " आतां विचारून घे यांना वाटलं तर तुम्हांला बहिणी किती आहेत म्हणून "...तिला हंसू आलं. पण तिनं अर्थातच तो प्रश्न जयपालना विचारला नाहीं. तिला आणि हेमचंद्राला जयपाल जेवणाचं आमंत्रण देत होते. ती तिघंजणं एकमेकांशीं बोलण्यांत अगदीं गढून गेलीं...

हरिप्रसाद दुरून त्या तिघांकडे पहात होते. त्यांचा हास्यविनोद त्यांना थोडासा ऐकूं येत होता. बोलतां बोलतां मध्येंच रंभाचा उजवा हात सहजगत्या हेमचंद्राच्या डाव्या हातांत गुंतत होता तो त्यांना दिसत होता. हेमचंद्र ज्या तऱ्हेनं वरचेवर रंभाकडे पाहून हंसत होता ती तऱ्हाहि त्यांच्या लक्षांत येत होती...त्यांची चर्या गंभीर झाली. त्यांच्या भुवयांमधोमध आठी उभी राहिली. रंभानं हेमचंद्राच्या प्रेमांत सांपडावं ही गोष्ट त्यांना नको होती. प्रेमाच्या खेळांत ती सांपडली कीं तिचं विद्येच्या उपासनेवरचं लक्ष कमी होईल अशी त्यांना भीति वाटत होती. मोठमोठ्या कलावंतांनीं इष्काच्या नादीं लागून आपली विद्या खराब केल्याचीं उदाहरणं त्यांना माहीत होतीं. गायन, तंत, नृत्य, यांपैकीं प्रत्येक विद्या म्हणजे एक कठोर मत्सरी स्त्री आहे, एकनिष्ठेचा किंचित्‌हि भंग झाल्यास ती रुष्ट होऊन शाप दिल्याखेरीज रहात नाहीं, तिची उपासना करणाऱ्यांनीं एकच एक तिचं तेवढं दैवत मानलं पाहिजे, आणि इष्काचा खेळ तिला कधींहि मंजूर असत नाहीं, अशी त्यांची भावना होती. रंभा आजन्म फक्त नृत्यकलेची

सेवा करील, तिची भक्ति अनन्य आणि अचल राहील अशा खात्रींत ते होते. ह्या खात्रीमुळें तिला आणखी आणखी विद्या देऊन आणखी आणखी मोठी करण्याची महत्त्वाकांक्षा त्यांनीं बाळगली होती...या त्यांच्या महत्त्वाकांक्षेला आतां धक्का बसणार असं भय त्यांना वाटलं... एकमेकांशीं बोलण्यांत अगदीं गढून गेलेल्या जयपाल, हेमचंद्र आणि रंभा यांच्याकडे पाहतां पाहतां हरिप्रसाद मनांतल्या मनांत फार अस्वस्थ झाले...!

हरिप्रसाद स्वतःशीं प्रामाणिक असते आणि स्वतःच्या मनोवृत्तींचं संपूर्ण विश्लेषण करण्याचं सामर्थ्य त्यांच्या ठिकाणीं असतं, तर स्वतःच्या असमाधानचं आणखीहि एक कारण त्यांनीं स्वतःशीं कबूल केलं असतं... रंभा त्यांच्याकडे आली त्या वेळेस ती सोळा वर्षांची होती. आतां ती बावीस वर्षांची झाली होती. या सहा वर्षांतली पहिली चार वर्षं तर रंभानं सर्वस्वी त्यांच्या एकमेव सहवासांत घालविली होतीं. तिनं त्यांना पिताजी मानलं होतं, आणि तिला विद्या देणारे गुरु तर ते होतेच ! सर्वस्वी त्यांच्या हुकमतीखालीं ती राहिली होती. आणि नंतरदेखील नर्तिका म्हणून तिचा लौकिक वाढूं लागला, तिचे मोठमोठ्या संस्थानांतून आणि शहरांतून जाहीर कार्यक्रम होऊं लागले, तेव्हां देखील अष्टौप्रहार ती त्यांच्याजवळच राहिली होती. त्यांच्यावांचून दुसऱ्या कुणाचाहि अधिकार तिच्यावर नव्हता. आपण आपल्या अध्यापनानं निर्माण केलेली एक सुप्रसिद्ध नर्तिका, आणि सर्वस्वी आपला एकच एक अधिकार मान्य करून राहणारी एक मुलगी, या दृष्टीनं ते रंभाकडे पहात होते. आणि तसं पाहण्यांत त्यांना कलेच्या दृष्टीनं जसा आनंद होत होता त्याप्रमाणेंच त्यांच्या अहंकाराचाहि गौरव होत होता. त्यांचं त्यांना कदाचित् समजत नसेल, परंतु रंभानं कुणाच्या प्रेमांत सांपडूं नये असं जें त्यांना वाटत होतं

त्याला एक कारण असं होतं, कीं ती प्रेमांत सांपडली म्हणजे त्यांची तिच्यावरची हुकूमत संपणार होती. तिच्यावरच्या त्यांच्या अधिकारांत वांटेकरी निर्माण होणार होता. ती सर्वस्वी आपल्या आज्ञेत असावी अशी जी त्यांची गुप्त इच्छा होती, तिला धक्का बमणार होता...स्वतःच्या मनांतले हे विचारतरंग हरिप्रसादांना स्पष्ट दिसत नव्हते. परंतु ते त्यांच्या मनांत हळूं हळूं उठत होते आणि उत्तरोत्तर स्पष्ट होणार होते...

परंतु स्वतःच्या नाराजीचं संपूर्ण कारण जरी हरिप्रसादांना कळलं नव्हतं, तरी ती नाराजी त्यांना स्पष्ट जाणवत होती. एकमेकांशीं बोलण्यांत गढलेल्या त्या तिघांकडे पाह्यलाच नको असं त्याना वाटत होतं. ते मुळीं तोंडच फिरवून बसणार होते—

पण तितक्यांत हेमचंद्र जयपालना घेऊन त्यांच्याकडे आला, व त्यानं त्यांची जयपालशीं ओळख करून दिली. जयपालनीं त्यांना अगदीं वांकून नमस्कार केला. हेमचंद्र हरिप्रसादांना म्हणाला, " हे आपल्याला जेवण्याचं निमंत्रण द्यायला आले आहेत. "

हरिप्रसाद म्हणाले, " आपल्याला म्हणजे कुणाकुणाला ? "

" आपण, मी आणि रंभा—"

हरिप्रसाद जयपालकडे बघून म्हणाले, " आपण मला माफी केली पाहिजे. मी येऊं शकणार नाहीं. या दोघांना आपण घेऊन जा. "

जयपाल म्हणाले, " असं कसं चालेल ? आपण यायला पाहिजे. माझा फार आग्रह आहे असं समजा. "

हरिप्रसाद म्हणाले, " माझं ऐका, आपण मला आग्रह करूं नका. कारण खरं म्हणाल तर मेजवान्या झोडण्यांत आणि हिंडण्याफिरण्यांत वेळ घालवणं मला पसंत नाहीं. जो खरा कलावंत असतो, ज्याला मोठी कीर्ति

मिळविण्याची महत्त्वाकांक्षा असते, तो असल्या मोहांपासून कटाक्षानें दूर राहतो. विद्यासाधन हा एकच त्याचा आनंद असतो. आपल्या प्रेमळ आमंत्रणाबद्दल मी आपला फार आभारी आहे. पण मला आग्रह करूं नका. या दोघांना यायचं असेल आपल्याकडे तर खुशाल घेऊन चला."

त्यांच्या त्या अखेरच्या वाक्यांत स्पष्ट खोंच होती. तें वाक्य ऐकून जयपाल आणि हेमचंद्र दोघांचेहि चेहरे बावरल्यासारखे झाले. तितक्यांत घंटा झाली, जयपाल घाईनं बाहेर बसण्यासाठीं निघून गेले. कार्यक्रमांतल्या पुढच्या नृत्यांत जोडीनं प्रवेश करण्यासाठीं हेमचंद्र आणि रंभा विंगमध्यें उभीं राहिलीं. आतां पडदा उघडला कीं तीं दोघं तालबद्ध पावलं टाकीत रंगभूमीवर जाणार होतीं. वाद्यांच्या ताफ्यांतून धून बाहेर पडली. तालाचं एक आवर्तन संपल्यावर येणारी सम साधून पखवाज सुरू होणार होता. नृत्याला योग्य अशा वेषभूषा केलेल्या हेमचद्र आणि रंभा यांच्या आकृती प्रेक्षकांना दिसणार होत्या. येणाऱ्या समेकडे दोघांचंहि लक्ष होतं...

पण रंभा हळूंच मान वर करून हेमचंद्राला हलक्या आवाजांत म्हणाली, "पिताजी रागावलेले दिसतात."

हेमचंद्र हलकेच म्हणाला, "त्यांचं रागावणं मला मुळींच पसंत नाहीं. रागावूं देत खुशाल."

रंभा एकदम म्हणाली, "छे छे, असं आपण म्हणतां कामा नये."

तिच्या मनांत येत होतं पिताजींनीं रागवावं असं मी काय केलं आहे ?...त्या प्रश्नाचं उत्तर तिला देतां येत नव्हतं...परंतु तिला एवढं मात्र कळत होतं, कीं हरिप्रसादांचा आपल्यावर राग होईल असं कांहीं-देखील आपण कधीं करतां कामा नये...तिच्या मनोभूमीवर गुरुभक्ति आणि प्रेम यांचं द्वंद्व सुरू व्हायला अजून अवकाश होता...त्यामुळें

आपल्या हातून असा कोणता अपराध घडला कीं ज्यामुळें पितार्जीना राग यावा या शंकेनं ती व्याकुळ झाली...तितक्यांत वाद्यांच्या ताफ्यांतून निघणारा कोमल धैवताचा स्वर लांबून हवेंत तरंगला. पखवाजावर सम खणखणून वाजली. दिव्यांनीं उजळून टाकलेल्या रंगभूमीवर रंभानं हेमचंद्राबरोबर प्रवेश केला. तालाचे बोल पखवाजावर निघूं लागले. त्यांत छुम् छुम् ध्वनी मिसळूं लागले. अंधारलेल्या प्रेक्षागृहांत बसलेल्या हजारों प्रेक्षकांच्या आवरून धरलेल्या श्वासाचं जें एक उत्तेजक सान्निध्य ओळखण्याची तिला आतां संवय झाली होती त्याची जाणीव तिला होऊं लागली...तीं लयीशीं आणि तालाशीं एकरूप झाली. या एकतानतेंत इतर कोणत्याहि विचाराला अवकाश नव्हता...पितार्जींचा आपल्यावर राग व्हावा असं आपल्या हातून काय घडलं आहे म्हणून विचारणारं तिचं मन पार लुप्त झालं होतं...

# प्रकरण पांचवें

हेमचंद्राला उद्देशून हरिप्रसादांनीं एकदम संतापून उच्चारलेली ती शिवी ऐकून रंभाला आश्चर्याचा आणि दुःखाचा धक्का बसला.

गेलीं सहा वर्षं हरिप्रसादांच्या निकट सहवासांत तिनं घालविलीं होतीं, आणि या दीर्घ कालावधींत त्यांच्या तोंडून कुणालाहि उद्देशून अपशब्द बाहेर पडलेला तिनं ऐकला नव्हता. त्यांची विद्या आणि कला ज्याप्रमाणें गाढ आणि अलौकिक होती, आणि त्यांची राहणी व त्यांचा पोषाख हीं ज्याप्रमाणें उच्च कुलीन अभिरुचीला धरून होतीं, त्याप्रमाणेंच त्यांचं बोलणंचालणं अत्यंत शांत आणि सभ्य असे. एखाद्या वेळेस ते कुणावर रागावलेच तर " हात् तेरी " एवढाच निषेधाचा उद्‌गार त्यांच्या तोंडून बाहेर पडत असे. त्यांनीं आपली जीभ अपशब्दांनीं विटाळलेली तिला कधीं ठाऊक नव्हती...परंतु आतांशा हरिप्रसाद हेमचंद्रावर चटकन् रागावत आणि रागावले कीं त्यांच्या तोंडून वाईट शिवी बाहेर पडे.

असा प्रकार पूर्वीं दोन वेळां झालेला रंभाला आठवत होता. आतांची ही तिसरी वेळ होती...

या गोष्टीचं तिला ज्याप्रमाणें आश्चर्य वाटलं, त्याप्रमाणें दुःखहि झालं. कारण हरिप्रसादांनीं हेमचंद्रावर एकदम संतापावं असा कांहीं मोठा गुन्हाहि त्याच्या हातून झाला नव्हता. 'सवारी' तालांत त्याचं आणि तिचं एक नवं जोड नृत्य बसविण्याची तालीम चालली होती. हा ताल तेरा मात्रांचा असल्यामुळें सोळा मात्रांच्या त्रितालाचे तोडे त्यांत सफाईनं बसवितांना नाचाच्या आख्यानाकडे लक्ष ठेवून भावपूर्ण हालचाली करतां करतां एका विशिष्ट पवित्र्याच्या वेळेस सम साधणं कठिण जाणं साहजिक होतं. रंभाचीं स्वतःचीं पावलं बरोबर पडून ती अगदीं टीपबंद सम घेत होती. परंतु नृत्याच्या मेहनतीच्या आणि विद्येच्या दृष्टीनं कांहीं झालं तरी हेमचंद्र तिच्याहून कच्चा होता. या नव्या बसविल्या जाणाऱ्या नाचांत तिच्याबरोबर 'सवारी' तालांत नाचतां नाचतां मधेंच त्याच्या पावलांची लय हाले आणि मग समेवर तो क्षणभर तिच्याआधीं तरी येई किंवा नंतर तरी येई. आणि असं झाल्यावर त्रितालांतल्या तोड्यांची सोळा आवर्तनं संपवून सम आल्यामुळें जो विलक्षण परिणाम व्हायला हवा त्या परिणामांत न्यून उत्पन्न होत असे...

पण रंभा मनाशीं म्हणत होती, नृत्याच्या तालमींच्या वेळेस असल्या चुका व्हायच्याच...हरिप्रसादांनीं आपल्याला चंद्रलच्या बंगल्यांतल्या एकांतांत सतत चार वर्षं शिकविलं, तेव्हां आपण कितीदां चुकलों तें तिला आठवत होतं...हेमचंद्र चुकत होता यांत तिला नवल वाटत नव्हतं. त्याच्या चुकीपेक्षां त्या तालमीच्या वेळेस जो विलक्षण आनंद तिला मिळत होता त्या आनंदांत तिचं चित्त गुंतलेलं होतं. जाहीर प्रयोगाच्या वेळेस किंवा खाजगी मुजऱ्याच्या वेळेस नृत्य करतांना होणाऱ्या आनंदापेक्षांहि

एखाद्या नव्या नृत्याच्या तालमीच्या वेळचा आनंद रंभाला अधिक उन्मादकारक वाटत असे. जे तोडे घटून घटून पायांत बसून स्वतःच्या गतीशीं एकरूप होऊन गेले ते केवळ लोकांच्या चित्तरंजनासाठीं पायांतून काढतांना, अथवा जे अभिनय आणि ज्या मुद्रा अभ्यासानं पाठ होऊन शरीराच्या निरनिराळया अंगांत आणि चेहऱ्यांत भिनून गेल्या, त्यांचं प्रदर्शन लोकांसाठीं करतांना क्वचित् एखादे वेळेस तिला बेहोषीचा अनुभव येतहि असे; परंतु यापलीकडे त्या नृत्यप्रयोगांत विशेष आनंदाचा भाग नसे. हस्तगत केलेल्या कलेचं प्रदर्शन, आणि कलेंतली एखादी अवघड कृति हस्तगत करण्याची क्रिया, यांत केंव्हांहि मोठा फरक आहे. जें जिंकलं, आणि जिंकलं म्हणून शिळं होऊन गेलं, तें दाखविणं, आणि जें मुष्किल आहे तें जिंकण्यासाठीं झटणं, यांत केंव्हांहि मोठं अंतर आहे. रंभाला या अंतराचा प्रत्यय येत असे. आणि जाहीर अगर खाजगी प्रयोगांपेक्षां तालमींच्या वेळेस तिच्या जीवाला अवर्णनीय आनंद होत असे...हरिप्रसाद लोडाला टेकून बसून शिकवीत आहेत, सारंगी, व्हायोलिन, सतार अशा अनेक वाद्यांवर सुंदर लेहऱ्याची धून चाललेली आहे, बुंदूच्या हातांतल्या पखवाजांतून धीर गंभीर बोल सरळ अगर आडलयींत निघत आहेत, कृष्णलाल दोन दोन चार चार आवर्तनांचीं चक्रं अभिनय आणि मुद्रा यांसह नाचून दाखवीत आहे, सम जवळ आली कीं हरिप्रसाद तिला उद्देशून ' हां , चलो बेटी ' असा इशारा देत आहेत, ती नाचूं लागत आहे, त्या त्या सांकेतिक मात्रेवर तिच्या पायांतील घुंगुरांचा छुम् छुम् असा आवाज होत आहे, " बहोत अच्छा बेटी ! ", " ठीक है ! " " वा, वा ! ", " अब काल आया, ध्यान रखना बेटी " असे विलक्षण उत्तेजक उद्गार हरिप्रसादांच्या तोंडून बाहेर पडत आहेत, तालाचं अंतर ती कापीत चाललेली आहे, आवर्तनांचं चक्र संपून जवळ येत चाललेली सम तिला स्पष्ट दिसत आहे, आणि अखेर समेच्या जागेवर कोणी तरी जणुं आपली वाट पाहात

उभं आहे आणि त्याच्या हातांत हात घालण्यासाठीं आपण झेप घेत आहोंत असा भास होत आहे—अशा प्रकारचं जें वातावरण तालमीच्या वेळेस निर्माण होत असे तें तिला विलक्षण उन्मादकारक वाटत असे. कांहीं तरी मुष्किल असं आपण हस्तगत करीत आहोंत या भावनेच्या आल्हादानं तिच्या साऱ्या अंगावर रोमांच उठत असत. नव्या नृत्याच्या तालमीच्या वेळेस ती नेहमींच अतिशय प्रसन्न वृत्तींत असे...

हेमचंद्र आल्यापासून तालमीला एक नवीन मजा आली होती. आणि हेमचंद्राविषयीं तिला आकर्षण वाटूं लागल्यापासून या सुखाला कांहीं एक निराळीच टवटवी आली होती. हेमचंद्राबरोबर तालमीला उभं रहायचं म्हटलं कीं तिचा जीव अगदीं हरखून जात असे...

आज ‘ सवारी ’ तालांतल्या जोड नृत्याची तालीम सुरू झाली, तेव्हां ती या सुखाच्या उत्कटतेचा अनुभव घेत होती. लय रेसभरदेखील न सोडतां तिच्याबरोबर समेवर येण्यांत हेमचंद्रानं दोन वेळां चूक केली. पण त्या चुकीचं महत्त्व तिला वाटलं नाहीं. आणखी नाचण्यानं ती चूक नाहींशी होईल याची तिला खात्री होती. दर वेळेस हातांतला हेमचंद्राचा हात हळूंच दाबून त्याच्याकडे हंसत पाहून ती म्हणाली होती, “ पुन्हां एकदां ! ”, आणि बुंदूकडं पाहून ठेका पुन्हां सुरू करण्याबद्दल तिनं त्याला इशारा दिला होता. तिसऱ्या खेपेस आवर्तनाच्या जवळ जवळ अखेरीपर्यंत हेमचंद्रानं लय अगदीं उत्कृष्ट संभाळलेली तिला कळली होती, आणि नृत्यांतील भाव तोंडावर दाखवितां दाखवितां कुणाच्याहि लक्षांत येऊं नये अशा बेतानं हेमचंद्राला डोळयांची खूण करून तिनं सांगितलं होतं, ठीक आहे, अगदीं ठीक चाललंय, आतां अवघ्या अकरा मात्रा उरल्या, त्या नीट संभाळून भर म्हणजे पिताजी तुला शाबासकी देतील. पण काय झालं कुणास ठाऊक अखेर हेमचंद्राचीं पावलं किंचित् रेंगाळूं लागलीं, आणि

तिच्याबरोबर समेवर येण्याऐवजीं तो नंतर आला. तें अंतर खरोखर निमिषार्धाचंसुद्धां नसेल. सामान्य माणसाच्या लक्षांत तें येण्यासारखं नव्हतं. परंतु रेडियमसारखी अतिमोलाची वस्तु तोलण्याचा कांटा जसा अगदीं सूक्ष्म असतो व त्याची केंसभरदेखील हालचाल जशी तज्ञाला कळते तशी लयींतली निमिषाधार्ची देखील कसर जाणकाराला कळते, आणि ती कळल्याबरोबर त्याचा विलक्षण रसभंग होतो......आपण पुन्हां चुकलों ही गोष्ट स्वतः हेमचंद्राच्या देखील लक्षांत आली. त्यानं चेहरा वाईट केला. रंभानं त्याचा हात पुन्हां दाबला. ती त्याला म्हणणार होती. "हरकत नाहीं. पुन्हां—"

पण तितक्यांत हरिप्रसादांनीं एकदम हेमचंद्राला उद्देशून एक अतिशय वाईट शिवी दिली होती !

ती ऐकून रंभाला आश्चर्याचा आणि दुःखाचा धक्का बसला. तिला हरिप्रसादांचा थोडा रागदेखील आला. तिच्या मनांत आलं, ज्या शब्दांचा उच्चार पिताजींच्या जिभेला विटाळासारखा आजपर्यंत वाटत असे ते हे शब्द त्यांनीं हेमचंद्राला उद्देशून अगदीं सहजासहजी उच्चारावे ! आणि ते देखील बुंदू, कृष्णलाल, वाद्यं वाजविणारे हजर असतांना ! पिताजींनीं असं कां वागावं ? हेमचंद्रानं त्यांचा असा कोणता अपराध केलाय कीं आतांशा त्यांनीं क्षुल्लक कारणांवरून त्याच्यावर रागावावं, आणि त्याला टाकून बोलावं ?..."

हे प्रश्न आतांशा तिच्या मनांत अनेक वेळां येत असत. तिला स्वतःला या प्रश्नांचं उत्तर प्रथम कांहीं दिवस कळत नसे. परंतु हळूं हळूं या प्रश्नांचा उलगडा तिला होऊं लागला होता. हेमचंद्र आपल्यावर प्रेम करतो व आपणहि त्याच्यावर प्रेम करतों या गोष्टीचा राग पिताजींना आलेला आहे, तसं ते स्पष्ट बोलून दाखवीत नाहींत, परंतु त्या रागाची खोल

अढी त्यांच्या मनांत आहे, ही गोष्ट तिनं हलके हलके ओळखली होती. आणि ती लक्षांत आल्यावर तिला असा चमत्कार वाटला होता कीं मी आणि हेमचंद्र एकमेकांवर प्रेम करतों यांत पिताजींनीं रागवावं असं काय आहे ? "रागावूं दे त्यांना. कोण विचारतो त्यांच्या रागाला ?" असं हेमचंद्रानं म्हटलं कीं पूर्वीं ती चटकन् त्याला म्हणत असे, "छे, छे! असं आपण कधीं म्हणतां कामा नये." पण तिची ती वृत्ति आतां पालटूं लागली. हरिप्रसादांच्या हेमचंद्रावरील रागाचाच तिला राग येऊं लागला. त्यामुळें आतां हेमचंद्रावर संतापून हरिप्रसादांनीं त्याला शिवी दिलेली तिनं ऐकली तेव्हां तिला आश्चर्य वाटलं, दुःख झालं, आणि रागहि आला.

तिच्या तोंडापाशीं आलेले पण तसेच राहिलेले शब्द तिनं उच्चारले. ती हेमचंद्राला म्हणाली, "हरकत नाहीं. पुन्हां." आणि बुंदूकडे वळून ठेका सुरू करण्याचा इशारा देऊन ती त्याला म्हणाली, "चलो." समोर उभ्या राहिलेल्या कृष्णलालकडे पाहून ती हंसलीदेखील. तिचं आणि हेमचंद्राचं उजवं पाऊल पुढें पडलं 'छुम्' असा आवाज झाला.

पण तितक्यांत हरिप्रसाद मोठ्यांदा ओरडले, "पुन्हां नाचायला कशाला लागलांत ? कुणी सांगितलं ? बंद करा !"

रंभा मान मुरडून त्यांच्याकडे पाहून म्हणाली, "पण पिताजी, आतां बरोबर येईल. बघा तरी."

ते कपाळाला आंठ्या घालून म्हणाले, "चूप ! मला शिकवूं नकोस. बरोबर काय येणार कपाळ !" हेमचंद्राकडे अगदीं तिरस्काराची दृष्टि टाकून ते पुटपुटले, "याचं लक्ष विद्येकडे आहे कुठें ?" आणि पुन्हां रंभाकडे पाहून ते म्हणाले, "आणि तुझं तरी आहे कुठें ? तुम्हांला दोघांना विद्या नकोशी झाली आहे. निराळ्याच गोष्टीमागं तुम्ही दोघं धांवत आहांत. मला डोळे नाहींत असं तूं समजतेस कीं काय ?"

रंभा म्हणाली, " पण पिताजी—"

" चूप ! बेअकल कुठली ! " हरिप्रसाद गरजले. " तुला एवढी शिकवली, इतकी विद्या दिली, इतकी मोठी केली, पण तुला गाढवच व्हायचं असलं तर मी काय करूं ? हो गाढव ! खा शेण ! पण मग कलेची उपासना अजिबात सोडून द्या. बंद करा तालीम. आपापल्या खोल्यांकडे निघून जा. मला एकट्याला इथें बसूं द्या ! "

त्यांच्या या इच्छेला मान देणं साऱ्यांना भागच होतं. कृष्णलाल मुकाट्यानं निघून गेला. बुंदूनं पखवाज गुंडाळला. वाद्यमेळांतलीं मंडळी आपापलीं वाद्यं घेऊन खालीं माना घालून उठून गेली. हेमचंद्रहि चालता झाला. दाराबाहेरून त्यानं तिला खूण केली, उभी काय राहतेस ! चल. पण तिनं त्याचं म्हणणं ऐकलं नाहीं. ती जागच्या जागींच थबकून उभी राहिली.

हरिप्रसादांनीं तिला विचारलं, " काय ग, तूं कां उभी राहिलीस ? "

ती त्यांच्याजवळ गेली, आणि तिनं खालीं वांकून त्यांच्या पायांना हात लावला.

ते म्हणाले, " हीं सारीं सोंगं कळतात मला. माझ्या पायाला हात कशाला लावतेस ? "

रंभा धीर करून म्हणाली, " पिताजी, मला तुमच्याशीं कांहीं बोलायचं आहे ? "

" काय बोलायचं आहे ? "

" पूर्वीसारखी तुमची माझ्यावर ममता राहिली नाहीं काय ? "

ते म्हणाले, " माझी पुष्कळ राहील. तुला ती कुठें हवी आहे ? "

" असं कसं म्हणतां पिताजी ? तुमच्या ममतेवर मी जगलें, मोठी झालें. तुमच्यावांचून मला कोण आहे ? "

ते म्हणाले, " कोण असावंसं तुला वाटतं तें तूं आपल्या मनाला विचारून बघ. "

त्यांच्या बोलण्याचा अर्थ रंभाला कळत होता. परंतु तो आपल्याला कळला असं तिला दाखवायचं नव्हतं. ती म्हणाली, " पिताजी, मला एवढं कळतं कीं कशाबद्दल तरी तुम्ही आतांशा माझ्यावर विनाकारण रागाची अढी धरली आहे. कशाबद्दल तुम्ही माझ्यावर रागावलां आहांत तें मला एकदां स्पष्ट सांगा. तुमचा कोणता गुन्हा मीं केला आहे ? "

हरिप्रसादांनीं तिच्याकडे कांहीं वेळ रोखून पाहिलं. बोलण्यासाठीं त्यांचे ओठहि हालले, पण ते गप्प राहिले, व कांहीं वेळ तिच्याकडे नुसतं रागानं पाहून ते म्हणाले, " तूं माझा गुन्हा केलेला नाहींस. तो केला असतास तर मी तुझ्यावर रागावलों नसतों. तूं आपल्या विद्येचा गुन्हा करते आहेस. स्वतःचा घात करून घेते आहेस. तुला एकदां सारं सांगणार आहे मी. पण आतां नाहीं सांगत. या वेळेस तुझ्याशीं बोलण्याची माझी इच्छा नाहीं. मला एकट्याला राहूं दे. जा तूं. जा म्हटलं ना ! "

रंभा कांहीं वेळ उभीच राहिली. मग तिनं वांकून त्यांच्या पायाला पुन्हां स्पर्श केला, आणि ती तेथून निघाली.

ती हेमचंद्राच्या खोलींत गेली पण तिथें तो नव्हता. तो कुठें गेला म्हणून तिनं एकदोघांना विचारलं. परंतु कुणाला सांगतां आलं नाहीं. कारण त्यांचा मुक्काम आदल्या दिवशींच या नव्या शहरीं आला होता, व त्यामुळें बहुतेक माणसं आपापली व्यवस्था लावून घेण्यांत गुंतलेली होती. ज्या बंगल्यांत इथला मुक्काम पडला होता तो थिएटरपासून जवळ होता, आणि खूप मोठा होता, एवढंच रंभानं पाहिलं होतं. त्या बंगल्याचे सारे भाग तिला अजून धड माहितहि नव्हते. हेमचंद्राला शोधण्यासाठीं ती हिंडूं लागली तेव्हां बंगल्याचं एक एक दालन तिच्या प्रथमच दृष्टीस पडूं

लागलं. सगळयांत शेवटच्या दालनापलीकडच्या गच्चीवर जाऊन तिनं वाकून पाहिलं तों खालच्या बाजूस एक मोठा फरसबंद चौक, आणि त्या चौकाच्या पलीकडे असलेली बाग तिला दिसली. त्या बागेंत एका झाडा-खालच्या दगडी चौथऱ्यावर हेमचंद्र बसलेला होता. तिला वाटलं, टाळी वाजवून त्याला हाक मारावी, आणि त्याला वर बोलवावं. परंतु तिचा हा विचार लगेच बदलला. ती स्वतः गच्चीच्या भिंतीपासून दूर झाली, जिन्याकडे गेली आणि खालीं धांवली.

हेमचंद्रापुढें उभं राहून ती म्हणाली, " तुमच्या खोलींत तुम्हांला पाह्यलं, बंगल्यांत सगळीकडे शोधलं, पण तुम्ही कुठंच दिसलां नाहींत. इकडे असाल अशी मला कल्पना नव्हती. बंगल्याच्या या बाजूला बाग असेल अशी देखील कल्पना नव्हती. "

आजूबाजूस दृष्टि टाकल्याप्रमाणें करून आणि किंचित् हंसून हेमचंद्र म्हणाला, " या जागेला बाग म्हणायचं म्हणजे जुलूम ! "

त्याचं म्हणणं खरं होतं. या ठिकाणीं मागं कधीं काळीं ताजी टवटवीत बाग असेलहि. परंतु आतां त्या जागेचा बागपणा शिल्लक राहिला नव्हता. या जागीं फुलांचीं झाडं नव्हतीं. कुंड्या नव्हत्या. मधोमध असलेल्या छोट्या कारंज्यांत पाणी नव्हतं. फक्त एका कडेला दोन तीन मोठालीं पिंपळाचीं झाडं होतीं, व त्यांतल्या एकाखालीं दगडी चौथरा होता. हें सारं पाहिल्या-सारखं करून रंभा म्हणाली, " परंतु ही जागा किती निवांत आणि शांत आहे. हिलां बागच म्हणूं या आपण. काय हरकत आहे ? "

" तुला इतकी आवडली ही जागा ? "

" हं "

" या बागेच्या पाठीमागचा तो दरवाजा पाहिलास ? तो उघडला कीं आपण कुठें जाऊं अशी तुझी कल्पना आहे ? "

रंभाच्या भुंवया उचलल्या गेल्या. तिचे ओठ विलग झाले. तिनं हंसत विचारलं, " कुठें ? "

तो उठला आणि तिचा हात हलकेंच धरून तिला ओढीत म्हणाला, " तुला प्रत्यक्षच दाखवितों. "

त्यानं तिला दाराकडे नेलं. दाराच्या चौकटीच्या अलीकडे दुधाणीचीं रानझाडं खूप माजलीं होतीं, आणि त्यांच्या पांढऱ्या नखाएवढाल्या नाजुक फुलांचे ठिपके हिरव्या शालूवर केलेल्या भरतकामासारखे दिसत होते. तीन चार फुलपाखरं इथें तिथें बसलीं होतीं. त्यांच्या पाकळ्यांसारख्या नाजुक ठिपकेदार पंखांची उगीच शंका यावी इतकीच थरथरती हालचाल होत होती. हेमचंद्राला ती म्हणाली, " बघा तरी. " पण ती काय बघा म्हणते आहे तें हेमचंद्राला नीटसं कळलं नाहीं. तरी तो हंसला. जणुं तिच्या कंठांतून बाहेर पडणारा मधुर आवाज त्याच्या आनंदाला पुरेसा होता. त्यानं दार उघडलं तेव्हां फार दिवसांत उघडल्या न गेलेल्या दाराचा व्हावा तसा आवाज झाला. बाहेरच्या बाजूला हातानं दाखविल्यासारखं करून हेमचंद्र तिला म्हणाला, " पाहिलंस ? " तिनं आपल्या तोंडाला हात लावला आणि उद्गार काढला, " अगबाई ! "

रानगवतानं पुसट झालेली छोटीशीं वाट सरळ थिएटरच्या आंगणांतच जाऊन पोंहचलेली दिसत होती.

हेमचंद्रानं सांगितलं, " बंगल्यापुढचा मोठा रस्ता थिएटराच्या पुढच्या आंगणांत जातो. ही मागची वाट आहे. "

तीं दोघं दाराच्या चौकटींत कांहीं वेळ तशीच बघत उभीं राहिलीं. मग तीं हलकेंच परत फिरलीं, आणि दरवाजा तसाच उघडा टाकून झाडाखालच्या चौथऱ्याशीं आलीं. हेमचंद्र बसला आणि तिला म्हणाला, " ये. बसूं या कीं जरा. "

ती बसली. कांहीं वेळ दोघंहि कांहीं बोललीं नाहींत. मग रंभा त्याला म्हणाली, " पिताजींवर तुम्ही रागावतां कामा नये हं. "

हेमचंद्र हंसला व म्हणाला, " जाऊं दे तो विषय, खरं म्हणशील तर तो मी विसरूनसुद्धां गेलों होतों. "

रंभा पुन्हां म्हणाली, " तुम्ही पिताजींवर रागावतां कामा नये. "

हेमचंद्र गंभीर चर्या करून म्हणाला, " तूं मला हें सांगायला का हवंस ? हरिप्रसादांचा अधिकार फार मोठा आहे. त्यांनीं मला शिवी दिली तरी ती मुकाट्यानं मीं ऐकली पाहिजे. तुला ते किती पूज्य आहेत हें मला विसरतां येत नाहीं. तूं त्यांना जितकं मानतेस तितकंच मी देखील मानतों. आणखी शिवाय—"

बोलतां बोलतां तो गप्प झाला म्हणून तिनं विचारलं, " शिवाय काय ? "

तो म्हणाला, " मनाशीं मीं निश्चय केलेला आहे कीं एकीकडे हरिप्रसाद रागानं कितीहि बोलले तरी तें निमूटपणें सहन करायचं, आणि दुसरीकडे मला जें हवं असं मी ठरविलं आहे तें कांहीं सोडायचं नाहीं. "

तिनं एकदम विचारलं, " काय हवंय ? विद्या ? "

" विद्या तर हवीच आहे. पण त्यापेक्षां आणखी कांहीं तरी हवं आहे."

" असं ? काय ? "

त्यानं उत्तर न देतां तिच्याकडे हंसत पाहिलं. मग त्यानं विचारलं. " मला काय हवंय तुला माहित नाहीं ? "

तिनं मान वळवून खालीं पाहिलं, आणि ती म्हणाली, " अगबाई ! हें पाहिलंत का इथें काय आहे ? " हेमचंद्रानं तिनं हातांत उचलून घेतलेलीं फुलं पाहिलीं आणि म्हटलं, " बकुळीचीं फुलं ! "

ती म्हणाली, “ इथें या चौथऱ्यावर कशीं आलीं ? या आवारांत तर बकुळीचं झाडं दिसत नाहींत.”

तो म्हणाला, “ कुणी तरी इथें येऊन बसत असेल आणि त्यानं हीं फुलं आपल्याबरोबर आणलेलीं असतील.”

रंभाच्या मनांत आलं, त्याला विचारावं, “ कल्पनाच करायची तर कुणी एकटंच माणूस इथं येऊन बसलं असेल अशी कां करायची ? ”

पण तितक्यांत गच्चीवरून कुणी तरी हेमचंद्राला हांक मारली. त्या दोघांनीं वर पाहिलं. बुंदू हेमचंद्राला सांगत होता “ तुम्हांला भेटण्यासाठीं कुणी लोक आलेले आहेत.”

“ आलोंच म्हणून सांग.” असं म्हणून हेमचंद्र एकदम चौथऱ्यावरून खालीं उतरला. गच्चीवर आलेला बुंदू निघून गेला. रंभा उतरूं लागली तेव्हां हेमचंद्रानं तिचा हात धरला. उतरल्यानंतर तिनं आपल्या हातांतलीं फुलं त्याच्या हातावर ठेवलीं, आणि तो जेव्हां तिच्याकडे पाहून हंसूं लागला तेव्हां तिनं लाजून मान खालीं घातली. मग कांहीं तरी असंबद्ध बोलल्याप्रमाणें ती म्हणाली, “इथें जवळच कुठें तरी बकुळीचं झाड असलं पाहिजे.”

× × ×

त्या दिवशींच्या रात्रींचा रंभाच्या नृत्याचा त्या शहरांतला पहिलाच जाहीर प्रयोग होता. नेहमींप्रमाणें थिएटर प्रेक्षकांच्या गर्दीनं फुलून गेलं होतं. सुरवातीच्या ‘ रंगपूजा ’ नृत्यांत रंभा एकटीच नाचणार होती. पडदा उघडण्यापूर्वीं ती विंगमध्यें उभी होती. ठरलेली वेळ झाली कीं रंगभूमीवर मांडलेल्या नटराजाच्या मूर्तीपुढें जाऊन हात जोडलेल्या पवित्र्यांत ती उभी रहाणार होती. मग वाद्यांच्या ताफ्यांतून हमीर रागिणीचे स्वर निघूं

लागणार होते. पडदा उघडणार होता...रंगभूमीवर आपल्या जागीं जाऊन राहण्याचा इशारा समोरच्या विंगमध्यें उभा राहिलेला स्टेजमॅनेजर देईल तो पाहण्यासाठीं रंभा लक्ष देऊन उभी होती...

इतक्यांत हेमचंद्र तिच्याजवळ आला, व कांहीं न बोलतां तिचा हात हळूंच ओढून घेऊन तिनं त्याला सकाळीं दिलेलीं बकुळीचीं फुलं त्यानं तिच्या हातावर ठेवलीं. ती हंसली आणि त्याच्याकडे पहात राहिली. नंतरच्या नृत्यांत तिच्या जोडीनं नाचण्याच्या वेळेस करावयाचा पोषाख त्यानं अर्धवट केला होता. तोंड अर्धवट रंगवलं होतं. अलंकार अर्धवट घातले होते. तिच्या मनांत आलं नेहमींहून किती निराळा दिसतो हा!... ती हळूंच म्हणाली, " कोण तुम्ही ? मी तुम्हांला ओळखलं नाहीं. "

तो हंसला आणि म्हणाला, " या फुलांवरून कांहीं ओळख पटली तर पहा. "

ती म्हणाली, " हो. हीं फुलं मात्र आज सकाळीं मी कुणातरी ओळखीच्या गृहस्थांना दिलीं होतीं खरी. "

" फक्त ओळखीच्याच ? "

" तर काय ? " असं म्हणून तिनं त्याला दूर लोटलं. आणि त्याच वेळेस समोरच्या विंगमधल्या माणसानं इशारा दिल्यामुळें ती लगबगीनं पुढें होऊन रंगभूमीवर गेली, आणि नटराजाच्या मूर्तीपुढें उभी राहिली... नंतर वाद्यांच्या मेळांतून हमीर रागिणीच्या स्वरांची धून उठली, पखवाजावर सम वाजली, पडदा उघडला गेला, नेहमींप्रमाणें टाळ्यांचा गजर झाला, तिचं पहिलं नृत्य सुरू झालं.

परंतु नृत्य करतां करतां तिच्या मनांत बकुळीच्या फुलांची आठवण सारखी येत होती.

त्या एकाच नृत्याच्या वेळेस नव्हे, कार्यक्रमांतलीं सारींच नृत्यं करतांना! तिनं तीं फुलं अगदीं जपून ठेवलीं होतीं आणि सारा कार्यक्रम आटपला, रंग पुसून थिएटरांतून बिऱ्हाडीं जाण्यासाठीं साऱ्या मंडळींची धांदल सुरू झाली, तेव्हां हळूंच हेमचंद्राजवळ जाऊन तिनं तीं त्याच्या हातांत परत दिलीं.

तीं घेऊन त्यानं विचारलं, " आतां तरी ओळख पटली का ? "

तिनं मान हालविली. ती हालविल्याबद्दल तिचं तिलाच खुदकन् हंसूं आलं. मग ती हलकेंच त्याला म्हणाली, " आटपलं कीं नाहीं तुमचं ? जाऊं या. "

तो म्हणाला, " आटपलंच कीं. चल."

थिएटरच्या पुढच्या आंगणाच्या दाराकडे जाण्याऐवजीं मागच्या आंगणाच्या दाराकडे त्यानं पावलं टाकलीं. ती त्याच्या मागोमाग निघाली. त्या आंगणांतून पुढे गेल्यावर रानगवतानं पुसट केलेली एक पायवाट चांदण्यांत दिसत होती. त्या वाटेनं तीं दोघंहि जाऊं लागलीं. पुढच्या बाजूच्या मोठ्या रस्त्यानं बंगल्यावर जाण्याऐवजीं या मागच्या बाजूनं बागेतून जाण्याची कल्पना त्या दोघांपैकी एकानंहि दुसऱ्याजवळ बोलून दाखविली नव्हती. पण जणुं हा गुप्त संकेत उभयतांनीं एकमेकाला विचारून ठरविल्याप्रमाणें तीं दोघं चाललीं होतीं. कुणीच कुणाशीं बोलत नव्हतं. फक्त दोघांचे हात आपोआप एकमेकांत गुंतले होते आणि हातांच्या बोटांची भाषा चालू होती. दोघंहि एकमेकांना म्हणत होतीं, " माझ्याहि मनांत बागेंत जायचं होतं. तूं कसं ओळखलंस ? " वाट संपल्यावर दरवाजापाशीं तीं दोघं आलीं. दरवाजा उघडाच होता. तीं आंत शिरलीं आणि घाईनं चौथऱ्याकडे गेलीं. त्यानं वर पाहिलं. तिनंहि पाहिलं. आभाळ अगदीं स्वच्छ होतं. चंद्राचा मंद सुखकारक प्रकाश जिकडे

तिकडे पसरला होता. त्यानं बाजूला पाहिलं; तिनंहि पाहिलं. सगळीकडे अगदीं शांत होतं. तो चौथऱ्यावर बसला, आणि तिनं बसावं म्हणून त्यानं तिला हलकेंच उचललं. दोघांचीहि नजर चौथऱ्याकडे गेली आणि दोघांनीं एकमेकांकडे आश्चर्यानं पाहिलं. कारण चौथऱ्यावर बकुळीच्या ताज्या फुलांचा एक लहानसा थरच्या थर त्यांना दिसला !

तीं फुलं झाडावरून पडल्यासारखीं दिसत नव्हतीं. आणि ज्यावरून तीं पडतील असं बकुळीचं झाडहि त्या ठिकाणीं नव्हतं ! दोघांच्याहि मनांत विचार आला, मग हीं ताजी फुलं इथें कुठून आलीं?...या चौथऱ्यावर बसण्यासाठीं दिव्य लोकांतले कुणी प्रेमिक तर रोज रात्रींच्या वेळेस येऊन जात नसतील ? त्यांच्या शृंगाराची तर ही साक्ष नसेल ?—असा विचार दोघांच्याहि मनांत एकदम आल्याप्रमाणें त्या दोघांनीं एकमेकाकडे पाहिलं. तीं दोघं एकमेकांशीं एक शब्ददेखील न बोलतां चांदण्याच्या मंद प्रकाशांत दिसणाऱ्या एकमेकाच्या तोंडाकडे फक्त पहात कांहीं वेळ राहिलीं...मग हेमचंद्रानं तिला चौथऱ्यावर बसविण्याऐवजीं दोन्ही हातांनीं धरून आपल्या छातीशीं टेकलं, आणि तिच्या केसांवर आपली हनुवटी घांसली...तिचा डावा हात चौथऱ्यावरच्या फुलांवर पडला होता. त्याच्या छातीवर टेकलेली मान न हालवितां तिनं बोटांच्या अलगद हालचालींनीं फुलं गोळा केलीं, आणि मग तो हात हळूंच वर करून तिनं तीं फुलं त्याच्या नाकाजवळ नेलीं...त्या फुलांचा सुगंध घेतल्याबरोबर हेमचंद्राच्या साऱ्या वृत्ती उचबळून आल्या, आणि त्यानं आपल्या दोन्ही हातांची पकड थोडीशीं चाळवून तिला जरा उंच उचलल्यासारखं केलं. त्यामुळें त्याच्या छातीवर असलेली तिची मान वर झाली. तिचं तोंड त्याच्या तोंडाजवळ आलं. अंगाअंगांतून कोणत्या तरी अननुभूत इच्छेच्या भरतीची लाट उसळल्या-प्रमाणें रंभा विवश आणि घाबरी झाली. त्या लाटेंतून सुटण्यासाठीं तिनं

आपल्या दोन्ही हातांची मिठी हेमचंद्राभोंवतीं टाकली, आणि ती मानहि खालीं करणार होती. परंतु तसं तिला करतां आलं नाहीं. कारण हेमचंद्रानं तिचे ओठ अगदीं अलगद पण दृढपणानं आपल्या ओठांनीं धरले होते. तिचे ओठ त्याच्या ओठांच्या स्वाधीन झाले होते! ती त्याच्या स्वाधीन झाली होती! भरतीच्या लाटेपुढें तिची स्वतंत्र इच्छा, तिचा स्वतंत्र विवेक, तिचं स्वतंत्र जीवित, हीं सारीं कोठच्या कोठें दूर फेंकलीं गेलीं होतीं!...

यानंतर रोजच रात्रीं थिएटरवरून परतल्यानंतर हेमचंद्र आणि ती या वाटेनं येऊन बगीचांतल्या चौथऱ्यावर बसूं लागलीं.

संकेत स्थळींच्या या गुप्त भेटी हरिप्रसादांना कळतील अशी त्या दोघांची कल्पना नव्हती.

पण एके दिवशीं हरिप्रसादांनीं कांहीं कामासाठीं रंभाला आपल्या खोलींत बोलावलं आणि कांहीं वेळ तिच्याशीं शांतपणें बोलल्यानंतर ते एकदम तिला म्हणाले, "बेटी, इथें माझ्याजवळ ये आणि या खिडकींतून किती चांगला देखावा दिसतो तें बघ तरी."

"होय?" असं आनंदानं म्हणून, खिडकीजवळ जाऊन तिनं बाहेर डोकावून पाहिलं. आणि तसं पाहतांच तिच्या छातींत एकदम धस्स झालं!

कारण त्या खिडकींतून चौकापलीकडच्या त्या बागेंतल्या चौथऱ्याची जागा नेमकी दिसत होती!...हरिप्रसादांनीं तिच्या आणि हेमचंद्राच्या चांदण्यांतल्या रोजच्या गांठी पाहिल्या असल्या पाहिजेत!

हरिप्रसाद म्हणाले, "पाहिलंस बेटी, किती चांगली बाग आहे. वृक्षांनीं आच्छादिलेला किती सुंदर दगडी चौथरा आहे! त्या ठिकाणीं रात्रीच्या चांदण्यांत निवांत बसण्यांत किती मौज असेल. आणि—"

आतां हरिप्रसादांची कोणती बोलणी ऐकावीं लागणार त्याची कल्पना रंभाच्या मनांत एकदम आवेगानं आली. तिला वाटलं, कांहीं तरी जादू-

मंतर करून इथून एकदम अदृश्य होतां येईल तर फार बरं होईल. खिडकींतून बाहेर काढलेलं तोंड आंत घेऊन वळण्याचा तिला धीरच होईना. ती तशीच बाहेर बघत उभी राहिली.

हरिप्रसादांचा आवाज तिला ऐकूं आला. "बेटी!" परंतु तिनं मान वळविली नाहीं. ते पुन्हां म्हणाले, "बेटी!" ती खिडकीपासून दूर झाली. तिनं विचार केला, आतां इथें क्षणभरदेखील उभं रहायचं नाहीं. आपल्या खोलीकडे धूम ठोकायची. हरिप्रसादांच्या तोंडचे संतापाचे उद्‌गार बाहेर पडूं लागण्याच्या आंत—

पण हरिप्रसादांनीं तिचा हात धरला. तिनं त्यांच्याकडे पाहिलं. तिला वाटलं होतं, हरिप्रसादांची चर्या अगदीं क्रुद्ध झालेली आपल्याला दिसेल. पण तिनं पाहिलं तों त्यांच्या चेहऱ्यावर राग नव्हता. उलट एखादं अतीव दुःख सोसावं लागत असल्याप्रमाणें आणि तें दुःख तिला उघड करून दाखविण्यास अधीर झाल्याप्रमाणें त्यांची मुद्रा तिला दिसली. क्षणापूर्वी तिच्या मनांत आलेले विचार आतां त्यांची ती मुद्रा पाहून पालटले. आणि ते जेव्हां अगदीं हळूं आवाजांत, आर्जव केल्याप्रमाणें "बेटी!" असं पुटपुटले तेव्हां त्यांच्याविषयींच्या तिच्या मनांतल्या साऱ्या मृदु भावना एकदम जाग्या झाल्या. "पिताजी!" असा उद्‌गार तिच्या तोंडांतून बाहेर पडला...

हरिप्रसादांनीं तिला खालीं बसायला लावलं. "बेटी!" ते म्हणाले, "मी कांहीं सांगितलं तर तूं ऐकशील कां?"

तिनं त्यांच्याकडे पाहण्याऐवजीं नजर खालीं केली आणि मान हालविली.

हरिप्रसाद म्हणाले, "माझं तुझ्यावर किती प्रेम आहे तें तुला माहित आहे ना? पोटच्या मुलीपलीकडे मीं तुझा सांभाळ केला, तुला विद्या

दिली, तूं मोठी झालीस, माझ्या आयुष्यांतली एक मोठी महत्त्वाकांक्षा पूर्ण झाल्याचं सुख तूं मला दिलंस, तूं आणखी आणखी विद्या माझ्यापासून घेशील, तुझी कीर्ति वाढेल, माझा लौकिक आणखी शतपटींनीं वाढलेला मी पाहीन, असे मनोरथ मी रचलेले आहेत, हें तुला माहीत नाहीं काय ? अशी नुसती मान हालवूं नकोस. माझ्याकडे बघ आणि बोल. कलेची भक्ति तुझ्या अंतःकरणांत आहे ना ? तुझी महत्त्वाकांक्षा जागी आहे ना ? माझ्याविषयींचं प्रेम आणि मी तुला जें सांगेन तें तुझ्या कल्याणासाठींच सांगेन याबद्दलची खात्री अढळ आहे ना ?...नुसतं मानेनं सांगूं नकोस. मान वर कर. माझ्याकडे बघ, आणि तोंडानं बोल."

रंभानं चटकन् वर मान करून त्यांच्याकडे बघितलं आणि ती म्हणाली, "पिताजी, हें तुम्ही काय विचारतां आहांत ? माझ्या मनांत तुमच्याविषयीं जो आदर आहे त्यांत केसभरसुद्धां उणेपणा उत्पन्न झालेला नाहीं."

हरिप्रसाद म्हणाले, "माझ्या शब्दावर तुझी श्रद्धा अजून आहे ?"

"आहे. तुम्ही माझे गुरु आणि पिते आहांत."

"मला दुःख देणारी गोष्ट हातून घडूं नये असं तुला वाटतंय ?"

रंभाच्या मनांत आलं, यांच्या या बोलण्याचा हा काय छळ ?...ते कोणत्या गोष्टीला उद्देशून दुःख दुःख म्हणत होते तें तिला कळत होतं. त्या गोष्टीनं त्यांना दुःख होण्याचं कारण काय तें मात्र तिला कळत नव्हतं. आणि आपल्या हातून त्यांना दुःख देणारी एखादी गोष्ट घडावी असं तिला वाटत नव्हतं. या साऱ्या भावना एकमेकींशीं विरोधी होत्या. त्या सगळ्याच मनांत वागविणं क्लेशकारक होतं...तिला वाटलं, हा काय छळ ? हेमचंद्राविषयीं तिला जें कांहीं वाटत होतं तें अंतःकरणांतून काढून टाकलं तर त्या अंतःकरणाचे लगेच तुकडे होतील असं भय तिला वाटत होतं. उलट हरिप्रसादांनां दुखविण्याची कल्पनाहि तिला

असह्य वाटत होती...ही काय चमत्कारिक गुंतागुंत ? हा काय विलक्षण छळ ?...

हरिप्रसादांनीं तिला विचारलं, " मला दुःख द्यावंसं तुला वाटतं ? "

तसं तिला खरोखरच मनापासून कधीं वाटणंच शक्य नव्हतं. ती प्रेमांत सांपडली होती. त्या प्रेमांत केवढं अवर्णनीय सुख भरलेलं आहे, तें अनुभवीत होती. तें प्रेम तिच्या जीविताचा एक भाग होऊन बसलं होतं...परंतु उलट हरिप्रसादांबद्दलची कृतज्ञता, त्यांच्या मोठेपणाचा आदर, तिच्याविषयीं त्यांनीं जी महत्त्वाकांक्षा बाळगली होती ती पुरी करण्याची मनस्वी इच्छा, या साऱ्या गोष्टीदेखील तिच्या जीविताचा एक भाग पूर्वींच होऊन बसल्या होत्या. या दोहोंत विरोध कुठें येतो तें तिच्या मनाला मुळींच कळत नव्हतं. पण तो उत्पन्न झाला होता खरा...हरिप्रसाद तिला विचारीत होते, " मला दुःख द्यावंसं तुला वाटतं ? "

तिनं मान हलविली आणि म्हटलं, " नाहीं, नाहीं पिताजी, मी तुम्हांला कधीं दुःख देणार नाहीं. "

हरिप्रसादांनीं तिचा हात हातांत घेतला व म्हटलं, "पण मला दुःख व्हावं असं तूं सध्यां वागते आहेस ! बेटी, ज्या मोहांत तूं पडली आहेस त्या मोहानं मोठमोठ्यांच्या विद्येला कीड लागलेली मला माहित आहे. ही कीड तुझ्या विद्येला कधीं लागेल अशी मला कल्पना नव्हती. या मोहांत तूं पडशील असं मला वाटलं नव्हतं. तूं केवळ कलेसाठीं जगशील अशी मला खात्री होती. त्या खात्रीला तूं धक्का देते आहेस. अशानं स्वतःचा अधःपात करून घेशील. मला दुःखांत लोटशील. असं करूं नकोस..." अशा प्रकारें ते किती तरी वेळ बोलत राहिले.

त्यांनीं हेमचंद्राच्या नांवाचा उल्लेख केला नाहीं. त्याच्या विषयींच्या तिच्या प्रेमाचा उच्चार केला नाहीं. तो टाळून ते बोलत होते. पण कशाला उद्देशून ते मोह मोह असं म्हणत होते तें रंभाला कळत होतं. त्यांचं बोलणं

तिला पटत नव्हतं. परंतु त्यांना फार दुःख होत आहे एवढं तिला स्पष्ट दिसत होतं, आणि त्याबद्दल तिला अतिशय खेद होत होता. तिच्यासाठीं त्यांनीं काय काय केलं त्यांचं वर्णन त्यांनीं केलं नसतं तरी तिला तें सारं माहित होतंच. त्यांचे उपकार ती कधीं विसरूं शकत नव्हती. त्यांच्याविषयीं जो गाढ आदर तिच्या मनांत होता तो कशानंदेखील कमी होणं शक्य नव्हतं. आपल्या वर्तनानं त्यांच्या मनाला यातना व्हावी ही फार शरमेची गोष्ट तिला वाटत होती. ते खूप संतापून तिला बोलले असते तर तिच्या मनाची प्रतिक्रिया निराळी झाली असती. पूर्वीं एकदोनदां ती थोडीशी झालीहि होती. त्यांनीं रागावून तिला शिव्या दिल्या असत्या तर तिच्या मनानं कदाचित् आपल्या इच्छेचा हट्ट केला असता, आणि उलट रागाचीं उत्तरं जरी तिनं केली नसतीं तरी त्यांचा संताप अकारण आहे असं तिला वाटलं असतं, आणि तिला पश्चाताप झाला नसता...परंतु ते एकहि कटु शब्द बोलत नव्हते. फक्त स्वतःचं दुःख परोपरीनं वर्णन करून ते सांगत होते. त्यामुळें रंभाच्या मनांत आलं, यांना असं दुःख देणं मला शोभतं काय ? ज्यांनीं मला सावत्र आईच्या छळांतून सोडविलं, पोटच्या मुलीसारखं संभाळलं, माझ्या वर ममता केली, मला विद्या दिली, मला मोठं केलं, त्यांना अशा प्रकारें दुःखी करून उपकारांची फेड मीं करावी काय ?...त्यांनीं दुःख कां करून घ्यावं हें तिला समजत नव्हतं. हेमचंद्रावर प्रेम करण्यांत आपली कांहीं चूक आहे असंहि तिला वाटत नव्हतं परंतु तिचं मन तिला विचारीत होतं, तुझं प्रेम चूक कीं बरोबर हा प्रश्न नाहीं. हरिप्रसादांनीं तुला दोषी ठरवून स्वतःला दुःखी करून घेणं बरोबर आहे कीं चूक आहे हाही प्रश्न नाहीं, तूं त्यांचे उपकार विसरणार कीं काय हा प्रश्न आहे. त्यांना दुःखी करणार कीं काय हा प्रश्न आहे. स्वतःच्या सुखासाठीं आणि हट्टासाठीं तूं यांच्या दुःखाचा तळतळाट घ्यायला तयार आहेस काय ?...

एकीकडे हरिप्रसादांचं बोलणं ऐकतां ऐकतां रंभाच्या मनांत या विचाराचं चक्र फिरत होतं. त्यामुळें ते जेव्हां आपलं बोलणं संपवून गप्प झाले, तेव्हां ती खालीं मान घालूनच बसली. ज्याला स्वतःचा गुन्हा पटलेला नाहीं, परंतु दुसऱ्याला तो गुन्हा वाटत असेल व त्याचं दुःख होत असेल तर तें दुःख दिल्याचा दोष पत्करायची ज्याची इच्छा नाहीं अशा माणसाप्रमाणें तिच्या मनाची अवस्था झाली होती...

हरिप्रसाद म्हणाले, " हे बघ बेटी, तूं वेळींच सावध झाली नाहींस तर जें दुःख पुढें मला सोसावं लागणार आहे तें माझ्या वांट्याला येऊं देण्यापेक्षां मी आत्महत्या पत्करीन. कलेची उपासना करायला तूं नालायक ठरलीस ही गोष्ट पुढें डोळयांनीं पहाण्यापेक्षां माझे डोळे आधींच मिटले तर मला बरं वाटेल. सांग बेटी, तूं काय करणार आहेस ? "

रंभा म्हणाली, "पिताजी, मी तुमच्या पायाची शपथ घेऊन सांगतें—"

हरिप्रसादांनीं घाईनं विचारलं, " काय ? "

ती म्हणाली, " जी गोष्ट तुम्हांला पसंत नाहीं ती माझ्या हातून मी घडूं देणार नाहीं."

हरिप्रसादांची सतार जवळच उघडी पडलेली होती. तिच्याकडे पाहून ते म्हणाले, " विद्येची शपथ घेऊन तूं सांगतेस मला ? "

रंभानं सतारीवर हात ठेवला आणि म्हटलं, " होय पिताजी, विद्येची शपथ घेऊन—"

तिच्या डोळयांत आसवं आलीं. हुंदका आल्यामुळें तिचे शब्द तसेच राहिले. हरिप्रसादांनीं तिच्या पाठीवरून हात फिरविला आणि म्हटलं, " बेटी, या तुझ्या बोलण्यानं मला फार आनंद होत आहे. तुला रडूं कसलं येतं तें मला कळतं. मोह तोडायचा झाला कीं तो माणसाला असंच रडवितो. पण तुझा निश्चय खरा असेल तर आज रडलीस हेंच बरोबर

झालं, असं तुझं तुलाच कांहीं दिवसांनीं वाटेल. मोहाची ताकद आपल्या दुबळेपणावर अवलंबून असते. आपण त्याच्या मिठींत सांपडलों कीं तो बलिष्ठ वाटूं लागतो. उलट आपण त्याचे पाश तोडले कीं त्याचं सामर्थ्य किती क्षुल्लक होतं तें आपल्याला कळून येतं...कांहीं दिवसांनीं तूं हा मोह पुरता विसरशील याची मला खात्री आहे...."

हरिप्रसादांचे ते शब्द तिला त्या क्षणीं खरे वाटले.

आणि नंतरहि ती आपल्या खोलींत जाऊन स्वस्थ पडली तेव्हांदेखील त्यांच्या त्या शब्दांत पुष्कळ अर्थ आहे असंच तिला वाटत होतं...तिनं एक नवा निश्चय केला होता. त्याप्रमाणें ती वागणार होती. हरिप्रसादांना दुःख न देण्याची शपथ तिनं घेतली होती. ती शपथ ती पाळणार होती...सबंध दिवसभर ती हेमचंद्राच्या दृष्टीस पडली नाहीं. अगदीं निराळ्या वृत्तीनं त्याच्याशीं ती आतां यापुढें वागणार होती...रात्रीं नृत्यप्रयोगाच्या वेळेस त्याचा सहवास टाळणं तिला शक्यच नव्हतं. परंतु आजसुद्धां त्या नृत्याच्या वेळेस तिनं जरी त्याचे हात धरले व त्याच्या नजरेला नजर अनेक वेळां लावली तरी तिच्या स्पर्शांत अगर दृष्टींत जी नाजुक भावना प्रगट झालेली अनुभविण्याची व पाहण्याची हेमचंद्राला आतांशा संवय झाली होती ती त्याला आज आढळली नाहीं. ती मनाशीं म्हणत होती, पिताजींना दिलेली शपथ मला पाळली पाहिजे...नाचतां नाचतां तो मध्येंच तिच्या कानांत कांहीं बोलत होता, परंतु नेहमींप्रमाणें त्याच्या प्रेमाच्या सवालाला तिनं प्रेमाचा जबाब दिला नाहीं...नृत्याच्या पूर्वी अगर नंतर आपल्याजवळ येण्याची संधि त्याला मिळूं नये अशी दक्षता तिनं घेतली.

आपल्या शपथेचं स्मरण ठेवून आपण वागत आहोंत याचं तिला समाधान होत होतं...परंतु तिच्या अंतःकरणांत खोल कुठें तरी तीव्र आवेगानें प्रश्न उठत होता, असं कां वागायचं ? कशासाठीं ? हेमचंद्राकडे पाहून

हंसण्यांत कोणतं पाप आहे ? त्याचा हात नुसत्या नृत्यांतल्या पविऱ्यासाठीं नव्हे तर प्रीतीच्या आवेगानं धरण्यांत कोणता गुन्हा आहे ? पिताजींचं दुःख जर खरं असेल तर हेमचंद्राचं दुःखहि खरं नाहीं काय ? त्याला तरी दुःखी काय म्हणून करायचं ? आणि त्याच्या दुःखानं माझ्या हृदयाला जो पीळ पडतो तोहि खरा नाहीं काय ? तो कां पडूं द्यायचा ?...अखेर अखेरच्या नृत्याच्या वेळेस या विचारांनीं अगदीं गर्दी करून सोडली, आणि हेमचंद्राशीं ती जरी अगदीं कठोर अलगपणानं वागूं शकली तरी तो अलगपणा तिचा तिलाच सहज होईनासा झाला. त्या कठोरपणाचा खेद तिला वाटूं लागला. तिच्यासारख्या अगदीं तरूण स्त्रियांच्या प्रीतींत-देखील वात्सल्याचा फार मोठा गुप्त अंश असतो कीं काय कोण जाणे ! परंतु अखेरचं नृत्य संपत आलं तसं हेमचंद्राविषयीं तिचं मन वात्सल्यानं भरून आलं. लहान मुलाला रागानं खूप बोलल्यानंतर, मारल्यानंतर, त्याचा दुःखी चेहरा पाहून आईला ज्याप्रमाणें त्याला एकदम जवळ ओढून घ्यावं आणि हृदयाशीं धरून ममतेचे शब्द बोलावे, मुके घ्यावे अशी तीव्र इच्छा होते तशी इच्छा तिला झाली...त्या इच्छेच्या आहारीं आपण आतां कितीं जातों कुणास ठाऊक असं भय वाटल्यामुळें शेवटचा पडदा पडल्याबरोबर ती हेमचंद्राचा हात दूर करून एकदम रंगपटांतल्या आपल्या खोलीकडे धांवली...वेषभूषा उतरतांना आणि रंग पुसतांना अंतःकरणांत उसळलेलं वात्सल्य ती सारखं आंवरून धरीत होती...आतां हेमचंद्र आपल्या दृष्टीस न पडेल तर बरं होईल अशी प्रार्थना ती करीत होती...

परंतु ती खोलीच्या बाहेर आली तों हेमचंद्र तिथें उभा असलेला तिला दिसला...तिनं इकडे तिकडे पाहिलं. हरिप्रसाद अजून गेले नसतील तर आपण त्यांच्याबरोबर जावं असा विचार तिच्या मनांत आला. पण तिला कुणी दिसेना. हरिप्रसाद गेले असावेत. बाकीची मंडळीहि गेली असावीत... हेमचंद्रानं तिला विचारलं, "चलायचं ?"

चलायचं ! तो शब्द ऐकतांच तिची छाती धडधडूं लागली. चलायचं ! त्या चार अक्षरांत केवढं विलोभनं होतं ! केवढं सामर्थ्य होतं ! जणु तीं चार अक्षरं असंख्य पाश तिच्याभोंवतीं पसरून तिला खेचीत होतीं ! तिच्या मनांत आलं, माझ्या सामर्थ्याच्या कसोटीचा हा क्षण आहे ! " विद्येची शपथ ! विद्येची शपथ ! " असा उद्‌गार तिच्या हृदयांत खोल कुठें तरी उठला. तिनं वर मान करून हेमचंद्राकडे पाहिलं, आणि नकारार्थी मान हालविली. भेदरलेलं पाडस सुटून जाण्याचा एखादा मार्ग कुठें दिसतो काय म्हणून ज्या नजरेनं संकटाकडे पहात असेल त्या नजरेनं तिनं हेमचंद्राकडे पाहिलं. तिनं पुन्हां मान हालविली...

परंतु हेमचंद्रानं जणुं हें कांहीं पाहिलंच नाहीं. तो अगदीं नेहमींप्रमाणें हंसला, आणि हळूच म्हणाला, " चल ! "

आतां तर चाराऐवजीं दोनच अक्षरं त्याच्या तोंडून बाहेर पडलीं होतीं. परंतु ' चलायचं ' या चार अक्षरांनीं तिच्या अंत:करणाभोंवतीं जो विळखा घातला होता त्यापेक्षांहि ' चल ' या दोनच अक्षरांचा विळखा अधिक दृढ होता. त्या दोनच अक्षरांत जितकं माधुर्य होतं तितकाच अनिवार्य जुलूम होता. नव्हे, तें माधुर्य म्हणजेच जुलूम होता !...

आतां तिनं मान हालविली नाहीं !

ती त्याच्याबरोबर चालूं लागली.

तो कांहीं बोलत नव्हता. ती देखील स्तब्ध होती. दोघांचीं पावलं बरोबर पडत होतीं. उभयतांचे हात एकमेकांत आपोआप हळूंच गुंतले होते... रानगवतानं पुसट झालेली वाट संपली. बागेचा दरवाजा उघडा होता. तीं दोघं आंत शिरलीं. त्यानं वर पाहिलं, तिनं वर पाहिलं. आज चंद्र माथ्यावर नव्हता. अस्ताचलावर टेकला होता. आणि त्याचा चंदेरी रंग पार बदलला होता. त्यानं आजूबाजूस पाहिलं. तिनं पाहिलं. झाडांच्या लांबलांब छाया पडल्या होत्या. चौथरा अंधारांत झाकळला गेला होता. हेमचंद्र चौथऱ्यावर बसला.

त्यानं तिला जवळ ओढलं. दोघांनीं पाहिलं तों रोजच्याप्रमाणें आजहि बकुळीच्या फुलांचा लहानसा थर चौथऱ्यावर पडलेला होता !...

रंभाच्या मनांत आलं, दिव्य लोकांतले प्रेमिक आजहि या स्थलीं येऊन गेले होते. त्यांच्या भेटींत खंड पडला नव्हता ! प्रेमांत कधीं खंड पडतां कामा नयेच ! ती हेमचंद्राबरोबर या ठिकाणीं आजहि आली हेंच बरोबर होतं ! बाकी साऱ्या गोष्टी चूक होत्या !...हेमचंद्रानं तिला मिठी घातली. सबंद दिवसभर ज्या तऱ्हेनं ती त्याच्याशीं वागली होती त्याबद्दलची रुष्टता तर त्यानं दाखविली नाहींच, परंतु त्या गोष्टीचा उल्लेखहि त्यानं केला नाहीं. त्यानं फक्त एका हातानं तिचा कटिभाग दाबीत व दुसऱ्या हातानं तिची हनुवटी वर उचलीत " रंभा ! " असा अगदीं हलकेच उद्गार काढला ! आणि मग एकदम अतिशय आवेगानं तिच्या ओठांना चुंबनाची जखम केली !...

तें चुंबन नव्हतं ! रंभाच्या साऱ्या संयमावर, विवेकावर, हरिप्रसादांजवळ घेतलेली शपथ पाळण्याच्या इच्छेवर तो एक जबरदस्त प्रहार होता ! जखमेंतून रक्ताची धार उठावी त्याप्रमाणें त्यानं तिच्या ओठावर केलेल्या दंतव्रणांतून एका जाणीवेची धार उडाली व त्या धारेनं रंभाचं सारं अंतःकरण व्यापून टाकलं...तिच्या मनांत आलं, हें चुंबन आणि या चुंबनाचं सुख एवढंच सत्य आहे ! या सत्यापुढें बाकी कोणत्याहि गोष्टींची मातबरी नाहीं ! बाकी साऱ्या गोष्टी खोट्या आहेत ! ... मावळणाऱ्या चंद्राच्या प्रकाशांत हेमचंद्राचं तोंड निरखून पाहाण्यासाठीं तिनं डाव्या हातानं त्याचे केस धरून त्याचं कपाळ वर केलं, आणि त्याची नजर जेव्हां तिच्या नजरेशीं भिडली तेव्हां आणखी जखमी होण्यासाठीं तिचे ओठ त्याच्या ओठांजवळ गेले !

# प्रकरण सहावें

मोटरच्या पुढच्या बाजूस ड्रायव्हरजवळ बसलेल्या हेमचंद्राचा आणि त्याच्या मित्राचा हास्यविनोद मागच्या सीटवर एकट्याच बसलेल्या रंभाला ऐकूं येत होता. परंतु त्यांत भाग घेण्याची तिची इच्छा नव्हतीच, पण त्याकडे आपलं लक्ष आहे असं दाखविण्याचीसुद्धां नव्हती. म्हणून झोपेचं सोंग करून तिनं डोळे मिटून घेतले होते आणि मागं टेकण्याच्या जागेवर मान टाकली होती...एक दोन वेळां हेमचंद्राच्या मित्रानं केलेल्या कोटीमुळें हेमचंद्र मोठ्यांदा हंसला, आणि त्याच्या पाठीवर थाप मारून " वाहवा, शाबास ! " असं म्हणून मागं वळून रंभाला उद्देशून म्हणाला, " ऐकलंस का हा निखिलबाबू काय म्हणाला तें ? " पण तिनं डोळे उघडले नव्हते. " झोंप लागली काय ? " असं हेमचंद्रानं तिला विचारलं तरी तिनं त्याकडे लक्ष दिलं नव्हतं. " स्वारी झोंपली वाटतं ! " असा उद्‌गार हेमचंद्रानं अर्धवट स्वगत अर्धवट निखिलबाबूला उद्देशून काढला,

तो तिनं ऐकला होता. तरीदेखील आपण जाग्या आहोंत हें तिनं हेमचंद्राला कळूं दिलं नव्हतं...

ज्या प्रदेशांतून त्यांची गाडी वेगानं चालली होती, तो रमणीय होता. त्याची शोभा पाहण्यासाठीं डोळे उघडावे असा मोह तिला मधून मधून होत होता. हेमचंद्र आणि निखिलबाबू यांच्या गप्पादेखील फार रंगल्या होत्या, आणि एरवीं त्या गप्पांत तिनं मोठ्या हौसेनं भाग घेतला असता. पण ती मनांतल्या मनांत अगदीं अस्वस्थ होऊन गेली होती. आपल्या अस्वस्थेला हेमचंद्राचं वागणं कारण झालं म्हणून ती त्याच्यावर रागावलेली होती. आणि तिला त्यांच्या गप्पांत भाग घेण्याची अगर आजूबाजूची सृष्टिशोभा पाहण्याची इच्छा उरली नव्हती...आपण एकदां मुक्कामावर केव्हां पोंचतों आणि हरिप्रसाद आपल्यावर आणि हेमचंद्रावर –विशेषतः हेमचंद्रावर–कितपत रागावले आहेत तें एकदां केव्हां कळतं याकडे तिचं सारं लक्ष लागलं होतं. हरिप्रसाद खूप रागावणार याची तिला खात्री वाटत होती; आणि तिच्या मनांत पुनः पुन्हां येत होतं, असं व्हायला नको होतं...खरं म्हणजे निखिलबाबूंचा आग्रह आपण मानायला नको होता; आणि हेमचंद्रानं आपल्याला भरीला घातलं तरी आपण त्याला स्पष्ट सांगावयाला हवं होतं, " नाहीं हेम, हा बेत आपण करतां कामा नये "...परंतु वेळेवर परत यायला कांहींच प्रत्यवाय नाहीं ही गोष्टहि तिला नाकबूल करतां येण्यासारखी नव्हती, आणि हेमचंद्राबरोबर जाण्याच्या मोहाला ती बळी पडली होती...पण आतां तिला सारखं वाटतं होतं, आपण ही मोठी चूक करून बसलों...आतां पिताजी रागावले तर त्यांचा कोणता दोष?...

सागरपूरला मुक्काम आल्यापासून हरिप्रसादांचं सारखं म्हणणं चाललं होतं कीं एकदां बडे रामदासी यांच्यासाठीं खास आपल्या मुक्कामाच्या

बंगल्यांत रंभाच्या नृत्याची बैठक करायची. बडे रामदासी म्हणजे एक फार नाणावलेले वृद्ध संगीतकार होते. हरिप्रसाद त्यांना फार मानीत असत. त्यांचं आतां फार वय झालं असल्यामुळें ते सागरपूरच्या बाहेर कधीं जात नसत. जाहीर नृत्यप्रयोगाला हरिप्रसादांच्या आग्रहाच्या बोलावण्यावरून ते एकदां आले होते, पण त्यांना फार वेळ खुर्चीत अवघडून बसवेना म्हणून ते लवकर उठून गेले होते. त्यांना निरोप देतांना हरिप्रसादांनीं सांगितलं होतं, "आपल्यासाठीं मुद्दाम रंभाला नाचायला लावीन." आणि ते म्हणाले होते, "जरूर जरूर. हरिप्रसाद, तुम्ही बडी लयदार शिष्या तयार केली आहे. तिचा नाच पोटभर पाहिल्याशिवाय मला बरं नाहीं वाटायचं." हरिप्रसाद म्हणाले होते, "आणि आपण पोटभर पाहिल्याशिवाय मलाहि बरं वाटायचं नाहीं." रंभाकडे वळून ते म्हणाले होते, "क्यूं बेटी, यांच्यासाठीं मुद्दाम एक दिवस नाचणार ना तूं ?" रंभानं मान हालवीत हंसून बडे रामदासींच्या पायावर डोकं ठेवलं होतं. त्यांनीं तिला मनःपूर्वक आशीर्वाद दिला होता...पण नंतर बडे रामदासींची प्रकृति बिघडली होती. अखेर सागरपूरहून मुक्काम हलण्याचा दिवस जवळ येऊं लागला तेव्हां मुक्काम बदलण्याच्या पूर्वी एकदां ही बैठक करून टाकण्याचं हरिप्रसादांनीं ठरविलं होतं. बडे रामदासींकडून निरोप आला होता कीं, "मला आपल्याकडे येण्याची कांहीं ताकद नाहीं. पण आपण इकडे माझ्या गरिबाच्या झोंपडींत आलांत तर अंथरुणांतच उठून बसून मी नृत्य पाहीन" हरिप्रसादांनीं ही गोष्ट एकदम मान्य केली होती. बडे रामदासींची वाहवा रंभानं मिळवावी आणि इतकी विद्या दिल्याबद्दल आपलीहि पाठ थोपटावी अशी हरिप्रसादांची फार इच्छा होती. जुन्या पिढींतलीं जीं थोडी अत्यंत विद्वान आणि आदरणीय कलावंत माणसं उरलीं होतीं त्यांत बडे रामदासींचं नांव फार श्रेष्ठ कोटींतलं आहे

हें हरिप्रसादांना माहीत होतं. त्यांच्यापुढें मुजरा करून रंभानं त्यांचे आशीर्वाद मिळवावेत अशी त्यांची इच्छा होती...म्हणून त्यांनीं बेत मुक्रर केला होता. मंगळवारीं नृत्याचा जाहीर प्रयोग नव्हता. त्या दिवशीं रात्रीं बडे रामदासींच्या घरीं रंभाचं नृत्य करण्याचं त्यांनीं ठरविलं होतं...

पण मंगळवारीं सकाळीं हेमचंद्र तिला म्हणाला होता, "रंभा, हा निखिलबाबू आला आहे. तो म्हणतो माझ्या वाडीवर यायचं तुम्हीं दोघांनीं कबूल केलेलं आहे, पण येतों येतों अशा नुसत्या थापा देतां. आतां तर दोन दिवसांत तुमचा मुक्काम हालणार. मग तुम्हीं येणार तरी केव्हां? माझ्या वाडीवर आल्याखेरीज मी तुम्हांला सागरपूरहून हालूं देणार नाहीं. आपल्याला न्यायसाठी तो गाडी घेऊनच आला आहे—"

निखिलबाबू म्हणाला, "येतां कीं नाहीं बोला. तुम्हीं नाहीं म्हटलंत तरी मी तुम्हांला गाडींत घालणार आणखी नेणार."

रंभा म्हणाली, "बाबूजी, तुम्ही माफी केली पाहिजे. आजचा बेत करणं अगदीं अशक्य आहे."

"कां?"

"आज रात्रीं बडे रामदासींच्या घरीं पिताजी मला घेऊन जाणार आहेत."

निखिलबाबू म्हणाला, "हात् तिच्या, रात्रीं ना? त्याच्या आंत आणून सोडतों कीं आपल्याला. वाडीवर जायचं, छानपैकीं जेवण करायचं, लहर आली तर थोडी शिकार करायची—"

रंभा एकदम म्हणाली, "छे छे! इतकं सारं आटपून तुम्ही आम्हांला कसले वेळेवर आणून सोडतां? मला सूर्यास्ताला इथें हजर असायला हवं, आजच्या नृत्याचं महत्त्व फार आहे. बडे रामदासींना पिताजी किती मानतात—"

हेमचंद्र एकदम म्हणाला, " हं : ! मला माहिती आहे ग हें सारं—"

त्याचं तें बोलणं रंभाला आवडलं नव्हतं. त्या बोलण्यांतली तुच्छता तिला पसंत नव्हती. अलीकडे हरिप्रसादांविषयीं आणि त्यांनीं केलेल्या कोणत्याहि बेताविषयीं हेमचंद्र अशा प्रकारें अनादरानं बोलत असे, आणि ही गोष्ट तिला मुळींच रुचत नसे. तो तसं कां वागतो आणि बोलतो हें तिला कळत होतं. हरिप्रसादांत आणि त्याच्यांत एक प्रकारचा गुप्त वैरभाव निर्माण झालेला तिला दिसत होता; आणि त्या वैरभावाची तिला चिंता आणि भीति वाटूं लागली होती. हरिप्रसादांविषयीं हेमचंद्राच्या मनांत कोणत्या कारणानं अढी निर्माण झाली होती तें तिला समजत होतं. तिच्याविषयीं त्याच्या मनांत जो दृढ प्रीतिभाव होता, तो त्यांना पसंत नसावा आणि त्यांची नाराजी टाळण्या-साठीं एखादं गुप्त चौर्य कर्म केल्याप्रमाणें तिच्यावर प्रेम करणं त्याला भाग पडावं हें पाहून तो त्यांच्यावर रुष्ट झालेला होता. ही रुष्टता तो बाहेर सहसा दाखवीत नसे. प्रत्यक्ष हरिप्रसादांशीं बोलतांना तो पूर्वीप्रमाणेंच अतिशय आदरानं आणि नम्रतेनं बोलत असे. परंतु हरिप्रसादांविषयीं त्याच्या मनांत जी अढी दृढ होऊं लागली होती ती त्याच्या इतर वेळच्या बोलण्यावरून रंभाला सहज ओळखतां येण्यासारखी होती. त्याला ती म्हणे " असं बोलतां कामा नयेस तूं ! " तो म्हणे, " बोललों नाहीं तरी मनांत येणारच कीं माझ्या. " ती म्हणे " मनांतसुद्धां येतां कामा नये तुझ्या." तो उत्तर देई, "तें मात्र माझ्या हातीं नाहीं. हरिप्रसादांविषयीं तुझ्या आणखी माझ्या भावना एकच असणं कसं शक्य आहे ? तूं त्यांना प्रत्यक्ष पित्याप्रमाणें मानतेस. त्यांचे तुझ्यावर फार उपकार झाले आहेत. माझी गोष्ट तशी नाहीं. एक अद्वितीय कलावंत आणि ज्यांच्यापासून मी विद्या घेतली असे माझे गुरु, या दोनच नात्यांनीं मी हरिप्रसादांना मानतों. आणि तुझ्यावरच्या माझ्या प्रेमाला ते विनाकारण विरोध करीत आहेत हें

पाहिल्यावर या दोन्ही नात्यांचा मला विसर पडतो. हें बघ रंभा, मी मागंच तुला सांगितलंय तें पुन्हां सांगतों. हरिप्रसादांशीं मी उघड उद्धट वर्तन कधीं करणार नाहीं. त्यांनीं चार शिव्या दिल्या तरी मुकाट्यानं ऐकून घेईन. पण तुझं प्रेम मला हवं. आणि त्याच्या आड जर ते येऊं लागले तर केव्हां तरी एक दिवस त्यांचा माझा खटका—" त्याच्या तोंडा-वर एकदम हात ठेवून रंभा म्हणे, " गप्प, गप्प ! भलतं बोलूं नकोस ! "...

त्यामुळें बडे रामदासींना हरिप्रसाद किती मानतात त्याचं वर्णन ती निखिलबाबूजवळ करून त्याच्या वाडीवर जाण्याचा बेत रद्द करणार असं दिसतांच त्यानं जेव्हां " हंः ! " असा उद्गार काढला तेव्हां तो रंभाला आवडला नाहीं. त्या उद्गारामागं त्याची कोणती विचारसरणी होती तें तिला ठाऊक होतं, व त्या विचारसरणीला उत्तेजन देण्याची तिची इच्छा नव्हती. तिनं त्याच्याकडे नापसंतीचा कटाक्ष टाकला होता, आणि तो जेव्हां म्हणाला, "मला माहित आहेत ग हें सारं" तेव्हां ती म्हणाली होती,

" मग माहीत असून कसं म्हणतां निखिलबाबूंच्या वाडीवर जाऊं या म्हणून ? "

" तसं म्हणतों याचं कारण उघड आहे. सूर्यास्ताच्या आंत आपण परत येऊं याबद्दल माझी खात्री आहे. "

तिनं निखिलबाबूकडे पहात म्हटलं होतं, " होय ? "

" अहो, त्याबद्दल शंका कसली ? " निखिलबाबू म्हणाला होता. " तीस मैल तर जायचं. अर्ध्या पाऊण तासाचा प्रवास. तुमचा हट्टच असेल तर पांच वाजतां इथें परत आणून सोडतों तुम्हाला. लिहून देऊं काय ? "

त्याचा तो प्रश्न ऐकतांच रंभाला हंसू येऊन "इश्श ! लिहून कशाला ?" असा उद्गार तिच्या तोंडून बाहेर पडला होता, आणि ती जरा खुषींत आली असं पाहून हेमचंद्र म्हणाला होता,

"मग चल तर, पुरे झाल्या तुझ्या सबबी. चल."

रंभा म्हणाली होती, "पिताजींना विचारून येतें."

"तोंड धुण्यासाठीं न्हाणीघरांत जातांनासुद्धां पिताजींना विचारतेस कां ग ?"

हेमचंद्राची ती कोटि ऐकून निखिलबाबू हंसू लागला होता. रंभाहि थोडी हंसली. पण केवळ हेमचंद्राच्याच लक्षांत यावा असा भाव चर्येवर आणून ती म्हणाली, "हो ना ! तुम्हांला माहित नाहीं ?" तुझ्या चोरून एकांतांत गाठीभेटी घेतांना मी हरिप्रसादांची परवानगी घेत असते काय रे अशा प्रश्नाचा ध्वनि तिच्या त्या साध्या वाक्यांत स्पष्ट होता, आणि त्या ध्वनीला अनुसरून तिनं त्याच्याकडे टाकलेल्या नजरेंत अर्थ होता. तो ध्वनि आणि तो अर्थ हेमचंद्राच्या लक्षांत आल्यावांचून राहिला नाहीं, आणि आलं माझ्या लक्षांत अशा अर्थानं त्यानं लगेच हास्यहि केलं होतं...

मग रंभा हरिप्रसादांकडे गेली होती. पण ती लगेच परत येऊन म्हणाली होती, "पिताजी बाहेर गेले आहेत. रामदासींच्याकडेच ! मग आतां कसं करायचं ?"

हेमचंद्र म्हणाला, "कसं करायचं काय ? निखिलबाबूबरोबर जायचं."

"पण पिताजींना न विचारतांच ?"

"अग आपण कुठें दुसऱ्या एखाद्या गांवाला का जातों आहोंत ? ते घरांत नाहींत. रामदासींच्याकडे गेले आहेत. तिथून आतां दुपारचे बारा साडेबारा झाले तरी ते कांहीं परत यायचे नाहींत. मग त्यांना विचारायचं कसं ? त्यांच्यासाठीं आपण निरोप ठेवूं म्हणजे झालं. माझं ऐक. चल."

निखिलबाबूकडे पहात रंभा म्हणाली, " पण बघा हं. वेळेवर परत यायला हवं. "

हेमचंद्र कांहींशा चिडक्या स्वरांत म्हणाला, " आतां पुरे झालं तुझं रडगाणं वेळेवर यायला पाहिजे, वेळेवर यायला पाहिजे. जबाबदारीची जाणीव तुला एकटीलाच आहे कीं काय ? "

त्यानं तिला अशा प्रकारें तोडून बोलून दुखवावं ही गोष्ट निखिलबाबूला आवडली नव्हती. तिला बरं वाटावं म्हणून तो म्हणाला, " वेळेवर येण्याबद्दल तुम्हीं काळजी करूं नका हो. माझी गाडी अगदीं कोरी करकरीत आहे. आपण जेवून खाऊन विश्रांति घेऊन चार वाजतां निघालों तरी अगदीं मजेनें पांचाच्या आंत इथें येऊं. मग तर झालं ? "

मग रंभानं आढेवेढे घेतले नव्हते, आणि मुक्कामावरून निघाल्यापासून अवघ्या चाळीस मिनिटांत त्यांची गाडी निखिलबाबूंच्या वाडीवर पोंचली तेव्हां तिच्या मनाची खात्री पटली होती कीं आपण पांच वाजण्याच्या आंत परत घरीं जाऊं. मग वाडीवर इकडे तिकडे हिंडतांना, फळं खातांना, निखिलबाबू आणि हेमचंद्र या दोघांनीं बागेतल्या मोठ्या विहिरींत पोहण्याचा बेत केला तेव्हां विहिरीच्या कांठावर बसून त्यांचं पोहणं पाहतांना, नंतर वनभोजन करतांना, आणि झाडांच्या दाट छायेंत खुशाल गवतावर पडून एकीकडे विश्रांती घेत दुसरीकडे गप्पा मारतांना ती अगदीं खुशींत होती...उन्हं तिरपीं झालीं तेव्हां मनगटावरच्या घड्याळांत पाहून ती निखिलबाबूला म्हणाली, " आतां दहा पांच मिनिटांत निघायला हवं हं. "

निखिलबाबूनं आपल्या ड्रायव्हरला ताबडतोब गाडीकडे पाठविलं आणि तो रंभाला म्हणाला, " निघण्यापूर्वीं एकदां चहा घेऊं या. मग बंगल्याकडे जाऊं. ड्रायव्हर गाडी सज्ज करून तयार असेल. "

पण तीं चहा आटपून बंगल्याकडे गेलीं तेव्हां ड्रायव्हर तयार होऊन गाडींत बसलेला दिसण्याऐवजीं एंजिनवरचं ढांपण काढून वाकून दुरूस्तीची खटपट करीत असलेला दिसला. निखिलबाबूनं त्याला विचारलं, " काय रे काय बिघडलं ? "

ड्रायव्हर म्हणाला, " कांहीं विशेष नाहीं. आत्तां पांच मिनिटांत करतों दुरुस्त. आपण बसून घ्या. "

ती तिघंजणं गाडींत चढून बसलीं होतीं. पण पांच मिनिटांच्याऐवजीं अर्धा तास होऊन गेला तरी गाडीची दुरुस्ती कांहीं आटपेना. तो ड्रायव्हर पुन्हां पुन्हां हांकण्याच्या जागीं बसे, पाय दाबी, फर्रर असा मोठा आवाज काढी, एंजिन सुरू होत नाहीं असं पाहून खालीं उतरे, दुरुस्तीची खटपट करी, पुन्हां गाडींत चढून बसून फर्ररर्र असा आवाज काढी. त्याच्या या व्यर्थ खटपटींत अर्धा पाऊण तास गेला तेव्हां निखिलबाबू स्वतः हांकण्याच्या जागीं बसला आणि दुरुस्तीला मदत करूं लागला. पण काय बिघडलं होतं कुणास ठाऊक ! गाडी कांहीं केल्या सुरू होईना...रंभा पुन्हां पुन्हां आपल्या मनगटावरल्या घड्याळाकडे पहात होती. पांच वाजले, साडेपांच झाले, सहावर कांटा आला ! आणि अजून गाडी सुरू होईल असं लक्षण दिसेना...हलके हलके आपण आतां कांहीं वेळेवर घरीं पोंचत नाहीं अशी तिची पुरती खात्री झाली...मनांतल्या मनांत ती अगदीं भयंकर चिडली होती. पण या वेळीं हेमचंद्राशीं भांडण्यांत कांहीं अर्थ नाहीं हें ती ओळखून होती...ती गाडींतून खालीं उतरली आणि पायऱ्या चढून जाऊन बंगल्याच्या व्हरांड्यांतल्या एका वेताच्या आराम खुर्चीत पडली...शेवटीं निखिलबाबूंनीं आपल्या ड्रायव्हरला सायकलवर सागरपूरला पाठवून मोटार दुरुस्तीच्या मोठ्या कारखान्यांतून कुणी तरी वाकबगार दुरुस्ती करणाऱ्याला आणण्याची व्यवस्था केली, हें

त्यांच्या बोलण्यावरून रंभाला समजलं...परंतु तें समजल्यामुळें तिला आनंद झाला नाहीं...कारण आतां सूर्यास्त झाला होता...बडे रामदासींच्या घरीं तिच्या नृत्याचा मुजरा आतां आज रात्रीं होणं अगदीं अशक्य होतं...

निखिलबाबूनं आपल्या नोकर माणसांकडून बत्त्या लावविल्या, रात्रीच्या जेवण्याची उत्तम व्यवस्था केली, सागरपूरहून वाकबगार दुरुस्ती करणारा आला तरी आतां रात्रींचा मुक्काम इथेंच करावा लागणार या हिशेबानं त्यानं पाहुण्यांच्या अंथरुणापांघरुणाची उत्तम व्यवस्था केली. परंतु खरं म्हणजे मनांतल्या मनांत तो अगदीं खजिल होऊन गेला होता. आणि त्याच्याप्रमाणें हेमचंद्रहि ! दोघेहि रंभाशीं बोलण्याचं टाळीत होते. आणि त्यांना अधिक खजिल करण्याची तिची इच्छा नव्हती. त्यांच्यावर ती मुळीदेखील रागावली नाहीं. पण तिचं लक्ष मात्र कशाकडेच नव्हतं. जेवणाच्या वेळेस ती पानावर बसली खरी, परंतु दोन घांस कसे बसे खाऊन ती एका खोलींत गेली होती आणि पांघरूण डोक्यावरून ओढून घेऊन झोंपीं गेली होती...

" उठतेस ना ? गाडी तयार झाली. आपण निघायचं आतां " असे हेमचंद्राचे शब्द ऐकल्यावर ती डोळे चोळीत उठली होती. तिनं पाहिलं तों प्रातःकालच्या पहिल्या प्रहरचा तांबूस सोनेरी उजेड खिडकीवाटे त्या खोलींत शिरला होता...

त्यांची गाडी सागरपूरच्या मोठ्या रस्त्यानं वेगानं निघाली तेव्हां कोंवळीं उन्हं जिकडेतिकडे पसरूं लागलीं होतीं, आणि दोन्ही बाजूंचं सृष्टिसौंदर्य त्या प्रकाशानं खुलूं लागलं होतं.

परंतु आसमंतांतली ती शोभा पाहण्याची तिची इच्छा नव्हती. हेमचंद्र आणि निखिलबाबू यांच्या गप्पा रंगांत आल्या होत्या, त्या ऐकण्याची

तिची इच्छा नव्हती. आपण जाग्या आहोंत असं दाखविण्याची देखील तिची इच्छा नव्हती. पाठीमागं डोकं टेकून डोळे मिटून ती स्वस्थ पडली होती. तिच्या मनाला एकाच विचाराचा ध्यास लागला होता. आतां पिताजी किती रागावतात कोण जाणे! तिच्या हातून त्यांचा अक्षम्य अपराध घडला होता. आणि या अपराधाबद्दल तिच्यापेक्षांहि हेमचंद्रावर ते अधिक रागावतील अशी चिंता आणि भय तिला वाटत होतं. येऊं नये असा प्रसंग आला होता. त्यांतून आपण कशा पार पडणार आहोंत तें तिला कळत नव्हतं...

मुक्कामाच्या बंगल्यावर पोचल्यावर निखिलबाबू तिला म्हणाला, "प्रसादजींची क्षमा मागायला मी वर येऊं काय? सारा अपराध माझा आहे असं मी त्यांना सांगतों. येऊं काय मी तुमच्याबरोबर प्रसादजींकडे?"

रंभा त्याला म्हणाली, "त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. गुन्ह्याची जबाबदारी तुम्ही आपल्यावर घेऊन काय होणार? तुम्ही जा आपले. आमचं आम्ही पाहतों!"

निखिलबाबू निघून गेला तेव्हां रंभानं हेमचंद्राचा हात झटकन् धरला व त्याला म्हटलं, "आतां एक मेहेरबानी कर, पिताजींशीं वाद घालूं नकोस. एकदम त्यांच्यापुढें जायचं आणि त्यांच्या पायावर डोकं ठेवायचं. करशील कां एवढी मेहेरबानी?"

हेमचंद्रानं मान हालविली.

पण तितक्यांत तिच्या मनाचा विचार बदलला व ती त्याला म्हणाली, "नाहीं तर असं कर, तूं त्यांच्यापुढें इतक्यांत येऊंच नकोस. मी एकटीच जातें..."

हेमचंद्र कांहीं बोलणार होता, परंतु अधिक न बोलण्याची त्याला खूण करून ती दूर झाली. व हरिप्रसादांच्या खोलीकडे निघाली.

दुरूनच ‘ तोडी ’ रागिणीचे स्वर तिला ऐकूं आले...‘ पिताजी सतार वाजवीत बसले आहेत तर ! ’...ती खोलीच्या दाराशीं गेली, थबकून उभी राहिली. तोडीच्या स्वरांनीं खोली भरून गेली होती. गंधार, धैवत वरचे-वर आपापल्या विशिष्ट आंदोलनांची प्रभा फाकीत होते...भीमापूरच्या बनाजी मारवाड्याच्या बंगल्यांत सुमारें आठ वर्षांपूर्वीं जिन्यांत चोरून बसून तिनं हरिप्रसादांची सतार प्रथम ऐकली त्याची तिला एकदम आठवण झाली. त्या वेळेस तिचं अंतःकरण एकीकडे सुखानं उचंबळलं होतं, आणि दुसरीकडे आपल्याला इथून कुणी हांकून तर देणार नाहीं अशा भीतीनं कंपित झालं होतं...तीच हंसा आज हरिप्रसादांच्या खोलीबाहेर उभी राहून त्यांचं सतारवादन ऐकतां ऐकतां एका निराळयाच भीतीनं घाबरी झाली होती...खोलींत पाऊल टाकावं कीं नाहीं याबद्दल तिच्या मनाचा कांहीं निश्चय होत नव्हता.

पण कांहीं वेळानं हरिप्रसादांनीं वाजविणं थांबविलं. त्यांनीं सतार दूर ठेवली असावी असं तिला वाटलं. मग मनाचा हिय्या करून तिनं खोलींत प्रवेश केला.

हरिप्रसादांनीं तिची चाहूल लागतांच वर पाहिलं.

ती चटकन् पावलं टाकून त्यांच्याजवळ गेली आणि गुडघे टेकून त्यांच्या पावलावर डोकं ठेऊन ती म्हणाली, “ पिताजी, माझा गुन्हा अगदीं अक्षम्य आहे. तुमची क्षमा मागायला देखील माझ्याशीं शब्द नाहींत. ”

हरिप्रसाद कांहीं वेळ अगदीं गप्प राहिले. मग ते तिला म्हणाले, “ बेटी जें झालं तें व्हायला नको होतं, पण कांहीं हरकत नाहीं.मात्र बडे रामदासींच्या घरीं तुला नाचलं पाहिजेच. त्याशिवाय आपण इथला मुक्काम हालवूं शकत नाहीं. आज थिएटरमध्यें तुझा कार्यक्रम आहे. पण उद्यां तरी बडे रामदासींच्या घरीं तुला नाचायला हवं. ”

" होय पिताजी ! " असं म्हणताना तिला अतिशय आनंद झाला होता, पण मनातल्या मनांत ती भांबावून गेली होती. पिताजी आपल्यावर रागावले कसे नाहींत याचा तिला विलक्षण विस्मय वाटत होता...मागं एकदां ते असेच तिच्यावर रागवण्याऐवजीं तिच्याशीं अगदीं शांतपणें बोलले होते, आणि त्यांच्या त्या शांत बोलण्यामुळच तिला त्या वेळच्या अपराधाबद्दल पश्चाताप झाला होता. आजहि ते आपल्यावर खूप खूप रागावतील ही तिची अपेक्षा त्यांनीं खोटी ठरविली होती. ते तिच्याशीं अगदीं शांतपणानं बोलले होते आणि त्यामुळें ती मनातल्या मनांत भांबावून गेली होती. " होय पिताजी " असं म्हणतांना तिच्या मनाची भांबावलेली अवस्था तिच्या चर्येवर हरिप्रसादांना दिसल्यावांचून राहिली नसेल. पण ती जणुं आपल्याला दिसलीच नाहीं असं दाखवून ते तिला म्हणाले,

" बेटी, तोडीची ही तऱ्हा बघ तरी ! "

त्यांनीं सतार पुन्हां उचलून घेतली आणि रागिणी छेडण्यास प्रारंभ केला.

रंभा मनांतल्या मनांत अगदीं स्तिमित होऊन गेली, कीं हा काय चमत्कार ?...हरिप्रसाद तिच्यावर खूप रागावले असते तर तें अगदीं योग्य झालं असतं. त्यांनीं तिच्या दोन थोबाडींत मारायला देखील कांहीं हरकत नव्हती, हेमचंद्राला बोलावून आणून समोर उभा करून त्यांनीं त्याला खूप शिव्या दिल्या असत्या तरी तें वाजवीच झालं असतं...पण असं कांहींदेखील न करतां ते तिच्याशीं शांतपणानं आणि प्रेमानं बोलले होते ! ' तोडीची ही तऱ्हा बघ तरी ' असं म्हणून ते वाजविण्यांत रंगून गेले होते ! हा काय चमत्कार ?......

परंतु या चमत्काराचा उलगडा दुसऱ्या दिवशीं सकाळीं रंभाला झाला. हेमचंद्र तिच्याकडे आला व म्हणाला, " तुला कळलं काय ? "

त्याची चर्या अगदीं संतापलेली आणि कांहींशी रडकुंडीस आल्या-सारखी दिसत होती. तिनं विचारलं, " काय ? "

कांहीं उत्तर करण्याऐवजीं दांताखालीं खालचा ओठ धरून, भुंवया दुमडून हेमचंद्र तिची नजर टाळून पहात राहिला. जणुं त्याच्या मनांतले विचार त्याला असह्य होत होते, आणि त्या विचारांना जर आपण शब्दांनीं वाट दिली तर आपण किती वेळ बोलत राहूं त्याचा नियम नाहीं असं त्याला वाटत होतं...

तिनं हलकेच विचारलं, " काय झालं ? "

दांताखालीं धरलेला ओठ सोडून तो म्हणाला, " रंभा, मी तुझा निरोप घ्यायला आलों आहे. "

ती एकदम उद्गारली, " म्हणजे काय ? "

" आत्तांच्या आत्तां निघून जाण्याबद्दल हरिप्रसादनीं मला आज्ञा केली आहे. "

त्याचे दोन्ही हात धरून रंभानं विचारलं, " खरं म्हणतोस ? " तिच्या मनांत आलं, काल सकाळीं पिताजी आपल्याला रागाचा एक शब्ददेखील बोलले नाहींत याचं कारण हें होतं तर ? आपल्याला कोणती शिक्षा करायची तें त्यांनीं मनाशीं ठरवून ठवलं होतं ! हेमचंद्राची व आपली ताटातूट करण्याचा त्यांनीं निश्चय केला होता !...ती म्हणाली, " काय, झालं काय, सांग तरी, पिताजी काय म्हणाले तुला ? "

हेमचंद्राच्या मनांत आलं, कीं हरिप्रसादांचं व त्याचं नुकतंच त्यांच्या खोलींत जें बोलणं झालं होतं तें सारं तिला सांगावं. पण हा त्याचा विचार बदलला, आणि तो तिला म्हणाला, " ते मला काय म्हणाले तें सांगायला मी तुझ्याकडे आलों नाहीं. तूं काय म्हणतेस तें विचारायला आलों आहे. " हें ऐकून गोंधळलेल्या चर्येनं ती त्याच्याकडे पाहूं लागली. तेव्हां त्यानं

विचारलं, "तूं मला जा म्हणणार आहेस ? कीं मी तुझ्याबरोबर येतें, चल, असं म्हणणार आहेस ?--सांग !"

त्याच्या तोंडचे ते शब्द ऐकून रंभा एकदम स्तिमितच होऊन गेली! ध्यानीं मनींदेखील नसलेली वस्तु कोणी तरी एकदम पुढें ठेवून म्हणावं "बघ!" म्हणजे माणूस जसं आश्चर्यानं गांगरून जातं तशी ती गांगरून गेली...

खरं म्हणजे हरिप्रसादांनीं हेमचंद्राला जाण्याची आज्ञा केली या गोष्टीनंच तिच्या मनावर आश्चर्याचा एक मोठा आघात केला होता. हरिप्रसाद हेमचंद्रावर रागावतील याची तिला कल्पना होती. परंतु ते त्याला निघून जायला सांगतील असं तिला वाटलं नव्हतं. त्यामुळें 'पिताजींनीं मला जाण्याची आज्ञा केली आहे' हे हेमचंद्राच्या तोंडचे शब्द ऐकल्याबरोबर तिला क्षणमात्र ते खरेच वाटले नव्हते. आणि आश्चर्याच्या त्या पहिल्या धक्क्यापेक्षांहि अधिक मोठा धक्का तिला बसावा अशा प्रकारें हेमचंद्र आतां बोलत होता. त्याच्याबरोबर तिनंहि जावं असं तो म्हणत होता!...

अत्यंत आश्चर्यचकित होऊन ती कांहीं न बोलतां नुसती पहात राहिली.

तो म्हणाला, "बघतेस काय अशी नुसती माझ्याकडे ? तूं मला जा म्हणणार कीं तूंहि माझ्याबरोबर येणार ? सांग!"

तिच्या विचाराचं चक्र निराळ्याच दिशेनं फिरलं. त्याच्या प्रश्नाचं उत्तर देण्याऐवजीं ती म्हणाली, "पिताजींनीं रागाच्या भरांत तुला जायला सांगितलं म्हणून तूं खरोखरच निघालास कीं काय ? असं करूं नकोस. तुला जायचं कारण नाहीं. मी पिताजींकडे जातें. आणि त्यांचं मन वळवून—"

ती खरोखरच त्याचे हात सोडून खोलीच्या दाराकडे जाऊं लागली. तेव्हां हेमचंद्र तिला धरून ठेवून म्हणाला, "तूं वेडी तर नाहींस ? हरिप्रसाद

आपला विचार बदलतील अशी मूर्खपणाची कल्पना तुझ्या डोक्यांत येते तरी कशी ? ते तुझं मुळींसुद्धां ऐकणार नाहींत. परवां बडे रामदासींच्या-कडचा मुजरा असतांना मी तुला निखिलबाबूंच्या गाडींत घेऊन गेलों याबद्दल ते माझ्यावर खूप रागावले आहेत हें तर खरंच. परंतु त्यांचा राग केवळ या एका प्रकरणाबद्दल नाहीं. तुझा माझा सहवास अजिबात संपवायचं त्यांनीं मनानं पक्कं ठरविलेलं आहे. निखिलबाबूंच्या बंगल्यावर आपण गेलों आणि बडे रामदासींच्या घरीं ठरल्याप्रमाणें तूं जाऊं शकली नाहींस, हें फक्त त्यांच्या रागाचा स्फोट व्हायला निमित्त झालेलं आहे. या स्फोटाची तयारी पुष्कळ दिवस होत होती. मला निघून जाण्याची आज्ञा त्यांनीं आज केली; परंतु ती करण्याचं त्यांनीं किती तरी दिवस अगोदर ठरविलं असलं पाहिजे. ते फक्त संधीची वाट पहात होते. ते आपली आज्ञा मुळींच मागं घेणार नाहींत. तूं त्यांच्याकडे जाण्यांत कांहीं एक अर्थ नाहीं. तूं गेलीस तर मला तें आवडायचं नाहीं. मला एवढंच सांग तूं माझ्याबरोबर यायला तयार आहेस कीं नाहीं ?"

हेमचंद्राबरोबर निघून जाण्याची ती कल्पना त्यानं हट्टानं तिच्यापुढें पुन्हां धरल्यामुळें तिला त्या कल्पनेकडे धीटपणानं पाहणं भागच होतं. आणि आपण प्रेमाखातर ही गोष्ट करायला तयार आहोंत काय असा सवाल स्वतःच्या मनाला करायलाच हवा होता....एकीकडे आश्चर्यानं हेमचंद्राकडे पाहतां पाहतां ती आपल्या मनाचं पृथक्करण करून पाहूं लागली...तिचं हेमचंद्रावर अगदीं निरतिशय प्रेम होतं. त्या प्रेमासाठीं आपण वाटेल तें साहस आणि वाटेल तो त्याग करूं असं ती स्वतःच्या मनाशीं समजत होती, आणि अनेक वेळां हेमचंद्राशीं एकांतांत बोलतांना तिनं अशा प्रकारची आपल्या प्रेमाची ग्वाही त्याला दिली होती... परस्परावर अनुरक्त झालेले स्त्रीपुरुष एकमेकाला आपलं प्रेम सांगतांना

'मी तुझ्यासाठीं वाटेल तें करीन' असे प्रतिज्ञेचे शब्द नेहमींच वापरतात. हे शब्द बोलायला गोड असतात, आणि ऐकायलाहि गोड असतात. एकांतांतल्या शृंगाराच्या वेळेस प्रेमाच्या गुजगोष्टी करतांना हे शब्द बोलल्यानं आणि ऐकल्यानं प्रेमिकांना विशेष सुख होतं हेंहि खरं. परंतु या शब्दांचा उच्चार म्हणजे केवळ प्रीतिविलासाचा एक उपचार असतो. ते शब्द परमार्थानं घ्यायचे नसतात... 'मी तुझ्यासाठीं वाटेल तें करीन' असं हेमचंद्रानं ज्याप्रमाणें तिला अनेक वेळां सांगितलं होतं, त्याप्रमाणें तिनंहि अनेक वेळां त्या शब्दांचं गोड आश्वासन त्याला दिलं होतं. परंतु त्या शब्दाकडे तिनं कधीं सरळ नजर देऊन पाहिलं नव्हतं...आतां त्यांकडे ती पाहूं लागली तेव्हां तिला भय वाटलं. ते शब्द तिला भयंकर वाटले. तें वचन खरं करण्याचं सामर्थ्य आपल्या ठिकाणीं वास्तविक नाहीं याची जाणीव तिला एकदम झाली. तिच्या मनांत आलं, छे! हें भलतंच साहस कसं करूं ?...

तिला नेहमीं वाटत आलं होतं कीं हेमचंद्र आपल्याला हवा, आणि तो आपला व्हावा यासाठीं आपण कोणत्याहि संकटाला तोंड देऊं. हें तिचं वाटणं प्रामाणिकपणाचं होतं. परंतु त्या वाटण्याला ज्या दुसऱ्या भावनेची मर्यादा होती तिच्याकडे आजपर्यंत तिनं नीट लक्ष दिलं नव्हतं. हेमचंद्राविषयींचं प्रेम ज्याप्रमाणें तिच्या अंतःकरणांत होतं त्याप्रमाणेंच हरिप्रसादांविषयींचा आत्यंतिक आदर, त्यांच्याविषयींची दृढ कृतज्ञता, कर्तव्यबुद्धि आणि त्यांचा धाक, इत्यादि भावनाहि तिच्या मनांत होत्या. प्रेम आणि या भावना यांच्यांत कधीं काळीं संघर्ष उत्पन्न होईल असं तिला वाटलंच नव्हतं...हरिप्रसादांना कळूं नये अशी काळजी घेऊन ती हेमचंद्राच्या चोरून एकांतांत गांठीभेटी घेत होती, प्रेमाचा खेळ खेळत होती, सुखाचा अनुभव घेत होती, आणि या प्रकारांतून कधीं काळीं मोठा संघर्ष निर्माण

होईल ही गोष्ट तिनं कधीं मनांतच आणली नव्हती...परंतु आतां तो संघर्ष प्रत्यक्ष निर्माण झाला होता...हरिप्रसादांची किंचित्‌हि पर्वा न करतां ती हेमचंद्राबरोबर निघून जावयास तयार होती कीं नाहीं या प्रश्नाचा निकाल करण्याचा क्षण प्रत्यक्षच येऊन ठेपला होता, व तिच्यापुढें उभा होता !......

आणि त्या प्रश्नाचं ' होय ! मी तुझ्याबरोबर यायला तयार आहे ' असं निःशंकपणाचं उत्तर तिला देतां येत नव्हतं...हरिप्रसादांविषयींच्या भावना आणि हेमचंद्राविषयींचं प्रेम, या दोहोंत झुंज सुरू झाल्यावर त्या भावनांचंच सामर्थ्य अधिक आहे ही गोष्ट मान्य करणं तिला भाग होतं. हेमचंद्र तिला हवा होता हें अगदीं खरं होतं. तिच्या प्रेमांत प्रतारणा अंशमात्र देखील नव्हती. परंतु त्या प्रेमासाठीं हरिप्रसादांना दुखविण्याची शक्ति तिच्या अंगीं नव्हती. तशी इच्छादेखील तिला नव्हती. हरिप्रसादांचे तिच्यावर जे उपकार झाले होते ते सहज विसरून वागण्याइतकी कृतघ्नता आपण दाखवूं शकूं असा विश्वास तिला मुळींच वाटत नव्हता. अशी कृतघ्नता हेंच या घटकेला प्रेमाच्या दृष्टीनं तिचं सामर्थ्य ठरलं असतं. पण हें सामर्थ्य तिच्या अंगीं नव्हतं. तिचं प्रेम कितीहि प्रामाणिक असलं तरी तें एक प्रकारें दुबळं होतं...

या दुबळेपणाची तिला शरम वाटली. आणि हा दुबळेपणा आपल्या प्रियकराजवळ कबूल करावा लागणार याचं तिला मनस्वी दुःख वाटलं. ' मी तुझ्याबरोबर येतें, चल ! ' या शब्दांचा उच्चार तिला करतां येत नव्हता. हेमचंद्राच्या नजरेला नजर देतां येत नव्हती...तिनं एकदम त्याच्या मानेभोंवती हात टाकले, व त्याच्या छातीवर डोकं टेकून ती हुंदके देऊन रडूं लागली. त्याच्या प्रश्नाचं त्याला हवं तें उत्तर ती त्याला देऊं शकत नव्हती. जें उत्तर तिला देतां येत होतं तें देण्याची तिला शरम वाटत

होती. म्हणून रडतां रडतां हातांची मिठी घट्ट करून ती फक्त पुन्हाः पुन्हां म्हणत राहिली, " मला सोडून जाऊं नकोस ! "

जें उत्तर ती टाळीत होती तें हेमचद्रानं ओळखलं. त्याला फार वाईट वाटलं. पण त्यानं तिला दोष दिला नाहीं. फक्त ती आपल्याबरोबर येईल अशी जी आशेनं ओथंबलेली अपेक्षा मनाशीं धरून तो तिच्याकडे आला होता ती एकदम तुटल्यामुळें तो घायाळ झाला. पण तरी आपलं दुःख सांगावसं त्याला वाटलं नाहीं. स्वतःच्या मनाच्या तयारीनं ती जें करील तें त्याला हवं होतं. जें करणं तिच्या जिवाला अवघड व क्लेशकारक होईल असं कांहीं करण्याचा जुलूम त्याला तिच्यावर करायचा नव्हता... तिच्या पाठीवर प्रेमानं हात फिरवीत तो म्हणाला, " जाऊं नको असं मला सांगण्यांत काय अर्थ आहे ? मला गेलं हें पाहिजेच. तूंहि माझ्याबरोबर येशील अशी मला आशा होती—"

रंभा म्हणाली, " हेम ! मी कशी येऊं तुझ्याबरोबर ? पिताजींशीं इतकी कृतघ्न कशी होऊं ? त्यांना सोडून, त्यांना दुखवून मी तुझ्याबरोबर निघून कशी येऊं ? येतें असें उत्तर मी तुला देत नाहीं म्हणून माझं तुझ्यावरचं प्रेम कमी आहे अशी शंका मात्र घेऊं नकोस. माझं प्रेम तुझ्या समजुतीनं हिणकस ठरलं तर मला अतिशय दुःख होईल—"

हेमचंद्र म्हणाला, " वेडे, मी तुझ्या प्रेमाची शंका कधींच घेणार नाहीं. ज्या तुझ्या प्रेमाचा प्रत्यय मला अनेक प्रकारांनीं आलेला आहे त्याच्या सच्चेपणाचा संशय मला कसा येईल ? पण रंभा, हें जगच असं चमत्कारिक आहे कीं प्रेमाची वाट सहसा सोपी नसते. त्या प्रेमाची परीक्षा जग हजार तऱ्हांनीं पहात असतं. शुद्ध सोनं हें तत्वतः शुद्धच असतं. पण अग्नींत तावून सुलाखून निघाल्यावांचून त्याचा शुद्धपणा जग मानीत नाहीं. प्रेमाची तशीच गोष्ट आहे. संकटापेक्षां आपलं सामर्थ्य अधिक आहे असं जें प्रेम

सिद्ध करतं तेंच सफल होईल. आपण लग्न करूं अशी फार आशा मी ठेविली होती, आणि मला वाटलं. होतं आपल्या मार्गांत जेव्हां संकट उभं राहील तेव्हां तूं माघार घेणार नाहींस. पण--पण—"

त्यानं तें वाक्य तसंच सोडलं. परंतु जेवढं तो बोलला होता तेवढ्याचाच तिच्या मनावर फार परिणाम झाला होता. तिला दुःख होईल असं कांहीं बोलण्याचं त्यानं टाळलं होतं. परंतु त्याचं तें बोलणं ऐकून तिला जरी दुःख झालं नाहीं तरी तिच्या आतांपर्यंतच्या विचारांना निराळी गति मिळाली. तिच्या मनांत आलं, हा म्हणतो तें खरं आहे. कसोटीला उतरेल तेंच खरं प्रेम ! कसोटीची वेळ येण्यापूर्वीं प्रेमाचा केवढाहि विलास झाला तरी त्याचा काय उपयोग ?...माझ्या प्रेमावर संकट आलेलं आहे...या संकटाच्या वेळेसच माझी खरी परीक्षा आहे. हरिप्रसादांविषयींच्या आदराचीं आणि कृतज्ञतेचीं बंधनं माझे पाय ओढून माझ्या प्रेमाचं साफल्य कायमचं अशक्य करून टाकतात, कीं तीं बंधनं पार तोडून टाकून मला जें प्रेमाचं सुख हवं तें मी मिळावतें, असा या घटकेला प्रश्न आहे. या वेळेस मी जर कच खाल्ली तर माझ्या प्रेमाची शंका घेऊं नकोस असं मी हेमचंद्राला म्हणावं यांत कोणता अर्थ आहे ? तो माझ्या तोंडावर बोलून दाखविणार नाहीं, पण मनांत समजेल कीं प्रेम करण्याची हिची लायकी नाहीं. माझ्या प्रियकराच्या दृष्टीनं मीं नालायक ठरावं काय ? नाहीं ! नाहीं ! या क्षणीं मी हेमचंद्राला म्हटलं पाहिजे, वाटेल तें होऊं दे, मी तुझ्याबरोबर येतें, चल...

ही इच्छा तिच्या मनांत जोरानं उसळली खरी, तथापि त्या इच्छेप्रमाणें तिच्या तोंडून शब्द बाहेर पडले नाहींत. कारण त्या इच्छेचा प्रतिकार करणारे उलट बाजूचे विचारहि तिच्या मनांत उचंबळून आले. हरिप्रसादांनीं तिचं क्षुद्र आयुष्य आपल्या मायेनं आणि विद्येनं उजळून

टाकून मोठं केलं होतं. त्यांना दुखविणं, त्यांना सोडून जाणं यासारखी नीचपणाची गोष्ट दुसरी नव्हती...

तिच्या मनाचा विलक्षण कोंडमारा झाला. एकीकडे तिला वाटत होतं, हेमचंद्राचे हात धरावेत आणि त्याला म्हणावं चल, तूं नेशील तिकडे यायला मी तयार आहे. आणि दुसरीकडे तिला वाटत होतं हें पाप सहजासहजीं करायचं ? मला कांहीं लाज ! एकीकडे तिचं मन म्हणत होतं प्रेमासाठीं वाटेल तें करणार होतीस ना तूं? मग आतां कां कचरतेस ! आणि दुसरीकडे तेंच मन तिला विचारीत होतं, पागल व्हायचंय कां तुला !...तिच्या मनाचा निश्चय होईना. आणि मनाच्या त्या अनिश्चित स्थितींत तिच्या अंतःकरणावर एका विचाराची तीक्ष्ण धार सारखी घासली जात होती. हेमचंद्र आतां गेला कीं पुन्हां कधींहि भेटणार नाहीं या कल्पनेनं तिचं हृदय कापलं जात होतं...

ती त्याला म्हणाली, " हेम ! मला थोडा अवधि दे. तुझ्याबरोबर निघण्याचं धैर्य या क्षणीं मला होत नाहीं. पण मला थोडा वेळ दिलास, थोडा थांबलास तर तें धैर्य माझ्या ठिकाणीं येईलहि !" ती त्याच्याकडे अगदीं आर्जवाच्या नजरेनं पहात राहिली.

हेमचंद्र म्हणाला, " रंभा, तुझ्या या बोलण्यानं मला पुष्कळ आशा वाटते. तुला एकाएकीं मनाचा निश्चय करतां येत नाहीं याबद्दल मी तुला दोष देत नाहीं. माझं तुझ्यावर फार फार प्रेम आहे. तुझ्यावांचून जगणं मला अशक्य आहे. म्हणूनच माझ्याबरोबर चल असं मी तुला म्हणतों. तूं आलीस तर मी तुला फार सुखी करीन. तूं म्हणतेस त्याप्रमाणें थांबायची माझी तयारी आहे. या घरांतून तर मला आत्तां गेलंच पाहिजे. पण हें शहर सोडून मी जाणार नाहीं. स्टेशनसमोर जें मोठं हॉटेल आहे तिथें मी राहीन. तुमचा मुक्काम उद्यां संध्याकाळीं येथून

हालणार आहे. त्या गडबडींत इथून नाहींसं होणं आणि हॉटेलांत माझ्याकडे येणं तुला अवघड जाणार नाहीं. तूं आलीस कीं आपण दूर कुठें तरी निघून जाऊं..."

त्याचं हें बोलणं ऐकतांना रंभाचे डोळे एकीकडे पाण्यानं भरून येत होते आणि दुसरीकडे आनंदाची एक नवीनच चमक त्या नजरेंत दिसत होती. पर्वतावर चढतां चढतां वाटाड्यानं सूर्यकिरणांत तळपणाऱ्या हिमाच्छादित शिखराकडे बोट दाखवून तिथें आपल्याला जायचं आहे असं सांगितलं कीं वाटेचा बिकटपणाहि ध्यानांत यावा, आणि त्या शिखरावर पोंचल्यावर किती आनंद होणार त्याचीहि सुखकारक कल्पना यावी, म्हणजे माणसाच्या मनाची जशी अवस्था होते तशी रंभाच्या मनाची अवस्था या क्षणीं झाली होती. हेमचंद्राच्या बेताचा एकेक शब्द ऐकतांना ती किंचित् हंसत मान हालवीत होती, जें करायला तो तिला सांगत होता तें आपण करूं असं तिला वाटत होतं...तो गप्प राहिला तेव्हां ती म्हणाली, "मी तुझ्याकडे येईन."

त्यानं एकदम आनंदानं तिला मिठींत घेतलं आणि विचारलं, "खरंच येशील?"

तिनं मान हालविली आणि आवंढा गिळला. तिच्या तोंडांतून शब्द फुटणं शक्य नव्हतं.

तो म्हणाला, "मी तुझी वाट पाहीन."

ती म्हणाली, "पहा!" ती जराशी थांबली. तिच्या नजरेंत जी अपेक्षा दिसली ती ओळखून हेमचंद्रानं तिचं चुंबन घेतलं. जणुं त्या चुंबनानं कोणत्या तरी अद्भुत शक्तीच्या धारा हृदयांत सोडल्यासारखं रंभाला वाटलं, आणि पहिल्यापेक्षां अधिक दृढ स्वरांत ती म्हणाली, "हेम! मी तुझ्याकडे येईन!"

# प्रकरण सातवें

चहूं बाजूंच्या लाऊडस्पीकर यंत्रांत खरखर असा आवाज झाला. 'ऐका!' अशा अर्थाचा हिंदी शब्द त्यांतून निघाला. विद्युत् दीपांनीं झळाळून गेलेल्या त्या विस्तीर्ण मंडपांतील हजारों लोकांची आपसांतील कुजबुज एकदम थांबली. सगळीकडे अगदीं संपूर्ण स्तब्धता पसरली. मग लगेच लाऊडस्पीकर यंत्रांतून घोषणा झाली, "अखिल भारतीय कीर्तीचे अद्वितीय तंतकार हरिप्रसादजी यांच्या खास शिष्या रंभादेवी यांचं नृत्य आतां होईल."

तें ऐकतांच मंडपांतील लोकांनीं हातांतले कार्यक्रमाचे छापील कागद उलटून पाहिले, त्यांची अस्पष्ट सळसळ झाली. त्या कागदावर छापलेल्या एका फोटोकडे एकमेकांचं लक्ष वेधून जो तो दुसऱ्याला कांहीं सांगू लागला. त्यामुळें पुन्हां कुजबुजहि झाली. ज्या कार्यक्रमाची लोकांनीं फार उत्कंठेनं अपेक्षा केलेली असते तो आतां सुरू होणार हें कळल्यावर सभागृहांतल्या प्रेक्षकांत ज्या प्रकारची कुजबुज नेहमींच होते तशा प्रकारची ती कुजबुज

होती. गेले चार दिवस सकाळ सध्याकाळ गायन-वादन-नृत्याचे अनेक उत्तमोत्तम कार्यक्रम या परिषदेंत झाले होते. मोठमोठ्या कलावंतांच्या बैठका झाल्या होत्या. आणि हे सगळे कार्यक्रम सरस वठल्यामुळें लोक अगदीं खूषहि होऊन गेले होते. परंतु या खुशींतहि सगळे लोक ज्या कार्यक्रमाची वाट पहात होते तो म्हणजे हरिप्रसादांच्या शिष्येच्या नृत्याचा ! अखिल भारतीय संगीत परिषदा यापूर्वीं अनेक वेळां अनेक शहरीं झाल्या होत्या. पण 'एशियाटिक म्युझिकल कॉंग्रेस' भरविण्याचा हा उपक्रम प्रथमच करण्यांत आला होता. या परिषदेसाठीं दूरदूरचे कलावंत जसे आले होते तसेच दूरदूरच्या ठिकाणांहून श्रोतेहि आले होते. या श्रोत्यांपैकीं कित्येकांनीं हरिप्रसादांच्या शिष्येचं नृत्य पूर्वीं पाहिलेलं होतं, व आजूबाजूच्या खुर्च्यांवर बसलेल्या श्रोत्यांना ते तिच्या नृत्याच्या अपूर्वाईचीं वर्णनं वरचेवर सांगत होते. एखादा मोठा गायक गाऊन गेला, अगर एखाद्या नामांकित तंतकाराचं वादन आटपलं, किंवा एखाद्या नृत्याचा कार्यक्रम संपला कीं आतां पुढचे कोणकोणते कार्यक्रम राहिले याची चर्चा श्रोते आपापसांत करीत. अशा चर्चेच्या वेळेस ज्यांनीं रंभाचं नृत्य पाहिलं होतं, ते इतरांना सांगत, " बाकी सारे कार्यक्रम फिके ठरविणारा कार्यक्रम अजून पुढेंच आहे, थांबा." कार्यक्रमाची पत्रिका उलटून रंभाच्या फोटोवर बोट ठेवून ते पुढें म्हणत, " हिचं नृत्य पहाल तेव्हां कळेल तुम्हांला." श्रोत्यांपैकीं जे संगीताच्या खऱ्या लोभानं बावरलेले असत ते म्हणत, " या नर्तिकेची कीर्ति ऐकलीय खरी बुवा." आणि ज्यांना संगीताची रुचि मुळींच नव्हती, परंतु लोकांनीं आपल्याला रसिक म्हणावं एवढ्याचसाठीं शेपन्नास रुपयांचं तिकिट सहज काढण्या-इतकी ज्यांची ऐपत होती असे लोक फोटोकडे पाहून म्हणत, " किती खूबसुरत आहे हो ही ! " अशा प्रकारें कुणी रंभाचं नृत्य पूर्वींच केव्हां

तरी कुठें तरी पाहून आलेले, कुणी तिची कीर्ति ऐकून तिचं नृत्य प्रत्यक्ष पहावयास उत्सुक झालेले, कुणी केवळ तिचा फोटो पाहून तिच्या रूपावर भाळलेले, असें हजारों लोक रोषणाईनं लखलखणाऱ्या त्या मंडपांत आपापल्या जागीं उत्कंठित होऊन बसले होते...लाऊडस्पीकरमधून रंभाच्या नृत्याची घोषणा झाली ती ऐकतांच "हं, ज्या कार्यक्रमाची आपण वाट पहात होतों, तो आला हं" अशा अर्थाच्या नजरा लोकांनीं एकमेकांकडे टाकल्या आणि अशा अर्थाचे शब्दहि लोक एकमेकांत बोलले, तेव्हां त्या बोलण्याची कुजबुज मंडपभर पसरली. साऱ्यांचं लक्ष रंगभूमीकडे लागून राहिलं. आतां घंटा वाजली कीं पडदा दूर होणार होता, आणि ज्या नृत्याची त्यांनीं इतक्या अधीरतेनं वाट पाहिली होती तें नृत्य त्यांच्या दृष्टीस पडणार होतं...

लाऊड स्पीकरमधली घोषणा जशी बाहेरच्या मंडपांतल्या हजारों श्रोत्यांनीं ऐकली तशीच पडद्यामागं रंगभूमीवर उभ्या राहिलेल्या रंभानंहि ती ऐकली. "अखिल भारतीय कीर्तीचे अद्वितीय तंतकार हरिप्रसाद यांची खास शिष्या..." मंडपांतले प्रेक्षक अत्यंत उत्सुक झाले होते. केव्हां एकदां घंटा होते आणि पडदा सरकतो अशी घाई त्यांना झाली होती. नृत्याच्या वेळच्या वेषभूषेंतली रंभाची लावण्यमूर्ति पाहण्यासाठीं त्यांचे डोळे अधीर झाले होते...पण स्वतः रंभाला अधीरता वाटत नव्हती. तिला वाटत होतं, घंटा कधीं होऊंच नये, पडदा कधीं सरकूंच नये! काळाची गति या क्षणावरच गोठून थांबली, आणि आयुष्यच संपलं तर फारच बरं होईल! आयुष्याच्या लोंढ्यांत सांपडून पुढें पुढें जातां जातां ती थकली होती. लौकिकाचा व प्रशंसेचा पाऊस अंगावर घेऊन घेऊन ती चिंब भिजून गेली होती. त्या वर्षावानं तिच्या जिवाला नवचैतन्य आणि टवटवी येण्याऐवजीं त्याचा गारठा तिला असह्य वाटूं लागला होता.

गेल्या वर्षभरांत आपल्या नृत्यकौशल्याचे दिग्विजय करीत तिनं असंख्य लोकांना आनंद दिला होता. पण तो देतांना तिच्या हृदयांत सतत आरोळी उठली होती, माझा आनंद कुठें आहे? माझं सुख कुठें आहे? त्या दिग्विजयांचं वलय जगाला मोठं तेजःपुंज वाटत होतं. परंतु तिच्या स्वतःच्या अंतःकरणाला त्या वलयाच्या तेजाऐवजीं त्याची प्रखर उष्णताच चटके देत होती. तिचं अंतःकरण उत्साहानं अधिकाधिक भरून येण्याऐवजी रिकामं आणि शून्य, शुष्क होत गेलं होतं. कलेची उपासना तिला गुलामगिरी सारखी वाटूं लागली होती. विद्या तिला नकोशी झाली होती. मोठेपणा तिरस्करणीय वाटूं लागला होता. कारण त्या मोठेपणांत काडीमात्र आनंद उरला नव्हता. ज्या वाटेनं ती चालली त्या वाटेवर लोकांनीं उधळलेली प्रशंसेचीं फुलं पसरलीं होतीं. 'वाहवा! वाहवा!' अशा उद्‌गारांचीं वाद्यं वाजत होतीं. परंतु एखाद्या चुकलेल्या वाटसराप्रमाणें तिच्या स्वतःच्या मनाची अवस्था झाली होती. कुणाच्या तरी जुलमानं पुढें पुढें ढकलल्याप्रमाणें तिचीं पावलं पडत होतीं. विलक्षण एकटेपणा तिला गांजीत होता. ती बावरल्यासारखी इकडे तिकडे पहात होती. जिवाची सोबत कुठें सांपडेल म्हणून ती नजरेनं शोधत होती; आणि ती सोबत आतां पुन्हां कधींच मिळणार नाहीं या शंकेनं तिचा जीव दुमडून गुदमरून गेला होता. 'हेमचंद्र! हेमचंद्र!' अशा हांका तिच्या अंतःकरणांतून उठत होत्या. त्या हांकांना उलट जबाब आतां कधीं मिळणार नाहीं या विचारानं ती घाबरी होत होती. ती हांक मिळण्याची संधि तिनं एकदां घालविली होती! ती संधि आतां पुन्हां कुठून येणार?...ती संधि तिला ज्या दिवशीं घालवावी लागली त्या दिवसाची आठवण तिला वरचेवर होत राहिली होती. तिला वाटे एखादा चमत्कार होऊन काळचक्र उलट फिरावं आणि ज्या दिवशीं सागरपूरच्या

मुक्कामांत स्टेशनसमोरच्या हॉटेलांत हेमचंद्राला भेटण्यासाठीं ती जाणार होती तो दिवस पुन्हां यावा. पण तें कसं शक्य होतं ? असा चमत्कार कधीं होत नाहीं. तो दिवस गेला तो कायमचा गेला. हेमचंद्राबरोबर निघून जाण्याची संधि एकदां गेली ती आतां परत येणार नाहीं. तिच्या आयुष्यांतला किती चमत्कारिक आणि दुष्ट दिवस तो ठरला होता ! त्या दिवशीं हातापायांत बेड्या ठोकलेल्या एखाद्या कैद्याप्रमाणें तिची अवस्था कशी झाली होती ?...

" मी तुझ्याकडे येईन ! " असं हेमचंद्राला सांगून त्याला निरोप दिल्यानंतर ती जेव्हा आपल्या अंथरुणांत स्वस्थ विचार करीत पडली होती तेव्हां तिला केवढा तरी विश्वास वाटला होता. जो कठोरपणा केल्याखेरीज सुख मिळविणं अशक्य होतं तो कठोरपणा आपण अंगीं आणूं शकूं असं तिला वाटलं होतं. ज्या कृतज्ञतेचं बंधन तिचे पाय मागं ओढीत होतं तें बंधन तोडणं अवघड नाहीं असं तिला वाटूं लागलं होतं. आतां फक्त चोवीस तास ती त्या बंधनांत राहणार होती. त्यानंतर ते पाश तुटणार होते. बंदिखान्याचे दरवाजे खुले होणार होते. बाहेरच उभ्या राहिलेल्या हेमचंद्राच्या मिठींत ती शिरणार होती. फक्त चोवीस तासांचं अंतर उरलं होतं !...

असे विचार मनाशीं करीत ती पडली असतांना बुंदू तिच्याकडे येऊन म्हणाला होता, " लौकर चला. पिताजींची तब्बेत एकदम बिघडली आहे. "

ती तावडतोब हरिप्रसादांच्याकडे गेली होती.

ते घाबरे झालेले तिला दिसले होते. ते आपल्या अंथरुणावर पडले होते आणि वात झाल्याप्रमाणें बडबडत होते. डॉक्टर आले, त्यांनीं सांगितलं कीं यांच्या मनाला कसला तरी भयंकर त्रास झालेला आहे, दुसरं कांहीं

नाहीं, यांनीं पूर्ण विश्रांति घेतली कीं हे बरे होतील, घाबरायचं कांहीं एक कारण नाहीं...त्यांच्या मनाला कसला त्रास झाला होता तें रंभाच्या लक्षांत आलं होतं. हेमचंद्राला निघून जाण्याची आज्ञा करण्याच्या वेळेस त्याचं आणि त्यांचं जें भांडण झालं त्याची हकीगत तिला सांगण्याचं हेमचंद्रानं टाळलं होतं. पण तरी तें भांडण फार कडाक्याचं झालं असलं पाहिजे एवढं तिला ओळखतां येत होतं. हरिप्रसाद हेमचंद्राला वाईट वाईट बोलले असले पाहिजेत. त्यानंहि त्यांचा मुलाहिजा ठेवला नसेल. हरिप्रसाद अधिकच संतापले असतील. आणि त्या वेळेस त्यांच्या मनाला झालेल्या त्रासामुळेंच त्यांची प्रकृति अशी एकाएकीं बिघडली असेल...

हरिप्रसाद तिचा हात धरून म्हणाले होते, "बेटी, तूं माझ्याजवळ अशी बसून रहा म्हणजे मला बरें वाटेल." ती त्यांच्याजवळ बसून राहिली होती. तिच्या मनांत येत राहिलं होतं, यांना सुख देण्याची ही शेवटची वेळ आहे. या वेळेस मी नाहीं कशाला म्हणूं ? उद्यां मी यांचे माझे ऋणानुबंध संपविणार आहे. मी निघून गेल्यानंतर हे किती संताप करून घेतील याचा विचार मी करूं लागलें तर माझा पाय पुन्हां इथें रेंगाळेल. तो विचार मनांतच येऊं देतां कामा नये. पण अखेरच्या कर्तव्यांत उगीच कसूर कशाला करायची ?...ती त्यांच्या अंथरुणाजवळ बसून राहिली होती.

बडे रामदासींच्या घरचा नृत्याचा कार्यक्रम आतां रद्द करावा असं बुंदूनं सुचविलं होतं. पण हरिप्रसाद म्हणाले होते, "छे छे ! रामदासींच्या घरीं रंभाचा नाच झालाच पाहिजे. माझ्या तब्येतीला रात्रीपर्यंत आरामहि पडेल. आणि जरी पडला नाहीं तरी आपण रामदासींच्या घरीं जायचंच." त्यांच्या या इच्छेप्रमाणें रंभा त्यांच्याबरोबर रामदासींच्या घरीं गेली होती. नाचली होती. रामदासींनीं तिला एखाद्या मुलीप्रमाणें जवळ घेऊन तिच्या मस्तकावरून हात फिरवीत तिला म्हटलं होतं,

" फार फार सुंदर नाचलीस तूं. मी गरीब फकीर मनुष्य. शाबासकी-खेरीज मी तुला काय देणार ? तुला कोणता आशीर्वाद देऊं, सांग. "

ती एकदम म्हणाली होती, " माझे मनोरथ पूर्ण होतील एवढं आपण म्हणा म्हणजे झालं. "

" तुझे मनोरथ खचित पूर्ण होतील. तुझ्या अंगीं फार मोठे गुण आहेत. तूं करशील तेवढी विद्या थोडी आहे, मिळवशील तेवढा लौकिक थोडा आहे."

त्यांच्या तोंडच्या पुढच्या वाक्यांकडे रंभाचं लक्ष नव्हतं. " तुझे मनोरथ खचित पूर्ण होतील " या त्यांच्या शब्दांनीं ती आनंदून गेली होती. ते शब्द म्हणजे तिनं मनाशीं जो गुप्त निश्चय केला होता त्या निश्चयाला मिळालेला एक पवित्र आशीर्वाद होता असं तिला वाटलं. आपल्या अंगचं सामर्थ्य वाढल्यासारखं तिला वाटलं. आतां फक्त थोड्याच घटकांचा अवकाश उरला होता. मग दुसरा दिवस उजाडणार होता. आणि त्या दिवसाच्या सुमुहूर्तावर ती हेमचंद्राकडे जाणार होती...आनंदानं गहिंवरून जाऊन तिनं बडे रामदासींच्या पायांवर पुन्हां मस्तक टेकलं होतं...

बडे रामदासींनीं हरिप्रसादांचीहि फार प्रशंसा केली. " इतकी विद्या तुम्ही या मुलीला दिलीत हें पाहून मला फार आनंद झाला." ते म्हणाले. " माझ्या घरीं येऊन मला हिचा नाच दाखविलात, मोठी मेहेरबानी ! "

हरिप्रसाद म्हणाले " आपली योग्यता मी ओळखतों— "

" अशी ओळख ठेवणारीं माणसं आतां दुर्मिळ होत चाललीं आहेत." बडे रामदासींना उठवत नव्हतं तरी हरिप्रसादना निरोप देण्यासाठीं ते जिन्याच्या तोंडापर्यंत आले होते.

" बरं येऊं ? " असं म्हणून हरिप्रसादनीं नमस्कार केला होता, आणि दुसऱ्याच क्षणीं पायरीवर पाय टाकण्याऐवजीं " आ : ! " असा उद्गार काढून ते मटकन खालीं बसले होते. " काय झालं ? " म्हणून रामदासी

खालीं वाकले तों हरिप्रसाद आडवेच झाले...त्यांच्या छातींत कळ आली होती. त्यांना घेरी आली होती...रामदासींनीं आपल्याकडची मात्रा त्यांना दिल्यावर ते थोडे सावध झाले होते. त्यांना जास्त बरं वाटलं तेव्हां त्यांना घरीं नेण्यांत आलं. सकाळीं डॉक्टरांना आणण्यांत आलं. त्यांनीं हरिप्रसादांची तब्येत तपासली, आणि सागरपूरहून चार पांच मैलांवर असलेल्या आपल्या सॅनिटेरियममध्यें कांहीं दिवस विश्रांतीसाठीं त्यांना घेऊन जाण्याचं ठरविलं. लगोलग सारी व्यवस्था करण्यांत आली. डॉक्टर हरिप्रसादांना घेऊन निघाले. हरिप्रसाद डॉक्टरांना म्हणाले, "रंभा माझ्याजवळ असायला हवी. त्याखेरीज मला आराम वाटणं शक्य नाहीं." म्हणून हरिप्रसादांच्या बरोबर तिलाहि घेऊन जाण्याची व्यवस्था डॉक्टरांनीं केली...

ही सारी घटना इतक्या अनपेक्षितपणानं झाली आणि ती घडतांना ती घडूं नये असा प्रतिकार करणं रंभाला इतकं अशक्य झालं कीं तिला वाटलं जणुं आपल्याविरुद्ध रचल्या गेलेल्या एखाद्या पद्धतशीर व्यूहाच्या फेऱ्यांतच आपण सांपडलों आहोंत. जें घडलं त्याविरुद्ध हातपाय हालविणं तिला अगदीं अशक्य होतं. तिच्या इच्छेचा मुळीं प्रश्नच उरला नव्हता. हरिप्रसादांची अवस्था खरोखरच चिंता करण्यासारखी झाली होती. ते म्हणाले नसते तरीदेखील त्यांना तशा अवस्थेंत टाकून जाणं तिच्यानं झालं नसतं. आणि त्यांतून ते तर तिला पुनः पुन्हां म्हणत होते, "बेटी, यांतून मी पार पडेन असं मला वाटत नाही. माझी अखेरची घटका येणारच असेल तर ती येईल तेव्हां तुझा हात माझ्या हातांत असूं दे. मग मला सुखाचं मरण येईल. तुझ्यावांचून मला दुसरं कोण आहे बेटी? ज्या विद्येवर मी प्राणापलीकडे प्रेम केलं ती विद्याच तुझं रूप घेऊन मूर्तिमंत माझ्या नजरेसमोर आज आठ वर्षं वावरली. तूं आणि माझी

सतार माझ्याजवळ असली म्हणजे मी आनंदानं मरण पत्करीन. माझ्याजवळ रहा." त्यांच्या असल्या बोलण्यानं तिच्या मनांत त्यांच्याबद्दलच्या करुणेची मोठीच ऊर्मि उत्पन्न झाली होती. त्यांच्यापासून दूर होणं तिला अशक्य झालं होतं...

अशा प्रकारें हेमचंद्राकडे जाण्याचा तिचा निश्चय कोठल्या कोठें नाहींसा झाला होता !

पंधरा दिवसांनीं हरिप्रसादांना घेऊन ती परत सागरपूरला आली. आल्यानंतर वेळ न घालवितां ती स्टेशनासमोरच्या हॉटेलांत गेली. पण हेमचंद्र तिला तिथें भेटला नाहीं. त्याच्याकडे कोणता दोष होता ? त्यानं तिची वाट पाहिली असेल. अखेर ती येत नाहीं असं ठरवून तो निघून गेला असेल...आणि तो कुठें गेला तें तिला कळण्याचाहि कांहीं मार्ग आतां उरला नव्हता...त्याच्याकडे जाऊन आपलं प्रेम सफल करण्याची संधि आतां पुन्हां येणं शक्य नव्हतं. आतां हेमचंद्रावांचून आयुष्याची वाट चालणं तिला भाग होतं...

या वाटेनं ती जवळजवळ वर्षभर चालली होती. तिच्या आयुष्यक्रमांत लोकांकडून वाहवा मिळविण्याचे अनेक जाहीर प्रसंग येत होते. ज्या ज्या शहरीं तिचे नृत्याचे कार्यक्रम होत होते त्या त्या शहरीं तिचा गौरव होत होता. मोठमोठ्या कलाकारांच्या सभांत ती मोठी ठरत होती. तिच्याकडे पाहून हरिप्रसाद मनाशीं म्हणत, " हिला प्रेमाच्या मोहापासून मी एकदां वांचविलं, म्हणून हिचं आयुष्य इतकं यशस्वी झालं. त्या मोहाला ही बळी पडली असती तर आज जो लौकिक हिला मिळाला आहे तो कुठून मिळाला असता ? त्या वेळेस मी कठोरपणानं वागलों आणि हेमचंद्राला घालवून दिलं तेंच बरोबर केलं "...

हरिप्रसाद मनाशीं असं वरचेवर म्हणत असत याचं कारण असं कीं त्यांच्या मनाला एका दुःखद विचाराची रुखरुख होती...ज्या दिवशीं त्यांनीं हेमचंद्राला आपल्या खोलींत बोलावून घेऊन रंभाला बिघडविल्या-बद्दल त्याची निर्भर्त्सना केली होती त्या दिवशीं हेमचंद्र त्यांना म्हणाला होता,

" प्रेम विद्येच्या आड येतं ही तुमची समजूत चुकीची आहे. विद्येच्या उपासनेची तळमळ मला आणि रंभाला दोघांनाहि आहे. आम्ही एकमेकांवर प्रेम केलं म्हणून ती तळमळ कमी होईल असं तुम्ही कसं म्हणतां ? "

ज्यांनीं प्रेमांत सांपडून आपल्या कलेची खराबी करून घेतली अशा बाजूंचीं उदाहरणं हरिप्रसाद सांगूं लागले तेव्हां तो म्हणाला होता, " उलट बाजूचीं उदाहरणंदेखील मी तुम्हांला सांगूं शकेन. माझ्या सहवासानं आणि प्रेमानं रंभा बिघडेल या समजुतींत कांहीं एक अर्थ नाहीं. "

हरिप्रसाद उसळून म्हणाले होते, " बिघडेल नव्हे, बिघडलीच आहे. पूर्वीची रंभा राहिली नाहीं. माझ्या शब्दाची किंमत तिला उरली नाहीं. पूर्वीं ती सर्वस्वी माझ्या हुकुमांत होती. पण आतां तूं काय म्हणशील, तुला काय वाटेल, याचा विचार ती आधीं करतें—"

हेमचंद्र एकदम हंसून म्हणाला होता, " बरं झालं माझ्यावरच्या रागाचं खरं कारण सांगितलंत. तिनं माझ्यावर प्रेम केलं तर तिचं विद्येवरचं लक्ष उडेल असं तुम्हांला मनापासून वाटत नाहीं. तें वाटण्याचा खोटा देखावा तुम्ही करीत आहांत. आमच्या प्रेमावर तुमचा खरा राग आहे तो तुमचा रंभावरचा अधिकार संपेल या भीतीमुळें. तुमचं महत्त्व कमी होईल, तुमची तिच्यावरची हुकुमत संपेल, या भयानं तुम्हाला ग्रासलें आहे. तुमचा अहंकार तुम्हाला दुष्ट करतो आहे—"

त्याचे ते शब्द ऐकतांच आपल्या मनांतली खरी गोष्ट यानं ओळखली अशा विचारानं हरिप्रसाद अधिकच संतापले होते व मग संतापानं वाटेल तसं बोलत राहून अखेर त्यांनीं त्याला तावडतोब निघून जाण्याची आज्ञा केली होती...

तो निघून गेला तेव्हां त्यांच्या मनांत वरचेवर आलं खरोखर माझ्या अहंकाराच्या आहारीं जाऊन मी चूक तर करीत नाहीं ?...

हा विचार त्यांच्या मनांत सदैव सलत राहिला होता. आणि त्या शल्याचं दुःख कमी व्हावं म्हणून, स्वतःच्या अपराधाच्या जाणीवेवर फुंकर घालायसाठीं म्हणून, ते वरचेवर स्वतःशीं म्हणत, " त्या दिवशीं मी हेमचंद्राला घालवून दिला हेंच बरोबर केलं... " रंभाच्या नृत्याचे जाहिर प्रयोग एकाहून एक यशस्वी होत होते, दुनियेनं तिचा अधिकाधिक सत्कार केलेला त्यांना दिसत होता. अशा वेळीं ते दुरून तिच्याकडे पहात, आणि मनाशीं म्हणत, मी केलं तें बरोबर होतं.

हेमचंद्राला ज्या दिवशीं त्यांनीं घालवून दिलं त्याची आठवण रंभाजवळ सुद्धां कधीं तरी ते काढीत. आणि ते तिला म्हणत, " बेटी, त्या दिवशीं कदाचित् तूं माझ्यावर रागावलीहि असशील. पण मी जें केलं तें तुझ्या बऱ्यासाठींच केलं ही गोष्ट आतां तुला पटली असेल. "

बऱ्यासाठींच केलं !...त्यांचे ते शब्द ऐकले कीं रंभाला वाटे, त्यांना म्हणावं, कृपा करून माझ्या अंतःकरणांत एकदां डोकावून पहा, म्हणजे तुम्हांला कळेल मी सुखी आहे कीं दुःखी आहे. हरिप्रसादांच्या त्या शब्दांच्या रूपानं आपलं दुर्भाग्य आपल्याला वेडावतं आहे असं तिला वाटे... तिचं काय बरं झालं होतं ?... तिनं आणखी विद्या केली होती. आणखी कीर्ति संपादिली होती. यशाच्या मार्गावरून ती उंच उंच चढत होती. पण यांत तिच्या अंतःकरणाला विसावा कुठें होता ?

रंगभूमीवरच्या विद्युत्दीपांचा झगझगाट, प्रेक्षकांच्या टाळयांचा कडकडाट, या साऱ्या गोष्टी तिला निरर्थक वाटत होत्या. विद्या, कीर्ति, यश यांना खरी शोभा केव्हां येते? प्रेमाच्या साफल्यावांचून येते काय? कलेचे पराक्रम, विद्येतलं यश, लौकिक, या साऱ्या गोष्टी कोंदणासारख्या आहेत. त्यांत सफल झालेल्या प्रेमाची हिरकणी चमकत असेल तर त्या कोंदणाची शोभा! एरवीं त्याची काय शोभा? तें कोंदण रिकामं आणि निष्प्रभच दिसणार!...तिला पुष्कळदां वाटे, हरिप्रसादांना म्हणावं, "पिताजी, तुम्ही काय माझं बरं केलंत? माझ्या जीवाचं खरं समाधान माझ्यापासून हिरावून घेतलंत! त्या समाधानाला मी कायमची मुकलें. हे सत्कार, हा लौकिक, आणि ही विद्या, हें सारं वेगळी समाधान आहे. मी तुम्हांला दोष देत नाहीं. माझ्या प्राक्तनांत होतं तसं झालं असं मी समजतें. पण कृपा करून माझं तुम्ही बरं केलंत असं म्हणत जाऊं नका..."

पण तिला पुन्हां वाटे, हें बोलण्यांत आतां कोणता अर्थ राहिला होता? असं बोलल्यानं आतां कोणती चूक दुरुस्त होणार होती? जी सोबत तिला हवी होती, आणि जी तिनं गमावली होती, ती काय असं बोलण्यानं तिला परत सांपडणार होती? तिचं सुख हरवलं तें आतां पुन्हां परत मिळणार नव्हतं. कुणावर रागावण्यांत अर्थ नव्हता. आयुष्याचा द्वेष करण्यांतहि अर्थ नव्हता. कलेची उपासना करण्याचा देखावा करीत आयुष्याची वाट चालणं तिला भाग होतं...

मात्र असा विवेक तिनं मनाशीं कितीहि केला तरी कधीं कधीं स्वतःच्या आयुष्याचा तिला कंटाळा येत असे. तसा कंटाळा आला कीं तिला आवेगानं वाटे, नको ही विद्या आणि नको हें कलेचं जाहीर प्रदर्शन! दूर कुठें तरी निघून जावं आणि एखाद्या जंगलांत जोगीणीसारखं रहावं. रंगभूमीवरचे ते झळाळणारे दिवे, प्रेक्षकांची ती गडबड, नृत्यासाठीं

वेषभूषा घालणं आणि अलंकार धारण करणं, तोंड रंगविणं, तें विंगमध्यें उभं राहणं आणि घंटेची वाट पाहणं—या साऱ्या गोष्टी तिला नकोशा होत असत. तिच्या मनांत येई, कशासाठीं मी हें सारं करतें ? तिला वाटे, हा पडदा खसकन् दूर करून बाहेर प्रगट व्हावं आणि नृत्य बघायसाठीं आलेल्या लोकांना ओरडून विचारावं “ माझ्या अंतःकरणांत कोणत्या दुःखाचं तांडव नृत्य चाललेलं आहे तें बघायचं आहे का तुम्हांला ? जा घरोघर जा. मला एकटीला सोडा. बस्स झाला हा कलेचा बडिवार. टाका हा पडदा कायमचा रंगभूमीवर, आणि विझवा हे दिवे. होऊं दे अंधार सगळीकडे. आनंदाची ही खोटी रोषणाई हवी कशाला ? मला एकटीला अंधारांत सोडा...”

आज ‘ एशियाटिक म्युझिकल कॉंग्रेस ’ मध्यें नृत्याच्या वेळेस पडद्याच्या आंत विंगमध्यें रंभा उभी राहिली होती तेव्हां तिच्या मनांत याच विचारांनीं गर्दी केली होती. बाहेरच्या मंडपांतल्या हजारों प्रेक्षकांना घाई झाली होती, केव्हां एकदां घंटा होईल आणि केव्हां एकदां पडदा दूर सरकेल...रंभाला वाटत होतं, ती घंटा कधींहि व्हायला नको, पडदा दूर व्हायला नको. कालचक्राची गति या क्षणावरच गोठून थांबली आणि गुप्त दुःखानं पिचून निघणारं माझं आयुष्य या क्षणींच संपलं तर फार बरं होईल......

या उद्वेगानं तिला एकदम थकवा आला. तिनं विंगला टेकल्यासारखं केलं, आणि डोळे मिटले...

तितक्यांत तिच्या हाताला कुणाचा तरी स्पर्श झाला.

तिनं डोळे उघडून पाहिलं. एक अनोळखी पोरसवदा तरुण तिच्यापुढें उभा होता, आणि तिनं हातीं घ्यावी म्हणून कागदाची एक लहानशी घडी पुढें करीत होता. तो म्हणत होता. “ ही चिठी तुम्हांला दिलेली आहे. ”

तिनं विचारलं, " कुणी ? "

"बाहेर माझ्या शेजारच्या खुर्चीवर एक गृहस्थ बसले आहेत त्यांनीं."

" त्यांचं नांव काय ? "

" मला माहीत नाहीं. त्यांची माझी पूर्वीची ओळखहि नाहीं. ते मला म्हणाले, मेहरबानी करून एवढी चिठी पोंचवितां काय, म्हणून मी ती आपल्याला आणून दिली. "

तिच्या हातांत कागदाची घडी देऊन तो पोरसवदा तरुण निघून गेला. रंभानं चिठी उघडली आणि वाचली. आणि ती वाचल्याबरोबर तिच्या सर्वांगावर विलक्षण आनंदाचे रोमांच उभे राहिले. तिला वाटलं, मी स्वप्नांत तर नाहीं ? तिनं आजूबाजूस पाहिलं. दूर हरिप्रसाद तिला दिसले. वाद्यांच्या ताफ्यांतलीं मंडळी आपाआपलीं हत्यारं घेऊन अगदीं सज्ज झालीं होतीं. ती तिच्या दृष्टीस पडली, रंगभूमीच्या मध्यभागीं नटराजाची भव्य मूर्ति होती ती तिला दिसली...ती मनाशीं म्हणाली, " नाहीं ! मी स्वप्नांत नाहीं ! "...तिनं हातांतली चिठी पुन्हां एकदां वाचून पाहिली. तिच्या अंगांवर सुखाचे शहारे पुन्हां आले. तिनं ती चिठी आपल्या बाजुबंदाखालीं पुरती सरकवली नाहीं तोंच समोरच्या विंगमधल्या माणसानं तिला इशारा केला. ती चटकन् पुढें झाली आणि नटराजाच्या मूर्तीपुढें वाकून प्रणाम करून उभी राहिली...आतां घंटा केव्हां होते, पडदा दूर केव्हां सरकतो, रंगभूमीवरचे दिवे केव्हां प्रदीप्त होतात, वाद्यांच्या ताफ्यांतून स्वरांची धून केव्हां उठते, अशी तिच्या जिवाला घाई झाली होती. ज्या नृत्याचा तिला तिटकारा आला होता तें करण्यासाठीं ती आतां अधीर झाली होती. कारण कॉंग्रेसला आलेल्या हजारों प्रेक्षकांसाठीं ती नाचणार नव्हती. तिला माहित होतं कीं मंडपांतल्या अगदीं पुढच्या रांगांतल्या

कोचांवर हिंदुस्थानांतले आणि बाहेरच्या देशांतलेहि बडे बडे गायक, गायिका, तंतकार, नृत्यकार, दर्दी टीकाकार बसलेले होते. हरिप्रसादांना तिला नेहमीप्रमाणें प्रणाम केला होता तेव्हां ते तिला म्हणाले होते, " बेटी, आज आम देशांतले मोठ मोठे कलाकार जमा झालेले आहेत. आजपर्यंत तूं पुष्कळ जल्से जिंकलेस, पण आजचा दिग्विजय सगळ्यांत मोठा ठरणार आहे." पण या मोठमोठ्या कलाकारांसाठीं ती नाचणार नव्हती. आपल्या प्रियकरासाठीं ती नृत्य करणार होती ! बाहेरच्या मंडपांत हेमचंद्र बसलेला आहे हें तिला कळलं होतं ! त्याच्यासाठीं ती नाचणार होती ! तिच्या जिवाची हरवलेली सोबत सांपडली होती. तिचं अंतःकरण आनंदानं थयथय करून नाचत होतं ! आज तिच्या पायांतल्या नूपुरांतून निघणाऱ्या छुम छुम ध्वनींत कला आणि प्रेम यांच्या संगमाचं संगीत प्रगट होणार होतं ! एखाद्या भरतीच्या लाटेप्रमाणें तें संगीत तिच्या अंगावर उसळून आलं होतं. त्याला वाट देण्यासाठीं ती अधीर झाली होती. केव्हां घंटा वाजेल, पडदा दूर सरकेल, वाद्यांच्या तारयांतून स्वरमाला निघूं लागतील, आणि इशाऱ्याची सम पखवाजावर वाजल्याबरोबर नृत्यारंभींची पावलांची नाजूक हालचाल करून छुमकारानं आपण वातावरण भरून आणि भारून टाकूं अशी घाई तिला झाली होती.

आणि नृत्याला प्रारंभ करण्यासाठीं जशी ती उतावीळ झाली होती त्याचप्रमाणें तिच्या नृत्याचा कार्यक्रम आटपत आला तेव्हां तो एकदा केव्हां संपतो अशी तिच्या जिवाला घाई झाली. कारण कार्यक्रम आटपल्यानंतर हेमचंद्र तिला भेटणार होता ! त्याच्या त्या भेटीकडे तिचं सारं चित्त लागलं होतं. शक्य असतं तर नृत्य तसंच अर्धवट टाकून तोंडाचा रंग न पुसतां वेषभूषा न बदलतांच ती रंगभूमीवरून धांवत मंडपांत गेली असती, " हेम, तूं कुठें

आहेस ? " अशा हाका तिनं मारल्या असत्या, आणि तो दृष्टीस पडल्याबरोबर त्याच्या गळ्याभोंवतीं आपले हात तिनं टाकले असते. असं करणं शक्य नव्हतं म्हणूनच केवळ उरलेलं नृत्य ती करीत राहिली होती. पखवाजावर खणखणणारे बोल तिला ऐकूं येत होते. त्या बोलांची संगत करीत पडणाऱ्या स्वतःच्या पावलांतून छुम् छुम् असे निघणारे आवाजहि तिला ऐकूं येत होते. दोन दोन तीन तीन आवर्तनांचे फेरे पूर्ण करून समेवर येऊन नूपुरांच्या छुमकाराबरोबरच तिनं आपल्या भुजलता मोठ्या डौलांत पसरून धरल्याबरोबर मंडपभर उठणारा टाळ्यांचा गजरहि तिला ऐकूं येत होता. परंतु तें सारं एखाद्या स्वप्नांतील जागृतीप्रमाणें होतं. तिच्या जिवाची खरी जाग या अनुभवांत नव्हती. तिचं खरं चित्त लागलं होतं तें हा कार्यक्रम कधीं एकदां संपतो आणि हेमचंद्राची भेट केव्हां एकदां होते याकडे !...

ज्या अनोळखी तरुणानं तिला तिच्या नृत्याचा कार्यक्रम सुरू होण्याच्या आधीं हेमचंद्राची चिठी आणून दिली होती, त्यानं कार्यक्रमांतलं हें अखेरचं नृत्य सुरू होण्यापूर्वीं आणखी एक चिठी आणून दिली होती. पहिली चिठी जशी तिनं डाव्या बाजुबंदाखालीं सरकवून ठेवली होती तशीच ही दुसरी चिठी वाचल्यानंतर तिनं ती उजव्या दंडावर बाजुबंदाखालीं ठेवून दिली होती. त्या दोन चिठ्या तिला अंगावरच्या सगळ्या अलंकारांपेक्षां अधिक किंमतीच्या वाटल्या होत्या. त्या दोन चिठ्यांचे अपूर्व अलंकार धारण करून आपण नाचत आहोंत या भावनेनं तिला विलक्षण हर्ष झाला होता. त्या दुसऱ्या चिठींत हेमचंद्रानं लिहिलं होतं, " रंभा, ही तूंच का नाचते आहेस ? का दिव्य लोकांतली कुणी अप्सरा नाचतांना मी पाहतों आहे ! मंडपांतल्या या हजारों लोकांच्या

डोळ्यांचं पारणं तूं खरोखर फेडलंस. तुझ्या नृत्यानं अक्षरशः वेडावून गेलेल्या या तुझ्या हजारों चाहत्यांच्या शाबासकीपुढें माझी गरिबाची शाबासकी ती काय मोलाची ? पण ती तुला हवीशी वाटत असेल तर तुझं सारं आटपल्यानंतर मला भेटशील काय ?..." नाचतां नाचतां रंभाच्या मनांत येत होतं, भेटशील काय ? अरे ! हें काय विचारणं ?...तुला माहित नाहीं, पण तुझ्या भेटीसाठीं माझ्या जिवाला उत्कंठेची ओढ लागलेली आहे...त्यानं त्या चिठींत भेटण्याची जागा लिहिली होती. मंडपाला लागूनच एक छोटा बगीचा होता, त्यांतल्या कारंजाच्या एका बाजूस एक पुतळा होता, त्या पुतळयापलीकडे एक लताकुंज होता...चिठींत लिहिलेलं तें वर्णन पुनः पुन्हा आठवून रंभा मनाशीं म्हणत होती, ही जागा मला माहित नाहीं. या मंडपाला लागून बगीचा आहे म्हणतोस ? मी तर तो पाहिला नाहीं. या ठिकाणीं मी मोटारींतून आलें तेव्हां माझं लक्ष आजूबाजूला होतं कुठें ? मी धड जिवंत तरी होतें कुठें ? पण तूं म्हणतोस तो बागेंतला लताकुंज मी शोधून काढीन. मला शोधावा लागणारच नाहीं. तुझ्या भेटीसाठीं माझा जीव इतका अधीर झालेला आहे कीं ती अधीरताच माझ्या पायांना आपल्या भेटीच्या त्या संकेत स्थळाची वाट सहज दाखवील...मी त्या लताकुंजांत येईन. एक वर्षापूर्वी 'मी तुझ्याकडे येईन' असं मी तुला म्हटलं, पण आलें नाहीं. आणि माझी वाट पाहून तूं निघून गेलास. तुझ्याकडे येण्याचा मी मनाशीं निश्चय केला होता तरी मी तुझ्याकडे येऊं शकलें नाहीं. तुला वाटलं असेल, हिचं प्रेम दुबळं आहे. मला विसरण्याचा निश्चय करून तूं निघून गेला असशील...पण आतां तसं कांहीं होणार नाहीं. तूं त्या लताकुंजांत थांब. माझी वाट बघ. मी येईन, आणि तूं भेटल्याबरोबर मी तुला मिठी मारीन तेव्हां माझ्या अंगाच्या

पहिल्या स्पर्शानंच तुझा गैरसमज नाहींसा होईल. माझी हनुवटी हळूंच वर करून तूं माझं चुंबन घेशील तेंव्हां... तूं असं करशील ना ?....

एकीकडे त्या अखेरच्या नृत्यांतील निरनिराळया पविञ्यांत उभं राहतांना, आणि त्या नृत्याच्या कथानकांतील भाव प्रगट करतांना रंभाच्या मनांत या विचारांची गोड गोड वलयं फिरत होतीं. तिला घाई झाली होती कीं आतां हें अखेरचं नृत्य केंव्हा एकदां संपेल, पडदा पडेल, रंगपटाकडे धूम ठोकून नंतर कुणालाहि कळूं न देतां बगीचांतल्या त्या पुतळ्यापलीकडच्या लताकुंजाकडे केंव्हां एकदां धांव घेतां येईल ?...

# प्रकरण आठवें

" बेटी, काय म्हटलंस तूं ? पुन्हां एकदां बोल पाहूं."

हरिप्रसादांच्या त्या प्रश्नांत रागाची थोडीशी लकेर होती. परंतु त्या रागापेक्षां विस्मय अधिक होता.

रंभाचे जे शब्द त्यांनीं ऐकले होते ते खरोखरच तिच्या तोंडांतून बाहेर पडले काय असं आश्चर्य त्यांना वाटत होतं. आपल्यासमोर धीटपणानं उभं राहून रंभानं खरोखरच ते शब्द उच्चारले कीं आपणाला चमत्कारिक खोटा भास झाला असं त्यांच्या मनांत येत होतं. तिच्या शब्दावर त्यांचा विश्वास बसत नव्हता, आणि ते शब्द आपल्याला ऐकूं आले ही गोष्टहि त्यांना खोटी म्हणतां येत नव्हती. " पुन्हां एकदां बोल पाहूं " या त्यांच्या शब्दांत ' बोलशील तर तोंडच फोडून टाकीन ' अशा धमकीची किंचित् छटा होतीहि, परंतु आत्यंतिक आश्चर्याचा ध्वनि त्या शब्दांत अधिक होता. कारण रंभा आपल्याला जें सांगत आहे तें ती

खरोखरच सांगत आहे हें त्यांच्या मनाला विश्वसनीय वाटत नव्हतं. तिचं तें सांगणं अत्यंत अनपेक्षित होतं. आणि ती जर खरोखरच तसं सांगत असेल तर तिच्या दोन थोबाडींत दिल्या पाहिजेत असाहि विचार हरिप्रसादांच्या मनांत डोकावत होता.

'एशियाटिक म्युझिकल कॉंग्रेस' संपली होती. परिषदेसाठीं जमलेले कलावंत आपआपल्या ठिकाणीं परतूं लागले होते. परिषदेनंतर याच शहरांत रंभाच्या नृत्याचे जाहिर प्रयोग व्हावेत अशी आग्रहाची सूचना अनेक लोकांनीं हरिप्रसादांना केली होती परंतु ती त्यांनीं मानली नव्हती. चंबलच्या राजांचं आग्रहाचं आमंत्रण घेऊन राजांकडून एक दरबारी नोकर मुद्दाम आला होता. राजांच्या आमंत्रणाला मान देण्यांत हरिप्रसादांकडून कसूर होणं शक्यच नव्हतं. ते कितीहि मोठे झाले असले, त्यांच्या शिष्येनं केवढीहि कीर्ति मिळविली असली, ते कितीहि दूर कुठेंहि गेले असले तरी, चंबलच्या राजांविषयीं त्यांच्या मनांत जी स्वामिभक्ति होती तिच्या पाशानं ते कायमचे बांधले गेले होते. राजांच्या इच्छेला मान देणं हें त्यांचें सगळ्यांत पहिलं कर्तव्य होतं. त्यांनीं बोलवल्यावर नाहीं म्हणणं शक्यच नव्हतं. इतर सारे बेत रद्द करून चंबलला जाण्याचा बेत त्यांनीं केला होता. या बेताला अनुसरून ते आपल्या माणसांना सारी व्यवस्था करायला सांगत होते. इतक्यांत रंभा त्यांच्याकडे आली होती आणि म्हणाली होती,

" पिताजी, मला तुमच्याशीं कांहीं बोलायचं आहे. "

ते म्हणाले होते, " बैस बेटी. " ती न बसतां त्यांच्यासमोर उभीच राहिली होती. ते पुढें म्हणाले होते, " उद्यां आपल्याला चंबलला जायचं आहे. जाण्याची सारी तयारी झटपट उरकली पाहिजे. राजांकडून दोन खास गाड्या आलेल्या आहेत. उद्यां सकाळीं आपण निघूं. "

रंभा म्हणाली होती, "त्याबद्दलच तुम्हांला कांहीं सांगायसाठीं मीं आलें आहे."

"होय ? बैस ना अशी. उभी कां ?"

परंतु त्यांनीं तिला बसण्याचा पुन्हां आग्रह केला तरी ती बसली नव्हती. उभीच राहिली होती. क्षणमात्र स्तब्ध. हरिप्रसादांची नजर टाळून खालीं जमिनीकडे पहात. आणि मग हलकेंच पण दृढ स्वरानं ती म्हणाली होती, "पिताजी, मला न घेतांच तुम्हांला चंबलला जावं लागेल."

हरिप्रसादांनीं विचारलं, "म्हणजे काय बेटी ?"

म्हणजे काय ?—त्यांचे ते शब्द ऐकून रंभा क्षणभर त्यांच्याकडे पहात राहिली. त्यांच्या त्या प्रश्नाला ती जें उत्तर देणार होती तें दिल्या-बरोबर मोठा स्फोट होणार हें तिला माहित होतं. त्या स्फोटाचे जे कोणते परिणाम होतील ते खुशाल होऊं द्यायचे असं तिनं मनाशीं ठरविलं होतं. तो स्फोट एकदां व्हायलाच हवा होता. निशाण मारणाऱ्या माणसानं बंदुकीच्या घोड्यावर बोट ठेवून पहावं त्याप्रमाणें ती हरिप्रसादांकडे बघत होती. "आं ? म्हणजे काय बेटी ?" असा प्रश्न हरिप्रसादांनीं पुन्हां केला तेव्हां ती म्हणाली,

"म्हणजे असं पिताजी, कीं चंबलला यायचं नाहीं मला !"

तिच्या बोलण्यांतला अंतिम अभिप्राय त्यांना कळला नाहीं. त्याची त्यांना पुसट देखील कल्पना असणं शक्य नव्हतं. म्हणून ते म्हणाले,

"क्यूं बेटी, चंबलवर तुझा का असा गुस्सा ? मोठमोठ्या शहरांच्या दिमाखाची तुला संवय झाली म्हणून छोटं चंबल तुला प्यार राहिलं नाहीं होय ? पण बेटी, कांहीं झालं तरी—"

रंभा म्हणाली, "माझं म्हणणं तुमच्या लक्षांत नाहीं आलं. तुमच्या-बरोबर कुठेंच यायचं नाहीं मला."

पावसाळ्यांत विजेच्या तारांतून प्रवाह गळत असतांना निःशंकपणे बटनावर बोट दाबणाऱ्या माणसाला एकदम धक्का बसला कीं त्याची जशी चर्या होते तशी हरिप्रसादांची चर्या झाली. 'आं!' एवढाच उद्गार त्यांच्या तोंडांतून बाहेर पडला. रंभा पुढें म्हणाली, " आतां यापुढें मी तुमच्याजवळ राहणारच नाहीं."

" म्हणजे ?"

" मी तुम्हांला सोडून जाणार आहे."

" कुठें ?"

" हेमचंद्र नेईल तिकडे."

तिच्या तोंडचं तें नांव ऐकल्याबरोबर हरिप्रसाद म्हणाले, " बेटी, काय म्हटलंस तूं ? पुन्हां एकदां बोल पाहूं."

त्यांच्या त्या उद्गारांत आश्चर्य होतं, थोडी धमकीदेखील होती.

पण त्या दोन्हीं गोष्टींची अपेक्षा रंभानं केलेली होती. हरिप्रसादांनीं फार चमत्कारिक रीतीनं तिच्याकडे रोखून पाहिलं. अशा प्रकारें रोखून पाहण्याची त्यांची ती तऱ्हा अशी होती कीं तिचं भयच वाटावं. पण रंभा लवमात्र भ्याली नाहीं. त्यांच्या रागाला न जुमानण्याची नवी शक्ति तिच्या ठिकाणीं निर्माण झाली होती. काल तिची आणि हेमचंद्राची जेव्हां एकांतांत भेट झाली तेव्हां तिनं मनांतल्या मनांत जो निश्चय केला होता तो कोणत्याहि संकटापुढें वांकणार नव्हता. हरिप्रसादांच्या नजरेला सरळ नजर देऊन पाहतांना तिला तिच्या व हेमचंद्राच्या भेटीचा तो कालचा प्रसंग एकदम आठवला.

काल सकाळीं जवळ जवळ याच वेळीं ती आपल्या खोलींतून निघून हरिप्रसादांकडे गेली होती. परिषदेसाठीं आलेल्या मोठमोठ्या नामांकित

कलावंतांपैकीं कित्येक मंडळी त्यांच्याकडे येऊन बसली होती. बैठकीच्या खोलींत हरिप्रसादांच्या भोंवतीं त्या लोकांचं कोंडाळं पडलेलं तिला दिसलं होतं. तें पाहून तिला बरं वाटलं होतं. कारण तिला जें कपट करायचं होतं त्या कपटाला हरिप्रसाद मंडळींत गप्पा मारीत बसले होते या गोष्टीचं साहाय्य होणार होतं. तिला पाहिल्याबरोबर हरिप्रसादांभोंवतीं बसलेल्या त्या लोकांनीं "आईये आईये" असं म्हणत आपाआपलीं आसनं सांवरल्यासारखीं केलीं. तिनं सर्वांना बंदगी करून हंसत म्हटलं, "माफ करा, पण मी बसण्यासाठीं आलें नाहीं", आणि दारातच थबकल्यासारखं करून ती हरिप्रसादांना म्हणाली होती,

"पिताजी, रोशन आणली तिचा भाऊ मला आपल्या घरीं न्यायला आले आहेत. जेवायला आणि दिवसभर रहायला चला असा आग्रह करताहेत. मी जाऊं रोशनबरोबर ?"

हरिप्रसाद म्हणाले होते, "रोशन ?" आणि तितक्यांत रोशन कोण तें त्यांच्या लक्षांत आलं होतं. या शहरातली ती एक प्रसिद्ध गझल गाणारी मुलगी होती. तिचा भाऊ मोठा कसबी तबलजी होता. परिषद चालूं असतांना ही आणि तिचा भाऊ रंभाभोंवतीं कशी घोटाळत होतीं व आमच्या घरीं एकदां चला म्हणून आग्रह करीत होतीं तें त्यांना माहीत होतं...ते म्हणाले. "हां, हां, रोशन आली आहे होय ? ठीक आहे. जा बेटी."

आपलं कपट नाटक अधिक सरस वठविण्यासाठीं रंभा त्यांना म्हणाली होती, "त्यांचा फार आग्रह आहे कीं माझ्याबरोबर तुम्हीसुद्धां यावं. तुमचे पाय त्यांच्या मकानाला—"

तिला पुढें बोलूं न देतां हरिप्रसाद हंसले व म्हणाले," तें सारं खरं बेटी, पण मी कसा येऊं ? ही बडी बडी मंडळी बसली आहेत ना येऊन. हा अझमत हुसेन आतां सरोद वाजविणार आहे—"

रंभा म्हणाली, " होय! आणि मी बाहेर निघालें आहे. " अझमत हुसेनकडे कटाक्ष टाकून ती हंसत म्हणाली, " तुमचं वाजविणं ऐकायला मला राहतां येऊं नये म्हणजे मी किती अभागी बघा ! " अझमत हुसेननं उगीचच आपल्या दोन्ही हातानीं कानांच्या पाळया ओढल्या आणि " माझं वाजविणं कसचं ! " अशा अर्थाची पुटपुट केली. रंभा हरिप्रसादांकडे बघून म्हणाली, " मग मी जाऊं रोशनबरोबर ? जेवायला, आणखी दिवसभर रहायला ? "

" हां, जा बेटी. "

ते शब्द पुरते ऐकायला रंभा दारांत थांबली देखील नाहीं. आपल्या खोलीकडे धाव घेऊन ती रोशनला म्हणाली, " चल. "

बाहेर पडल्यावर रोशनचा भाऊ, रोशन, आणि ती रिक्षांत बसली आणि डांबरी रुंद सडकेनं त्यांचा रिक्षा धांवूं लागला. रोशन आणि तिचा भाऊ दोघेहि मोठे गंमतीदार बोलणारे होते. पण रंभा सारखी हंसत होती ती त्यांचं बोलणं ऐकून नव्हे. हेमचंद्राकडे जाण्यासाठीं आपली किती सहजपणानं सुटका झाली तें मनांत येऊन तिला हर्ष होत होता. आतां फक्त रोशनकडून सुटका करून घेण्यासाठीं तिला कांहीं तरी युक्ति करायला हवी होती. कोणती युक्ति करावी याबद्दल ती मनांतल्या मनांत विचार करीत होती. युक्ति

सुचेना तेव्हां तिनं मनाशीं ठरविलं युक्ति करण्याच्या भानगडींत पडूंच नये, रोशनला सरळच सांगावं.

रस्त्यानं जातां जाता रोशन आपल्या भावाला म्हणाली, " भैया, मिठाईचीं दुकानं आलीं कीं उभं रहायचं बरं काय ? यांना जेवणाच्या वेळेस चांगली मिठाई खाऊं घातली पाहिजे."

रोशनचा भाऊ म्हणाला, " माझ्या ध्यानांत आहे ग. मी नजरच लावून बसलों आहे."

रोशननं रंभाला विचारलं, " तुम्हांला कोणती मिठाई सगळयांत आवडते ? रसगुल्ला ? कीं गुलाबजाम ? कीं बदामाची बर्फी ? कीं—"

रंभा तिला म्हणाली, " रोशनबाई, मी तुमच्याकडे जेवायला आलें नाहीं तर नाहीं का चालणार ?"

रोशन एकदम भुंवया चढवून म्हणाली, " क्यूं ?" आणि आपल्या भावाकडे बघून तिनं म्हटलं, " बघ ह्याची रीत. आमच्याकडे जेवायला म्हणून घरून निघाल्या, आणि आतां म्हणतात—"

रंभा तिचे दोन्ही हात धरून म्हणाली, " रोशनबाई, माझं वागणं तुम्हाला चमत्कारिक वाटण्यासारखंच आहे. पण तुम्ही मला क्षमा केली पाहिजे. मी तुमची हजारदां माफी मागतें. एका गृहस्थांना मी भेटायचं कबूल केलं आहे त्याची मला आठवण झाली. मला सोडाल तर फार उपकार होतील तुमचे माझ्यावर—"

रोशन म्हणाली, " उपकारांची भाषा राहूं द्या हो. पण आमचा आनंद तुम्ही बिघडवून टाकलत. तुम्हांला खरंच का जायला पाहिजे ?"

रंभा म्हणाली, "अगदीं तुझ्या गळ्याशपथ. गेलंच पाहिजे मला. त्यांचं मकाण मला कसं सांपडेल एवढी मात्र मला चिंता आहे."

रोशनचा भाऊ तिला म्हणाला, "कुठें आहे त्यांचं मकाण?" आदल्या रात्रीं लताकुंजांतल्या भेटीच्या वेळेस हेमचंद्रानं सांगितलेला पत्ता ती मनाशीं घोकीतच राहिली होती. रोशनच्या भावाला ती म्हणाली, "अनवर गल्ली. बाजार चौकांत कोतवालीपाशीं कुठें तरी—"

रोशनचा भाऊ म्हणाला, "आः! अनवर गल्ली! आतां आलं लक्षांत." तो अनवर गल्लीची वाट वर्णन करून सांगूं लागला.

पण रोशन त्याला थांबवून म्हणाली, "अरे भय्या, आपण असं करूं. यांना जायचं आहे तिथं आपण यांना सोडूं आणि मग आपल्या मकाणावर जाऊं. कारण या शहराची यांना बिलकुल माहिती नाहीं. गल्ली सांपडली तरी मकाण सांपडलं नाहीं म्हणजे बसतील फेऱ्या घालीत—"

त्या दोघांनीं आपल्या बरोबर असावं अशी रंभाची मुळींच इच्छा नव्हती. ती घाईनं रोशनला म्हणाली, "तुम्ही कशाला मुद्दाम आडवाट करून माझ्याबरोबर येतां? माझ्या लक्षांत आली आहे वाट. मी एकटी जाईन."

रोशनचा भाऊ म्हणाला "नको, नको, आम्ही तुम्हांला एकट्या नाहीं सोडणार. आम्ही येतों तुमच्याबरोबर आणखी जिथें तुम्हांला जायचंय तिथें सोडल्यावर मग—"

रंभा म्हणाली, "अहो खरंच नको तुम्ही यायला. असं करा. तुम्ही मला कोतवालीपाशीं सोडा म्हणजे झालं."

" अच्छा, अच्छा " असं म्हणून रोशनच्या भावानं रिक्षावाल्याला ओरडून सांगितलं, " अरे भाई, बाजारचौकाकडून घे बरं काय."

" हां, हां " असं म्हणून रिक्षावाल्यानं डाव्या हाताला रिक्षा वळविला. थोड्याच वेळानं बाजारचौक आला. कोतवाली आली. " बास् बास् उभा कर." रोशनचा भाऊ ओरडला. रिक्षा उभा राहिला. रंभा चटकन् खालीं उतरली. " ती बघा डाव्या हाताला दिसते आहे ना तीच अनवर गल्ली." असं रोशनच्या भावानं पुन्हां एकदां सांगितलं. रिक्षा निघून गेला. रंभा स्वतःशीं पुटपुटली, " सुटलें ! इथपर्यंत तरी सगळं ठीक झालं." ती गल्लींत वळून दोन्ही बाजूंच्या घरांकडे दृष्टि टाकीत हलके हलके पावलं टाकूं लागली. ' डान्सिंग स्कूल ' अशी पाटी तिला शोधायची होती. आजूबाजूचीं घरं अरुंद पण तीन तीन चार चार मजल्यांचीं होतीं. पाटी कदाचित् चौथ्या मजल्यावरहि असेल अशा शंकेनं अगदीं उंच मान करून रंभाला पाहावं लागत होतं. आणि तशी मान केल्यावर आजूबाजूच्या घरांकडे किंवा पायाखालच्या रस्त्याकडे लक्ष देणं तिला कठिण जात होतं. जवळ जवळ अर्धी गल्ली तिनं ओलांडली तरी तिला पाटी दिसली नाहीं. मनांतल्या मनांत ती थोडीशी घाबरली. आणखी चार पावलं तिनं पुढें टाकलीं आणि डाव्या बाजूच्या इमारतीचा एकेक मजला ती निरखून पाहूं लागली. तितक्यांत तिच्या पाठीमागं कुणी तरी टाळ्या वाजविल्या आणि ' शुक शुक ' असा शब्दहि तिला ऐकूं आला. तिनं चमकून वळून पाहिलं तों उजव्या हाताच्या घराच्या पायऱ्यांच्या उंचवट्यावर स्वतः हेमचंद्र उभा होता !...

ती हंसली आणि म्हणाली, " अग बाई, या बाजूला आहे होय ! आणि मी आपली या बाजूला पहातेय. "

हेमचंद्र झरकन पायऱ्या उतरून तिच्याजवळ आला आणि हंसून म्हणाला, " आपण गलत कराल हें मला माहितच होतं, म्हणून सकाळपासून पायऱ्यांवर येऊन उभा राहिलों आहे. किती वाट पाहिली तुझी, तुला कांहीं कल्पना आहे ? "

ती हंसली आणि म्हणाली, " वाट पहावी लागली म्हणून रागवणार आहेस कीं काय माझ्यावर ? "

त्यानं मान हालविली आणि तो हंसला. रंभानं दृष्टि वर केली आणि पाटी वाचली. ' डान्सिंग स्कूल ' ! आहे बुवा अशा अर्थी तिनं त्याच्याकडे पाहून भुंवया उडविल्या आणि उजव्या बाजूच्या त्या घराकडे ती निघाली.

पण त्यानं तिचा हात खेंचून म्हटलं, " तिकडे कुठें निघालीस ? "

ती म्हणाली, " म्हणजे काय ? हें तुझं मकाण ना ? "

तो म्हणाला, " हां, हें माझं मकाण. पण अशा दरिद्री जागेंत का मीं तुला भेटूं ? तुझ्या माझ्या आजच्या भेटीसाठीं इथल्या ' कॉरोनेशन ' हॉटेलमधली एक सुंदर खोली मी रिझर्व्ह केली आहे. तिकडे जायचंय आपल्याला. "

त्याचा हात किंचित् मागं ओढल्यासारखं करून ती म्हणाली, " चल, कांहीं तरीच. "

तो म्हणाला, " खोटं वाटतं कीं काय तुला ? " आणि तो तिचा हात धरून चालूंच लागला.

कोतवालीपाशीं आल्यावर त्यानं एक रिक्षा ठरविला. त्यांत बसून तीं दोघं निघालीं.

बाजारचौकात नेहमीप्रमाणेंच खूप गर्दी होती. आधींच जराशा अरुंद असलेल्या त्या हमरस्त्यावर कापड-विक्यांनीं आपापले गाडे उभे केले होते. आणि त्या अडचणींतूनच मोटारी, टांगे, झटके, रिक्षा वेगानं पळत होते. वर्तमानपत्रं विकणारीं पोरं 'आज' 'संसार' अशा आरोळ्या ठोकीत होतीं. एकीकडे ही गर्दी पाहतां पाहतां रंभा वरचेवर हेमचंद्राकडे पाहून घेत होती. जणुं आजच प्रथम तिला तो भेटत होता. जणुं आजच प्रथम त्याचं सौंदर्य तिच्या नजरेस पडत होतं. आजच प्रथम त्याच्या बोलण्याची गोड तऱ्हा ती ऐकत होती. त्या साऱ्या गोष्टी तिला अगदीं नव्या नव्या नवलाच्या वाटत होत्या. आणि त्यांचा आनंद पोटभर घेतांना ती एक प्रकारच्या बेहोषींत होती.

'कोरोनेशन' हॉटेलच्या आगणांतल्या बगीच्यांतून त्यांचा रिक्षा हॉटेलच्या पोर्चपर्यंत येऊन पोंचला तरी तिची ही बेहोषी संपली नव्हती. हॉटेलच्या इमारतींत शिरून हेमचंद्राच्या मागोमाग पावलं टाकीत तिनं मधला प्रशस्त दिवाणखाना ओलांडला, लाकडी जिन्याच्या अगदीं गुळगुळीत पायऱ्या ती चढून गेली, एका प्रशस्त व्हराड्यांतून चालली आणि एका खोलीपुढें उभी राहिली, हेमचंद्रानं चावी फिरवून खोलीचं दार ढकललं तेव्हां त्याच्याबरोबर तिनं आत पाऊल टाकलं, तरीदेखील तिची ही बेहोषी संपली नव्हती. खोलींत शिरल्यावर तिनं आजूबाजूस नजर टाकली. एका बाजूस दोन खिडक्या होत्या, त्यांवर गुलाबी रंगाचे पडदे सरकवून चुणीदार बसवलेले तिला दिसले. उलट बाजूच्या भिंतीवर ताजमहालाची भव्य तसबीर होती. एका कोंपऱ्यांत टेबल होतं, त्यावर लिहिण्याचं सामान मांडलेलं होतं. शेजारच्या दुसऱ्या एका उंच

घडवंचीवर एका सुंदर कांचपात्रांत फुलांचे मोठमोठे गुच्छ होते. मधोमध मांडलेल्या टेबलावर वाटोळया पसरट बिलोरी कांचेच्या भांड्यांतही फुलं होतीं. एकीकडे उंची वस्त्रांनीं झांकलेला पलंग होता...तितक्यांत डोक्या-वरचा पंखा सुरू झाला. मग तिच्या लक्षांत आलं कीं हेमचंद्रानं बटण दाबलं त्याचा आवाज तिनं आधीं ऐकला होता. आपल्या भुरभुरत्या केंसावर हात फिरवीत तिनं त्याच्याकडे पाहिलं, तेव्हां तो म्हणाला, " पंखा हवा ना तुला ?" तिनं त्याच्या प्रश्नाचं उत्तर दिलं नाहीं. कारण मनांतले विचार लपविण्यासाठीं कांहीं तरी असंबद्ध बोलल्याप्रमाणें तो बोलतो आहे असं तिला वाटलं. तितक्यांत त्यानं वळून दार लावून घेतलं आणि लगेच तिच्याकडे पाहून हातांची मिठी तिच्याभोंवतीं घालून तिला जवळ ओढलं...

त्या क्षणीं तिची बेहोषी संपली !...

म्हणजे एक बेहोषी नाहीशी होऊन दुसरी सुरू झाली...

या दुसऱ्या बेहोषींतून ती थोडी जागी झाली तेव्हां तिला वाटलं, अथांग पाण्याच्या खोल डोहांतून आपण डोकं बाहेर काढीत आहोंत. बंद झालेला आपला श्वास पुन्हां सुरू होत आहे. सुखाच्या लाटांनीं भिजलेल्या आपल्या अंगावर अजूनहि शहारे उठत आहेत... तिच्या डोळयांवर अजूनहि सुखाची झांपड रेंगाळत होती. या खोल डोहांत ती बुडालेली असतांना कांहीं एक नवीनच अनुभवामुळें तिच्या सबंध शरीराला आलेली विकलता अजूनहि नीटशी संपली नव्हती...खोलीबाहेर दूर कुठें तरी पऱ्याळाचे ठोके पडले ते तिला

अस्पष्ट ऐकूं आले...भिंतीवरची ताजमहालची तसबीर तिनं प्रथम पाहिली तेव्हां तिच्या नजरेच्या सरळ रेषेंत ती होती, पण आतां ती उंच असल्या-प्रमाणें तिच्याकडे वर नजर करून तिला पहावं लागत होतं...गोंधळून जाऊन तिनं आपल्या मनाला विचारलं, ही तसबीर अशी वर कशी सरकली ?...मग तिच्या लक्षांत आलं कीं तसबीर जागच्या जागींच होती, पण पहिल्यांदा तिच्याकडे पहातांना ती उभी होती, आणि आतां ती तशी उभी नव्हती. पलंगावर पडली होती. त्या गोष्टीचं तिला आश्चर्य वाटलं. पण मग जें घडलं होतं त्याची तिला आठवण झाली. ती आठवण सुखाची होती. पण ती होतांच तिला लाजल्यासारखं झालं. ती उठून बसूं लागली. पण तिला उठतां आलं नाहीं. हेमचंद्राच्या मिठींत ती सांपडली होती. तिनं भुवयांना आठी घातली आणि डाव्या हातानं त्याला दूर ढकलण्याचा प्रयत्न केला. ती हळूंच त्याला म्हणाली, "मला तुझा फार राग आलेला आहे."

पण तिचं बोलणं मनापासूनच नव्हतं हें ओळखून हेमचंद्र हंसला आणि त्यानं तिचा डावा हातहि बंदिस्त करून टाकला. तिला जवळ ओढून तो तिचं चुंबन घेऊं लागला तेव्हां तिनं एकदम जोरानं त्याला ढकलून स्वतःला सोडवून घेतलं. आढ्याकडे पहात ती त्याच्यापासून थोडीशी दूर स्वस्थ पडून राहिली. कांहीं वेळानं तिनं मान वळवून त्याच्याकडे बघितलं. तो तिच्याकडे निरखून होता. ती हलकेच म्हणाली, "झालं तें बरं झालं."...तिच्या या उद्गाराचा सगळा अर्थ हेमचंद्राच्या लक्षांत आला नाहीं. त्यानं फक्त हास्य केलं. आणि उजव्या हातानं तिचे केस कुरवाळले. 'जें झालं तें बरंच झालं' असे शब्द तिनं पुन्हा उच्चारले. पण मोठ्यांदा

नव्हे, स्वतःशींच ! तिच्या मनांत येत होतं, आतां माझा निश्चय डळमळणार नाहीं. मी याची झालें. आतां याच्याकडे येतांना दुसऱ्या कोणत्याहि कर्तव्याच्या पाशांत अडकून माझा पाय रेंगाळणार नाहीं....आतां प्रेमाच्या देवघेवीची संपूर्णता झाली होती. प्रीतीच्या वाटेंत ज्या ठिकाणीं पोंचल्यावर स्त्री मागं फिरूं शकतच नाहीं त्या ठिकाणीं ती आतां पोंचली होती. केवळ प्रेमाचे शब्द आणि चुंबनालिंगन एवढ्याच गोष्टी तिनं आजपर्यंत हेमचंद्राला दिल्या होत्या. पण आज तिनं आपलं सर्वस्व त्याला दिलं होतं. आतां संपूर्ण अर्थानं ती त्याची झाली होती. त्याच्यावांचून तिला स्वतःच असं स्वतंत्र जीवन उरलं नव्हतं. तिनं आपलं आयुष्य त्याच्या आयुष्याशीं आज कायमचं गुंफून टाकलं होतं. आतां प्रेमाखेरीज इतर कोणतेहि विचार कितीहि प्रबळ झाले तरी तिला मागं खेचूं शकत नव्हते. सर्वस्वाचं दान केल्यामुळें तिला एक नवीनच सामर्थ्य आलं होतं...आतां हरिप्रसादांसमोर उभं राहून "मी जातें" असं सरळ सांगतांना तिला त्यांचं भय वाटणार नव्हतं, आपण कृतघ्नपणानं वागत आहोंत अशी शंका तिला येणार नव्हती. त्या शंकेंतून उद्भवणारी दुबलता तिचा निश्चय पोखरणार नव्हती...ती पुन्हां मोठ्यांदा म्हणाली, "जें झालं तें बरं झालं !"

मग हेमचंद्राच्या कुशींत शिरून त्याचं बोलणं ती ऐकूं लागली. तो म्हणत होता, "तूं माझ्याकडे आलीस कीं आपण दोघांनीं मिळून काय काय करायचं त्याबद्दलचे बेत काल रात्रभर विचार करून मीं ठरविले आहेत."

ती म्हणाली "मला तुझ्या त्या बेतांशीं कांहीं करायचं नाहीं. मला एकच गोष्ट सांग. तूं सदा माझा राहशील ना ?"

त्यानं उत्तर देण्याऐवजीं तिचा गाल हळूंच चिमटींत धरला होता आणि हास्य केलं होतं.

तितक्यांत दारावर कुणी तरी टक् टक् केलं होतं. हेमचंद्र म्हणाला होता, "आपला खाना आला वाटतं. तुला चांगली भूक लागली आहे कीं नाहीं ?" ती म्हणाली होती, "खरं म्हणशील तर तहान भूक सारं विसरलेय मीं."

हेमचंद्र मोठ्यांदा हंसून तिच्यापासून दूर झाला होता व त्यानं दार उघडलं होतं...

या साऱ्या गोष्टींची आठवण तिला आतां झाली. आणि हरिप्रसादांच्या नजरेला नजर देऊन ती उभी राहिली. "बेटी, काय म्हटलंस तूं ? पुन्हां एकदां बोल पाहूं." या त्यांच्या उद्गारांतलं आश्चर्य आणि धमकी तिला कळली. परंतु त्या दोहोंचंहि तिला कांहीं वाटलं नाहीं. पहिल्यापेक्षांहि अधिक दृढ स्वरानं ती म्हणाली,

"हेमचंद्र नेईल तिकडे मी जाणार आहे."

लहानशी जखम चटकन कळते. पण खोल जखम झाली म्हणजे पुष्कळदां असं होतं कीं जखमेच्या जागेतून रक्ताची धार निघालेली माणसाला दिसते, ती तो बोटांनीं निपटतोहि, पण जखमेची वेदना उठायला वेळ लागतो. रंभाचं तें उत्तर ऐकून हरिप्रसादांची अशीच अवस्था झाली...कांहीं वेळ ते नुमते तिच्याकडे बघत राहिले. तिच्या त्या उत्तरानं आपलं अंतःकरण घायाळ झालं आहे हें त्यांना कळायला वेळ लागला...तें कळलं तेव्हां मात्र ते एकदम संतापून ओरडले, "बेवकूफ !

तोंड फोडून हातांत देईन! काय समजलीस ?" आणि ते शब्द उच्चारल्यावर ते थरथर कापूं लागले, व हातवारे करूं लागले. "हेमचंद्र नेईल तिकडे जाणार काय तूं ? तो तुला कुठें नेणार आहे माहीत आहे मला! कामवासनेच्या कर्दमांत लोळायसाठीं तुझी संगत हवी आहे त्याला!" मग एकदम कशाची तरी आठवण झाल्याप्रमाणें त्यांनीं एकदम विचारलं, "तुला कुठें भेटला तो सोदा ? सागरपूरच्या मुक्कामांत त्याला मीं हांकून दिला होता. या शहरांत एकदम कुठून प्रगट झाला तो पाजी, फुसलाव्या, रंगेल, हलकट ? त्याला म्हणावं माझ्यासमोर असा ये पाहूं म्हणजे—"

रंभा एकदम म्हणाली, "पिताजी, हेमचंद्राला शिव्या द्यायचं आधीं बंद करा पाहूं. तुमचं असलं बोलणं मी बिलकुल ऐकून घेणार नाहीं हें नीट लक्षांत ठेवा, अन् मग काय बोलायचं असेल तें बोला. हेमचंद्र तुमच्यापुढें आला तर तुम्ही काय करणार आहांत ? कोणतं पारिपत्य करणार आहांत ? आणि कोणत्या अपराधाबद्दल ? तुमच्यासमोर उभं राह्यला तो भितो असं नका समजूं! तुमची भीति बाळगावी असं त्यानंहि कांहीं केलेलं नाहीं, अन् मीहि कांहीं करणार नाहीं. तुम्ही कितीहि संतापलांत तरी त्याचा कांहीं एक उपयोग होणार नाहीं. माझा निश्चय झालेला आहे. यापुढें मी तुमच्याजवळ राहणार नाहीं. मी हेमचंद्राकडे जायचं ठरविलेलं आहे..."

"तूं ठरविलं आहेस ?" असं विचारून हरिप्रसादांनीं चमत्कारिक हास्य केलं. "तूं कोण ? आं ? तूं कोण ग ? नीट विचार करून सांग, तूं कोण ?"

तें त्यांचं विचारणं मोठं चमत्कारिक होतं. भीतीनं नव्हे पण त्या अनपेक्षित प्रश्नाच्या चमत्कारिकपणामुळें रंभाला चटकन् उलट उत्तर सुचलं

नाहीं. " मी कोण म्हणजे ? मी !-मी !-" असे शब्द चांचरत उद्गारून तिनं आपला खालचा दांतांनीं ओठ चावला.

हरिप्रसाद म्हणाले, " मी मी असं जें म्हणतेस त्याचाच अर्थ तुला विचारतों, तूं कोण ? जी कुणी तूं आहेस ती कशी झालीस ? कुणाच्या कृपेनं झालीस ? कुणी माया केली आणि विद्या दिली म्हणून झालीस ? थोडासा विचार कर कीं मी तुझा प्रतिपाळ केला नसता आणि विद्या दिली नसती तर गणपत परदेशीच्या घरांत भांडीं घाशीत अन् गोठा झाडीत राहिली असतीस ना जन्मभर ? मी मी असं जेव्हां तूं म्हणतेस तेव्हां तुला निर्माण करणारा मी आहे हें तूं विसरतेस ! मीं तुला आश्रय दिला नसता तर जिला तूं मी मी म्हणतेस ती जगाला दिसली असती काय ? माझं देणं कांहींच लागत नाहींस तूं ? खुशाल मला सोडून एका रंगेल लबाडाबरोबर जाऊन आपल्या आयुष्याची माती करून घ्यायचं ठरवितेस ? "

ते आतां पुढं काय काय बोलणार तें सारं रंभाला ओळखतां येत होतं. ती म्हणाली, " आयुष्याची माती ? पिताजी, आयुष्याचं सोनं म्हणा. प्रेमानं विद्येची आणि कलेची खरायी होते असं तुम्ही मला नेहमीं सांगत आलां आहांत. पण माझा प्रत्यक्ष अनुभव फार निराळा आहे. ज्या कलावंताला खरं प्रेम कधीं सांपडलंच नाहीं त्याची गोष्ट सोडून द्या, पण ज्याला प्रेम सांपडलं त्याला तें प्रेम मिळालं नाहीं तर केवळ कलेच्या उपासनेनं भरलेलं आयुष्य त्याला शून्य आणखी रुक्ष वाटूं लागतं. असं रुक्ष आयुष्य मी वर्षभर काढलं. हेमचंद्र मला पुन्हां कधींच भेटला नसता तर कदाचित् यापुढेंहि काढलं असतं. पण आतां हेमचंद्र मला भेटला

आहे. मी त्याच्याकडे जाईन. माझं प्रेम मला मिळेल. मी माझ्या कलेची उपासनाहि चालू ठेवीन—"

हरिप्रसाद एकदम म्हणाले "पगली! हा भ्रम आहे तुझा. मला सोडून तूं गेलीस कीं कला आणि विद्या तुला सोडून जातील." रंभा चटकन म्हणाली, "तुमचा भ्रम आहे." ते म्हणाले, "नाहीं. माझा भ्रम नाहीं. मी तुला कधीं जाऊं देणार नाहीं. धडधडींत भलत्या खोल दरींत उडी घ्यायासाठीं तूं कड्यावर उभी राहिली आहेस हें मला दिसतं. तुला मागं खेंचणें हें माझं कर्तव्य आहे."

ती म्हणाली, "अन् तुम्ही मला मागं खेचाल तर तुम्हाला दूर ढकलणं माझं कर्तव्य आहे. पिताजी, माझी समजूत घालण्याच्या फंदांत तुम्ही पडूं नका. तुमच्याविषयींचा आदर कमी झाला म्हणून मी जातें असं समजूं नका. तुमच्या उपकारांची जाणीव मला आहे. पण मीं त्या उपकारांची फेड आजपर्यंत पुष्कळ केली. तुमच्या ऋणतून मी मुक्त झालें असं मला वाटतं. माझे गुरु म्हणून जगानं तुमचा पुष्कळ सन्मान केला. असा सन्मान मिळविण्याची तुमची महत्त्वाकांक्षा होती ती मीं पूर्ण केली. आतां कलेची उपासना मीं आणखी करावी कीं नाहीं हा प्रश्न तुमचा नाहीं. माझा आहे! माझा मला सोडवूं द्या!

हरिप्रसाद म्हणाले, "म्हणजे कामवासनेच्या कर्दमांत लोळायला तुला मी खुशाल पाठवावी असं तुझं म्हणणं?"

रंभा म्हणाली, "हां हां पिताजी, असे गलिच्छ शब्द बोलाल तर खबरदार! असं तुम्हांला बोलायचं असेल तर तुम्हांला काहीं एक न

सांगतां निघून जाईन. माझ्या प्रेमाचा अपमान तुम्हीसुद्धां केलेला मला सहन व्हायचा नाहीं. " असं म्हणून ती जाऊं लागली.

पण हरिप्रसादांनीं तिचा हात धरून खसकन् परत ओढलं आणि ते ओरडले, " कुठें निघालीस ? "

ती म्हणाली, " कुठें तें एकदां मी तुम्हाला सांगितलंय. " ते आणखी ओरडून म्हणाले, " मला कायमचं सोडून जाणार तूं ?"

मान ताठ ठेवून ती म्हणाली, " होय ! "

" हेमचंद्राकडे जाणार ? "

मान आणखीच ताठ करून ती म्हणाली, "माझ्या प्रियकराकडे जाणार !"

तिच्या एकेका उत्तराबरोबर हरिप्रसादांच्या मनांतला संताप वाढत गेला. तिच्या निर्भयपणाची त्यांना चीड आली. कारण त्या निर्भयपणामुळें ते स्वतः सर्वस्वी निशस्त्र झाले होते. तिचं तें दृढ स्वरांतलं एकेक उत्तर ऐकून त्यांच्या चिडखोर मनाला वाटलं किती निर्लज्ज झाली आहे ही ! त्यांचे हातपाय थरथर कापूं लागले. ते मोठ्यादा ओरडले, " बेशरम ! "

रंभाहि दटावून मोठ्यांदा म्हणाली, " हां पिताजी ! "

तिच्या त्या दटावण्यानं त्यांच्या संतापाचा कडेलोट झाला. त्यांनीं खाडकन् तिच्या थोबाडींत मारली. " बेशरम ! " ते पुटपुटले. त्यांचा थरथरणारा हात पुन्हां वर झाला. त्यांनीं पुन्हां एकदां तिच्या थोबाडींत मारली आणि पुन्हां एकदां " बेशरम ! " या अक्षरांची त्यांच्या ओठांनीं पुटपुट केली.

हरिप्रसादांना वाटलं या शिक्षेमुळें रंभा शुद्धीवर येईल. तिचे डोळे उघडतील. आपल्याला सोडून हेमचंद्राकडे जाण्याचा मूर्खपणा ती करणार नाहीं.

पण त्या दिवशीं रात्रींच रंभा त्यांना सोडून गेली !...

स्वतःची हट्टी भूमिका हरिप्रसाद विसरूं शकत नव्हते म्हणून, नाहीं तर रंभा आपल्याला सोडून निघून गेली याचं त्यांना आश्चर्य वाटलं नसतं. दुःख झालं असतं, पण आश्चर्य वाटलं नसतं. त्यांना कळलं असतं कीं तारुण्यांत प्रेमाची भावना उद्‌भवली कीं ती एखाद्या भरतीच्या लाटे-सारखी असते. ती कुणाला थोपवितां येत नाहीं...

पण हा विवेक हरिप्रसादांच्या ठिकाणीं नसल्यामुळें रंभा त्यांना सोडून निघून गेली तेव्हां त्यांना विलक्षण विस्मय वाटला. दुःख तर फारच झालं. कारण त्यांच्या मनाची खात्री होती कीं हेमचंद्राकडे जाण्यापासून रंभाचं कल्याण कधींहि होणार नाहीं. ते म्हणाले, " संपलं पोरीचं आयुष्य आतां. कसली विद्या आणि कसली कला ? संगीताच्या दुनियेला रंभा हें नांव आतां पुन्हां ऐकूं येणार नाहीं. "...

ते चंबलला परत गेले ते अशा चकित आणि दुःखित अंतःकरणानंच !

राजांनीं त्यांना विचारलं, " हें काय ? तुमच्याबरोबर रंभा नाहीं आली ? ती कुठें आहे ? "

ते चटकन् म्हणाले, " सरकार, रंभा मेली ! तिची विद्या संपली ! म्हणजे ती मेलीच नाहीं काय ? "

# प्रकरण नववें

चंबलच्या राजांजवळ आपण जे उद्गार काढले ते कांहीं खोटे नव्हते असं हरिप्रसादांना वाटूं लागलं. कारण नंतरच्या दोन वर्षांत संगीताच्या दुनियेंत रंभाचं नांव खरोखरच ऐकूं येईनासं झालं. दूरदूरची कलावंत मंडळी चंबलला येत असत. पण रंभाचं नृत्य आपण अमुक ठिकाणीं पाहिलं असं कुणाच्याहि बोलण्यांत येत नसे. ज्याला विचारावं तो म्हणे, " फार दिवसांत तिचं नांव कुणी काढलेलं आम्ही ऐकलंच नाहीं. " लोक उलट हरिप्रसादांनाच विचारीत, " तिची कांहीं बातमी आपल्याला नाहीं ? " ते रागानं आणि चिडून उत्तर देत, " मला बातमी असायचं काय कारण ? ज्या दिवशीं ती मला सोडून गेली त्या दिवशींच ती मेली असं मीं मानलं. " हें उत्तर देतांना त्यांच्या मनाला ज्या यातना होत असत त्या त्यांच्या त्यांना माहीत...

हरिप्रसाद वरकांतीं असा देखावा करीत कीं रंभा गेल्याचं आपण कांहींच दुःख करीत नाहीं. लोकांशीं बोलतांना ते म्हणत, " कुणी कुणाला जुलमानं बांधून ठेवूं शकतो काय ? ऋणानुबंधाच्या गोष्टी आहेत या. ईश्वराच्या सूत्राप्रमाणें ऋणानुबंध जडतात, टिकायचे असतील तोंवर टिकतात, संपतात ! ते संपले म्हणून शोक करण्यांत काय अर्थ आहे !" परंतु हें त्याचं तत्त्वज्ञान केवळ बाह्यात्कारी बोलण्यापुरतं होतं. त्यांच्यासारखी अभिमानी माणसं आपल्या जखमा जगाला दाखवीत नाहींत. पण अंतर्यामीं रंभा निघून गेल्याबद्दल त्यांना अतिशय दुःख झालं होतं.

ती त्यांच्याकडे आल्यापासून थोडी थोडकी नव्हे आठ वर्षं अशीं गेलीं होतीं कीं रात्रंदिवस तिचा सहवास त्यांना घडला होता. तिला विद्या देण्यांत त्यांनीं रात्रीचे दिवस केले होते. तिच्या गुणांचं कौतुक त्यांनीं केलं होतं. तिचं कौतुक जगानं केलेलं त्यांनीं पाहिलं होतं. स्वतःची अनेक वर्षांची महत्वाकांक्षा पूर्ण झाल्याचा आनंद त्यांनीं उपभोगला होता. आणि एके दिवशीं अकस्मात् हें सारं संपलं होतं...त्यांची इच्छा कस्पटासमान लेखून रंभा त्यांना सोडून गेली होती. त्यांची विचारसरणी चुकीची असेल, पण त्यांना वाटलं होतं, अशा प्रकारें जाण्यानं तिनं अक्षम्य कृतघ्नपणा केला होता...त्यांचा अहंकार कल्पनेपलीकडे दुखविला गेला होता. रंभावर आपली एकट्याचीच सत्ता आहे अशा जाणिवेच्या खुषींत ते आठ वर्षं राहिले होते. मी म्हणेन तें रंभा करील, मीं तिला मोठी केली आहे, हा त्यांचा मुख्य विचार होता. आणि त्या विचारानं त्यांचा अहंकार पुष्ट होत गेला होता. पण अखेर एकाएकीं तो अहंकार संपूर्णतः चिरडला गेला होता. त्यांची तिच्यावर काडीमात्र सत्ता नव्हती असं सिद्ध

झालं होतं. जी भरतीची लाट थोपविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला होता ती लाट त्यांना पालथं पाडून त्यांच्या डोक्यावरून निघून गेली होती. त्यांचा सर्वस्वीं पराभव झाला होता. तो मान्य करण्याचं दुःख भयंकर होतं.

हें दुःख ते कुणाजवळहि बोलून दाखवीत नसत. पण त्याचे चटके त्यांच्या जिवाला अष्टौप्रहर बसत होते...रंभा निघून गेल्यामुळें तिच्या नृत्याच्या जलशांसाठीं उभारलेल्या साऱ्या पसाऱ्याची निरवानिरव करणं तर त्यांना भागच होतं. पण स्वतःच्या वादनकलेचाहि त्यांना तिटकारा आल्यासारखं झालं...दोन वर्षांत त्यांनीं कुठलंहि आमंत्रण तर स्वीकारलं नाहींच, पण स्वतःच्या आनंदासाठींदेखील सतार वाजवायला ते कधीं बसले नाहींत. राजांनीं त्यांना वारंवार म्हणावं, "प्रसादजी, सतार ऐकायची फार इच्छा झाली आहे. एकदां बसूं या ?" त्यांनीं म्हणावं, "सरकार, माझी तब्येत जरा सुधारूं द्या. मग पोटभर ऐकवीन आपल्याला." पण त्यांची तब्येत दिवसेंदिवस खालावूंच लागली. मूळचे ते एवढे धिप्पाड आणि ताकदबाज, पण त्यांच्या अंतःकरणांतल्या गुप्त दुःखाचा रोग इतका जालीम कीं त्यांच्या मनाच्या उल्हासाबरोबर त्यांच्या शरीराची शक्तिहि झपाट्यानं कमी होत गेली. देशी वैद्य आणि विलायती डॉक्टर यांचे उपाय झाले. पण हरिप्रसादांची तब्येत सुधारेना. गेल्या दोन वर्षांत ते चंबल सोडून कुठें गेले नव्हते. हळूं हळूं ते घराबाहेरहि पडेनातसे झाले. आणि आतांशा तर घरांत देखील हिंडण्याफिरण्याची ताकद त्यांना उरली नव्हती.

चंबलच्या राजांची हरिप्रसादांवर फार भक्ति. कुणी एखाद्या नामांकित वैद्याचं अगर डॉक्टराचं नांव सांगितलं कीं ते म्हणायचे, "यांच्या

औषधानं प्रसादजींना गुण येतो का बघूं या." लगेच तारेनं बोलावणीं जायचीं. वैद्य किंवा डॉक्टर जो कुणी असेल तो यायचा. हरिप्रसाद जेव्हां घरांतल्या घरांत देखील हिंडत फिरतनासे झाले, तेव्हां राजांना मोठी चिंता वाटूं लागली. या सुमारास मुंबईच्या एका डॉक्टरांची लोकांनीं फार शिफारस केली. त्या डॉक्टरांना राजाकडून तार गेली. पण त्या डॉक्टरांनीं कळविलं, "मला चंबलला येतां येणार नाहीं. रोगी इकडे आला तर मी तपासून औषध देईन." आपल्या दरबारी नोकरांबरोबर हरिप्रसादांची रवानगी करण्याचा बेत राजांनीं केला. पण हरिप्रसाद जायला तयार होईनात. अखेर राजे म्हणाले, "ठीक आहे. आम्हीच घेऊन जातों तुम्हांला मुंबईला."

मुंबईतला चंबल संस्थानचा राजवाडा लहानसाच पण टुमदार आहे. त्या प्रासादांतल्या एका प्रशस्त दालनांत हरिप्रसादांना ठेवण्यांत आलं. राजे स्वतः मुद्दाम मुक्काम करून मुंबईत राहिले. मुंबईच्या डॉक्टरांचं औषध सुरू झालं. या औषधाचा तरी गुण येतो कीं नाहीं असं राजांना आणि इतरांना वाटत होतं. स्वतः हरिप्रसाद उदासीन होते. ते राजांना म्हणत, "सरकार, आपण कशासाठीं इतकी कोशीस करीत आहांत ? माझं आयुष्य वाढवून करायचं आहे काय ? जगाला कांहीं करून दाखवावं, अमुक एक आनंद घ्यावा अशी ऊर्मिच उरली नाहीं कीं मग आयुष्य लौकर संपलेलंच बरं." पण राजे त्यांचं हें बोलणं मनावर घेत नसत. ते लौकर बरे व्हावेत अशी त्यांची मनापासूनची इच्छा होती. डॉक्टरांचे उपचार तर चालू झालेच होते. परंतु शिवाय हरिप्रसादांच्या मनाला हुशारी यावी यासाठीं शक्य त्या गोष्टींची व्यवस्था राजांनीं केली होती. ते स्वतः घटका दोन

घटका तरी त्यांच्या जवळ येऊन गप्पा मारीत बसत. या वेळींच ते रोजच्या वर्तमानपत्रांचं वाचनहि करीत, आणि त्यांतल्या मुख्य मुख्य बातम्या हरिप्रसादांना सांगत.

आज राजे असेच हरिप्रसादांशीं बोलत बसले होते. एकेक वर्तमानपत्र हातीं घेऊन, उलगडून त्यावरून ते दृष्टि फिरवीत होते आणि " प्रसादजी, हें ऐकलंत का ? " असं म्हणून त्यांना मधूनच एखादी बातमी ऐकवीत होते. हा त्यांचा उद्योग चाललेला असतांना ते मध्येंच एकदम म्हणाले, " ओहो ! प्रसादजी, फारच महत्त्वाची बातमी आहे. "

हरिप्रसाद म्हणाले, " काय ? "

" आधीं हा फोटो पहा " असं म्हणून राजांनीं वर्तमानपत्राची घडी त्यांच्यापुढें धरली.

तो फोटो पाहातांच हरिप्रसाद आश्चर्यचकित झाले ! रंभा आणि हेमचंद्र या दोघांचा नृत्यभूषेंतला तो फोटो होता !

फोटोखालीं त्या दोघांचीं नांवं होतीं आणि " या अद्वितीय नृत्यकारांच्या कलामंडळाचे जाहीर कार्यक्रम पुढच्या आठवड्यांत मुंबईच्या रसिकांना पहावयास मिळणार आहेत " असा इंग्रजी मजकूर होता, तो राजांनीं हरिप्रसादांना समजावून सांगितला.

हरिप्रसादांनीं पुन्हां एकदां फोटोकडे पाहिलं, राजांकडे नजर टाकली, आणि ते गप्प बसले. त्यांच्या मनांत आलं, राजे आतां आपल्याला बहुतेक म्हणतील, " बघा प्रसादजी, तुम्ही तर रंभा मेली असं समजत होतां. तिची विद्या संपली, कला खलास झाली असं तुम्हांला वाटत होतं. पण तसं झालेलं नाहीं. " हरिप्रसादांनीं राजांकडे पुन्हां एकदां अशा अर्थानं

पाहिलं कीं आपण मला असाच प्रश्न करणार आहांत ना ? या प्रश्नाला माझं उत्तर काय आहे तें मी सांगूं काय ? रंभा मेलेली नसेल, जिवंत असेल, अजूनहि ती नाचत असेल, तिच्या आणि हेमचंद्राच्या नृत्याचे जाहीर कार्यक्रम होणारहि असतील, पण मी तुम्हांला सांगतों, तिच्यांतली खरी कला आतां जिवंत असेल ही गोष्ट शक्य नाहीं. आज आपल्या देशांत नृत्यकलेची अशी अवस्था झाली आहे कीं पैशाच्या आणि जाहिरातबाजीच्या जोरावर कुणीहि नृत्यकार म्हणून मिरवावं. भारतीय नृत्यकलेचं खरं स्वरूप कुणालाच माहित नाहीं. श्रीमंत लोकांना तर मुळींच माहित नाहीं. जो सगळयांत मोठी जाहिरातबाजी करील त्याला मोठा कलावंत समजून त्याच्यावर पैसे उधळायला हे श्रीमंत लोक तयार आहेत. भारतीय नृत्यकलेच्या नांवाखालीं कोणकोणते हिडिस प्रकार खपविले जात आहेत तें आपण पाहतों. मोठमोठ्या लक्षाधीश गिरणीवाल्यांच्या लेकी-सुनांचे जाहीर नृत्यप्रयोग होत आहेत, पुढारी आणि मंत्री असल्या जाहीर प्रयोगांचीं अध्यक्षस्थानं स्वीकारताहेत, लोकांना वाटतं आहे एवढ्या श्रीमंतांच्या मुली रंगभूमीवर अर्ध्या उघड्या अंगांनीं नाचतांना आपल्याला पहायला मिळताहेत, आणखी काय पाहिजे ? हीच खरी नृत्यकला असं नाचणारे सांगताहेत. पुढारी, मंत्री त्यांचा उदोउदो करताहेत, लोक तें मानताहेत. दुनिया झुकायला तयार आहे. झुकानेवाले झुकवताहेत. अशी झाली आहे साऱ्याच संगीत कलेची अवस्था ! रंभा आणि हेमचंद्र यांनीं कुणा तरी पैसेवाल्याच्या मदतीनं दुनियेला ठकविण्याचा हा उद्योग आरंभला असेल...त्यांच्या नृत्याची ही जाहिरात पाहून मला आनंद होत नाहीं...रंभाजवळ आतां खरी विद्या

राहिलेली असणं कठीण आहे. प्रेमाच्या नादीं लागल्यावर विद्येची खरी तळमळीची उपासना चालू राहणं शक्य नाहीं. माझ्यापासून ती दूर गेली तेव्हांच तिची खरी विद्या संपली! आतां हें विद्येचं नुसतं विडंबन उरलं असेल!...

हे विचार हरिप्रसादांनीं राजांजवळ बोलून दाखविले नाहींत. पण ते त्यांच्या मनांत नंतर सारखे येऊं लागले. हरिप्रसाद ज्याप्रमाणें अत्यंत श्रेष्ठ दर्जाचे कलाकार होते, त्याप्रमाणें त्यांच्या ठिकाणीं विकृत अहंकार होता. असा अहंकार बहुधा हरिप्रसादांसारख्या कलावंतांच्या ठिणाणीं असतोच! त्यांची कल्पना होती कीं रंभाला विद्या देणारे जगांत एकटे काय ते तेच होते. त्यांनीं तिला प्रत्यक्ष तयार करून दाखविली होती. त्यांच्या कर्तृत्त्वाबद्दल प्रश्न नव्हता. पण आपण रंभाला विद्या दिली असं समजतां समजतां आपल्याखेरीज तिला कुणी विद्या देऊं शकणार नाहीं असंहि ते समजूं लागले होते. कोणत्याहि कलेच्या क्षेत्रांतल्या मोठ्या कलावंताची चूक होते ती हीच. आपण कर्तबगार आहोंत एवढंच न मानतां आपल्याखेरीज दुसरं कोणी कर्तबगार नाहींच असं ते मानूं लागतात...रंभा जेव्हां हरिप्रसादांना सोडून गेली तेव्हां त्यांचा एक अहंकार पराभूत झाला होता. ती सर्वस्वी आपल्या हुकमांत आहे अशी जी समजूत त्यांनीं उराशीं बाळगली होती ती केवळ भ्रम आहे, असं त्यांना मान्य करावं लागलं होतं. एका अहंकाराच्या या पराभवामुळें रंभाच्या विद्येचं सारं अधिष्ठान आपण आहोंत हा त्यांचा दुसरा अहंकार त्यांनीं अधिकच हट्टानं पोटाशीं धरून ठेवला. आपल्यापासून दूर गेल्यावर नृत्यकलेची खरी उपासना रंभाकडून घडणं शक्य नाहीं अशी त्यांनीं समजूत करून घेतली होती. कारण त्यांचा

जो अहंकार उरला होता, तो या समजुतीनंच टिकण्यासारखा होता...दोन वर्षांत रंभाचं नांवदेखील ऐकूं येईनासं झालं होतं तेव्हां त्यांच्या या अहंकाराला मोठा संतोष झाला होता. लोकांजवळ बोलतांना ते म्हणत, संगीताच्या दुनियेंतलं रंभाचं आयुष्य संपुष्टांत आलं ही फार वाईट गोष्ट झाली. माझ्यापासून दूर का होईना पण तिनं आपली कीर्ति कायम ठेवली असती तर मला आनंद झाला असता. पण त्यांचं हें सारं बोलणं खोटं होतं. रंभाचं नांवदेखील कोठें ऐकूं येईना हें पाहून त्यांना मनांतल्या मनांत एक विकृत समाधान वाटत आलं होतं. रंभा आपल्या सहवासांत आहे तंवरच तिची विद्येची उपासना चालूं रहाणार आहे, तिचा लौकिक वाढणार आहे, आपल्यापासून ती दूर गेली कीं तिचा मोठेपणा खलास होईल, ही त्यांची समजूत खरी ठरली होती. त्यांचा एक अहंकार नष्ट झाला होता, पण हा दुसरा अहंकार पुष्ट होऊन मिरवूं शकत होता. जों जों अधिकाधिक काल लोटत गेला आणि रंभा आतां पुन्हां लोकांना कधीं दिसणार नाहीं असं वाटूं लागलं तों तों त्यांच्या मनांतला हा अहंकार अधिकाधिक संतुष्ट होत गेला होता...

ज्या वेळेस रंभाचे जाहीर कार्यक्रम थाटामाटांत होत होते, तिला मोठमोठ्या लोकांचीं आणि परिषदांचीं आमंत्रणं येत होतीं, त्या वेळेस हरिप्रसादांनीं तयार केलेली शिष्या असं सगळयांनीं तिचं वर्णन केलेलं पासून त्यांना धन्यता वाटली होती. आणि आतां रंभा हरिप्रसादांना सोडून गेल्याबरोबर तिची विद्या आणि कला खलास झाली असं सारं जग म्हणत असेल या कल्पनेनं त्यांच्या अहंकाराचं समाधान होत होतं. बघा, माझ्यापासून दूर होऊन रंभानं आपल्या कलेचं मातेरं

करून घेतलं असं त्यांना म्हणतां येत होतं. त्यांची सत्ता न जुमानतां ती निघून गेली याचं त्यांना भयंकर दुःख झालं होतं. या दुःखांत समाधान देणारा एवढाच विचार होता, कीं आपल्यापासून दूर जाऊन तिनं मिळविलं काय ? तिनं आपला नाश मात्र करून घेतला ! हें समाधान सात्विक नव्हतं, निर्मळ नव्हतं, तें तामसी होतं, दुष्टपणाचं होतं. विकृत होतं. पण तें हरिप्रसादांच्या अहंकाराला हवं होतं, आणि म्हणून हें समाधान देणारा विचार त्यांनीं आपल्या हृदयाशीं अगदीं घट्ट धरून ठेवला होता. दोन वर्षांचा दीर्घ काळ निघून गेला तेव्हां त्यांची खात्रीच झाली कीं रंभाचं कल्याण आपणच काय तें करूं शकलों असं आतां जगाला कबूल करावंच लागेल. नृत्याच्या दुनियेंतून रंभा उडून गेली होती. तब्बल दोन वर्षं झालीं तरी तिचा ठावठिकाणा नव्हता. ती आतां त्या क्षेत्रांत पुन्हां प्रकट होणार नव्हती...रंभाला निर्माण करणारा मी होतों, माझा सहवास संपल्या-बरोबर रंभाची कला संपली, असं त्यांना दिमाखानं म्हणतां येणार होतं. त्यांचा हा अहंकार शाबूत राहणार होता...

आणि आतां एकदम हेमचंद्र आणि रंभा दोघंहि प्रकट होत होतीं !...

आपल्या शाबूत राहिलेल्या अहंकारावरहि आतां घाव बसणार असं भय हरिप्रसादांना वाटलं. या घावांतहि तो अहंकार कायम रहावा असा प्रयत्न ते करूं लागले. आणि ते म्हणूं लागले, " रंभा अजून नाचत असेलहि, पण तिच्या नाचण्यांत खरी विद्या उरली असेल म्हणतां ? नांव कशाला ? तिनं आपल्या कलेचं केव्हांच मातेरं करून टाकलं असेल. आतां तिच्याजवळ जी कला उरली असेल ती म्हणजे केवळ पागल पैसेवाल्यांना आणि मूर्ख सामान्य लोकांना खुष करणारा डोंबाऱ्याचा खेळ असेल ! "

असं म्हणण्यानंच हरिप्रसादांचा उरलेला अहंकार टिकण्यासारखा होता... तसं ते म्हणूं लागले.

त्याचं हें असलं बोलणं चंबलचे राजे ऐकून घेत. पण त्याबद्दल हरिप्रसादांशीं जरी त्यांनीं वाद घातला नाहीं तरी तें त्यांना मनांतून पटत नसे. ज्या दिवशीं वर्तमानपत्रांत हेमचंद्र आणि रंभा यांचे फोटो प्रसिद्ध झाले त्या दिवसापासून त्यांच्या जाहीर नृत्यप्रयोगाची जाहिरातहि मुंबईच्या साऱ्या वृत्तपत्रांत फडकूं लागली, आणि वर्तमानपत्रांच्या प्रतिनिधींनीं घेतलेल्या त्या दोघांच्या छोट्या मोठ्या मुलाखतीहि त्यांच्या वाचनांत येऊं लागल्या. एके दिवशीं एका साप्ताहिकांत खूपच विस्तृत मुलाखत आणि फोटो प्रसिद्ध झालेले त्यांना आढळले. त्यांनीं त्या मुलाखतीकडे मोठ्या तत्परतेनं नजर टाकली. दोन वर्षांत रंभाचं नांव कुठेंहि ऐकूं आलं नव्हतं आणि आतां मुंबईत फार मोठ्या थाटबाज प्रमाणावर तिचे नृत्यप्रयोग होणार होते, या गोष्टीचं त्यांना आश्चर्य वाटलं होतं. आणि या आश्चर्याचं निरसन करणारा कांहीं मजकूर त्या मोठ्या मुलाखतींत आढळतो कीं काय तें त्यांना पहायचं होतं...तो त्यांना आढळला तेव्हां ते अगदीं लक्षपूर्वक वाचूं लागले.

हेमचंद्र ' डान्सिंग स्कूल ' चालवून शिकवण्या करीत होता, तेव्हां हबीब नांवाचा मुसलमान तरुण त्याच्याकडे शिकायला येत असे. फारच देखणा व हुशार होता तो. हेमचंद्राची बरेच दिवस अशी समजूत होती, कीं कोणा तरी मध्यम स्थितींतील सामान्य आईबापांचा मुलगा असावा तो. पण उभयतांचा अधिक निकट सहवास होऊं लागला तेव्हां त्याला कळलं कीं हैदराबादच्या एका कोट्याधीश नबाबाचा हबीब हा एकुलता एक मुलगा होता. सामान्य माणसांच्या मुलाप्रमाणें गरिबींत राहून विद्या

करण्याची अलौकिक कल्पना त्याच्या डोक्यांत शिरली होती आणि ही लहर हैदराबादमध्यें पुरी करणं शक्य नव्हतं म्हणून तो परमुलखातल्या विश्वविद्यालयांत शिकत होता. बापाकडून तो अवघे दीडशें रुपये महिन्याला मागवीत असे. साधेपणानं रहात असे. पदवीपरीक्षेचा अभ्यास करीत असे. हेमचंद्राची पछान झाल्यापासून नृत्यकलेचाहि षोक त्याला लागला होता. हळूहळू हेमचंद्राविषयीं त्याला फारच आदर वाटूं लागला. ‘ एशियाटिक म्युझिकल कॉंग्रेस ’ मध्यें रंभाचं नृत्य त्यानं पाहिलं तेव्हां तो अगदीं दिपून गेला. पुढें रंभा आणि हेमचंद्र यांचा विवाह झाल्यावर तो त्या दोघांचाहि भक्त बनला. मोठमोठे बेत हेमचंद्राच्या मनांत येऊं लागले पण त्या बेतांत मुख्य अडचण ही होती कीं पैसा कोठून आणायचा. पण त्यानं हबीबजवळ सारे बेत सांगितल्यावर तो म्हणाला “ पैसे ? किती हवेत ? मी मुखत्यार असतों तर सारी इस्टेटच तुम्हां दोघांच्या स्वाधीन केली असती. इतकी तुमची योग्यता खचित आहे. पण मुखत्यार नसलों तरी मी माझ्या बाबांचा लाडका आहे. अन् खराब नादाला मी कधींच लागणार नाहीं याबद्दल माझ्या वागण्यानं मीं त्यांची खात्री पटविलेली आहे. त्यांच्याकडून तुम्हांला लागेल ती सारी मदत देतों. ” त्यानं आपलं बोलणं खरं करून दाखविलं होतं. हैद्राबाद संस्थानांत हबीबच्या बापाची शेंकडों एकर जमीन होती. तो हेमचंद्राला म्हणाला, “ यांतली वाटेल तेवढी जमीन वापरायला घ्या, इमारतहि बांधून देतों, वाटेल तितके पैसे देतों, काढा तुमचं ‘ भारतीय कला मंडळ ’ आणि करा धडाक्यानं काम सुरूं. ”

“ अशा प्रकारें माझं एक स्वप्न साकार होऊं लागलं होतं ”... हेमचंद्रानं त्या मुलाखतींत म्हटलं होतं...

वाचतां वाचतां राजांना वाटलं, हें सारं हरिप्रसादांना सांगावं. पण त्यांनीं सांगितलं नाहीं. ते मुलाखत पुढें वाचूं लागले.

हेमचंद्रानं आपल्या या भारतीय कला मंडळांत शिकलेली आणि शिकाऊ तरुण माणसं लगेच घेतलीं होतीं, वाद्यं खरेदी केलीं होतीं, तीं वाजविणाऱ्या निष्णात वादकांची भरती केली होती. दीड पावणे दोन वर्षं रात्रंदिवस तयारी करून आतां जाहीर प्रयोगांसाठीं तो बाहेर पडला होता. पहिले प्रयोग मुंबईत होणार होते. " आमच्या या नृत्यांत लोकांना कांहीं तरी नवीन दृष्टीस पडेल व त्यांना आम्ही अगदीं खुष करूं, असा आमचा विश्वास आहे. " हेमचंद्रानं मुलाखत घेणाऱ्याला सांगितलं होतं...

मुलाखतीच्या शेवटीं ती घेणाऱ्यानं हेमचंद्राला प्रश्न केला होता, " आपली परवागी असेल तर एक प्रश्न विचारायचा आहे. "

हेमचंद्र म्हणाला होता, " विचारा. "

" आपले गुरु कोण ? "

जवळ बसलेल्या रंभाकडे नजर टाकल्यासारखं करून हेमचंद्र म्हणाला होता, " तुम्हांला माहित नाहीं असं दिसतं, परंतु हिच्या नृत्याचे जाहीर जलसे मुंबईत पूर्वीं झाले होते, व गाजले होते. मुंबईतच नव्हे तर हिंदुस्थानांतल्या इतर मोठमोठ्या शहरांतहि. ही कुणाची शिष्या तें साऱ्यांना माहित आहे. नामांकित तंतकार हरिप्रसाद हे हिचे गुरु. आणि माझेहि ! कारण त्यांच्याजवळ मीहि पुष्कळ दिवस होतों. त्यांनीं दिलेल्या विद्येच्या पुण्याईवरच आम्ही हा सारा उद्योग आरंभिला आहे. हैदराबादच्या आमच्या ' कलामंडळां ' त त्रावणकोरकडले एक प्रसिद्ध नर्तक येऊन सामील झाले. त्यांचं नांव रामचंद्र कुटी. हे जावा सुमात्राकडे

जाऊन तिकडले नृत्यप्रकार शिकून आलेले आहेत. त्यांच्या मदतीनं आम्ही 'बाली' नृत्यंहि बसविलीं आहेत. पण माझे आणि हिचे खरे गुरु म्हणजे चंबलच्या राजांच्या दरबारचे तंतकार हरिप्रसाद हेच होत..."

हें वाचल्यावर मात्र राजांना राहवेना. त्यांनीं तो सारा मजकूर हरिप्रसादांना वाचून दाखविला. त्यांची कल्पना होती, तो ऐकून हरिप्रसादांना आनंद होईल. पण तसं झालं नाहीं. उलट चिडल्यासारखं करून हरिप्रसाद म्हणाले, " माझं नांव कशाला हे लोक सांगताहेत ? हंः ! यांचा मी गुरु काय ? गुरु म्हणून मोठाच मान ठेवला आहे कीं नाहीं माझा या दोघांनीं ? आणि आतां हीं दोघं जो डोंबाऱ्याचा खेळ करीत असतील तो माझ्या नांवावर खपविणार आहेत होय ? सरकार, आपण मला क्षमा करा, परंतु या दोघांनीं गुरु म्हणून माझं नांव घ्यावं यांत माझा मोठा गौरव झाला असं मुळींच वाटत नाहीं. उलट माझं नांव खराब मात्र करतील हीं. माझं नांव घेण्याची यांना बंदी केली पाहिजे. यांचा मी गुरु म्हणे ! " अशा प्रकारें ते मग आणखी बडबडत राहिले.

राजांना त्यांचं बोलणं आवडलं नाहीं. पण हरिप्रसादांना ते फार मानीत होते. स्पष्ट बोलून त्यांना दुखविण्याची त्यांची इच्छा नव्हती. ते पुन्हां बाकीचीं वर्तमानपत्रं वाचूं लागले, आणि कांहीं वेळानं हरिप्रसादांजवळून उठून गेले.

हेमचंद्र आणि रंभा यांच्या कलामंडळाच्या पहिल्या जाहीर प्रयोगाच्या दिवशीं सकाळीं अखेरची तालीम घेण्यांत हेमचंद्र गुंतला होता. तें काम करतां करतांच इतर कित्येक गोष्टींकडेहि त्याला लक्ष द्यावं लागत होतं. प्रारंभींच्या नृत्यासाठीं खूपच भव्य सेटिंग तयार करण्यांत आलं होतं

त्याची मांडामांड नीट झाली कीं नाहीं, प्रकाशाची अगदीं नवीन तऱ्हेची योजना त्यानं केली होती ती बरोबर साधली आहे कीं नाहीं, वगैरे गोष्टी पुन्हां पुन्हां रंगभूमीकडे जाऊन तो पहात होता. या गर्दींत त्याच्या इकडे तिकडे येराझारा चालू असतांना त्याच्या कलामंडळांतला एक माणूस लगबगीनं त्याच्याकडे आला आणि त्याला म्हणाला, " हा तंटा आतां आपणच मिटवा."

हेमचंद्र थबकला आणि आश्चर्यानं म्हणाला, " तंटा ? काय भानगड आहे ?"

त्या इसमाच्या मागोमाग ब्रीचेस, हंटिंग कोट, फेटा अशा पोशाखांतला एक गृहस्थ येऊन जवळ उभा राहिला होता. त्याच्याकडे बोट दाखवून हेमचंद्राचा माणूस म्हणाला, " यांना पहिल्या रांगेतलीं तिकिटं हवीं आहेत."

हेमचंद्र म्हणाला, " मग दे कीं. यांना माझ्याकडे घेऊन यायचं काय कारण ? मी काय तिकिटविक्री करतों आहे ? जा घेऊन यांना खिडकीकडे, आणि देऊन टाक तिकिटं."

तो मनुष्य म्हणाला, "द्यायचीं कुठलीं ? पुढच्या रांकेतलं राहोच पण कोणत्याहि दराचं एकसुद्धां तिकिट शिल्लक नाहीं. ओळीनं तीन खेळाचीं सारीं तिकिटं खपलीं आहेत. याना देऊं कुठलं तिकीट ?

" मग सांग त्यांना तिकीट नाहीं म्हणून. माझ्याकडे यायचं काय कारण ?" असं म्हणून हेमचंद्र जाऊं लागला.

तो मनुष्य म्हणाला, " मी यांना तसं सांगितलं पण हे माझ्याशीं भांडायला लागले. ते म्हणतात आम्हांला तिकिट मिळत नाहीं म्हणजे

काय ? आम्ही कोण आहोंत असं समजतां तुम्ही ? आतां यांना मी कोण समजतों हें मी कसं सांगूं ? हे म्हणाले, आम्हांला हेमचंद्रांकडे घेऊन चला. ते ओळखतील आम्हांला. मी म्हटलं चला—"

हेमचंद्र किंचित् हंसला, आणि त्या फेटावाल्या गृहस्थाकडे पाहून म्हणाला, "हें बघा—"

पण फेटावाल्यानं त्याला पुढं बोलूं दिलं नाहीं. त्यानं दरबारी थाटाचा मुजरा करून म्हटलं, "आपण मला ओळखलं नाहीं ?" हेमचंद्रानं मान हालविली. तेव्हां तो पुढें म्हणाला, "आपण विसरलां आम्हांला ? पण आम्ही नाहीं आपल्याला विसरूं देणार. चंबलच्या राजांचा मी नोकर आहे."

तें ऐकतांच हेमचंद्र एकदम म्हणाला, "आं ? काय म्हणतां ?"

"सरकारनींच मला पाठविलं तिकीटं काढण्यासाठीं म्हणून आलों. आणि आतां तुमचीं माणसं सांगतात कीं तिकीटं मिळायचीं नाहींत !"

हेमचंद्रानं त्या इसमाच्या पाठीवर थाप मारली आणि म्हटलं, "दोनच काय हव्या तेवढ्या जागा चंबलच्या राजांना मिळतील." त्या फेटावाल्यानं लगेच नोटा पुढें केल्या तेव्हां हेमचंद्र हंसून म्हणाला, "पैसे राहूं द्या तुमच्याकडे. चंबलच्या राजांना तिकीटं विकत देऊं कीं काय ? छे. छे."

मग त्यानं एकदम विचारलं, "पण मला असं सांगा, राजांची स्वारी इथें मुंबईत कशी ? राजे इथं असतील ही कल्पनादेखील नाहीं. इथें कसा मुक्काम ?"

हरिप्रसाद आज दोन वर्षं कसें आजारी होते व मुंबईत एका नामांकित डॉक्टरांचं औषध त्यांना द्यायसाठीं स्वतः सरकार त्यांना घेऊन येऊन मुंबईंत कसे राहिले होते, वगैरे हकीगत त्या माणसानं सांगितली.

हेमचंद्र अधिकच आश्चर्यानं म्हणाला, "म्हणजे हरिप्रसाददेखील इथं मुंबईत आहेत ? आणि आजारी आहेत म्हणतां ? आपण इकडे माझ्याबरोबर या पाहूं." असं म्हणून एका जिन्याकडे हेमचंद्र निघाला. रंगभूमीच्या वरच्या मजल्यावर नृत्याची तालीम चालली होती. त्या हॉल-मध्यें पाय टाकतांच त्यानं रंभाला हांक मारली आणि तो म्हणाला, "जरा इकडे ये."

ती प्रत्यक्ष नृत्यांत गुंतलेली नव्हती. आपल्या दहा महिन्यांच्या गोंडस बाळसेदार मुलाला कडेवर घेऊन तालीम बघत उभी होती. ती चटकन् त्याच्याजवळ आली. हेमचंद्रानं आधीं आपल्या मुलाचा मुका घेतला, त्याच्याकडे पाहून चुटक्या वाजविल्या, आणि मग तो फेटावाला इसम तेवढयांत जवळ येऊन राहिला होता त्याच्याकडे बघून तो रंभाला म्हणाला, "हे काय बातमी सांगताहेत माहित आहे का ?"

त्या फेटावाल्या माणसानं रंभाला मुजरा केला. हेमचंद्रानं त्याला ओळखलं नव्हतं, पण रंभानं ओळखलं. ती त्याच्याकडे पाहून हंसली. व म्हणाली, "बरे आहांत ना ! सरकारांची तब्येत बरी आहे ?"

हेमचंद्र म्हणाला, "अग ते काय सांगताहेत माहित आहे काय ?"

"काय ?"

"चंबलच्या राजांचा सध्यां इथें मुंबईत मुक्काम आहे म्हणे."

रंभा आश्चर्यानं उद्गारली, "आं ?"

"आणि हरिप्रसाददेखील इथे आहेत--"

रंभा म्हणाली, "काय, सांगतां काय तुम्ही ?" हें विचारतांना तिनं हेमचंद्राकडे पाहण्याऐवजीं त्या फेटावाल्या गृहस्थाकडे पाहिलं; त्यामुळें

त्यानं हरिप्रसादांच्या दुखण्याची वगैरे सारी हकीगत आधीं हेमचंद्राला जशी सांगितली होती तशी पुन्हां एकदां निवेदन केली.

त्याचं बोलणं पुरतं संपलं नाहीं तोंच हेमचंद्र रंभाला म्हणाला, " फार आश्चर्याची आणि आनंदाची आहे कीं नाहीं गोष्ट ? "

रंभा म्हणाली, " वा! म्हणजे काय ? चंबलचे सरकार आणि पिताजी दोघंहि इथें मुंबईत आहेत हा फार मोठा शकुन म्हणायचा. "

हेमचंद्र म्हणाला, " आजच्या पहिल्या प्रयोगाला हजर राहण्याची विनंति करायला हवी त्यांना. म्हणूनच मी धांवत तुझ्याकडे आलों. " त्या फेटावाल्याकडे बघून त्यानं विचारलं, " सरकार आतां भेटतील कीं नाहीं ? "

तो म्हणाला, " भेटतील. "

" त्यांचा पत्ता—"

तो फेटेवाला चटकन् म्हणाला, " पत्ता ? आपला बंगला आहे कीं इथें मुंबईत—"

आपला ?—त्याच्या तोंडचा तो शब्द ऐकून हेमचंद्राला जरासं आश्चर्य वाटलं. पण मग त्याच्या लक्षांत आलं कीं बोलण्याची ही संस्थानी तऱ्हा होती. तो हंसला आणि म्हणाला, " हो, हो. खरंच कीं आपला बंगला आहे नाहीं का ? कुठेंसा आहे मला जरा सांगा पाहूं. "

त्या गृहस्थानं वर्णन करून सांगितलं तेव्हां हेमचंद्र म्हणाला, " आलं आलं लक्षांत. आतां सांपडेल मला. तुम्हीं असं करा, पुढें व्हा, सरकारना सांगा आपल्याला हव्या तेवढ्या जागा मिळतील. आणि असंहि कळवा

कीं मी आणि ही दोघंजण हुजुरांचं दर्शन घ्यायला आणि आमंत्रण करायला येतोंच आहोंत."

त्या फेटेवाल्यानं दोघांना पुन्हां मुजरा केला आणि तो निघून गेला. हेमचंद्र रंभाला म्हणाला, " चल, जाऊं या ना ? "

ती हंसत म्हणाली, " हो, जाऊं या ना. " परंतु दुसऱ्याच क्षणीं तिच्या तोंडावरचं हास्य गेलं आणि ती हळूंच पुटपुटली, " पण— "

" पण काय ? "

ती म्हणाली, " मला भय वाटतं. "

" भय ! भय कशासाठीं ? "

ती हलकेच म्हणाली, " दोन वर्षांनंतर पिताजींपुढें जाणार आहोंत आपण. ते काय म्हणतील अशी भीति वाटते. "

हेमचंद्र म्हणाला, " वेडीच आहेस. तूं किंवा मी त्यांचा असा अपराध केलाय कीं त्यांचं आपल्याला भय वाटावं ? उलट आपण हा मोठा उद्योग सुरू केलाय अन् त्यांचा आशीर्वाद मागणार आहोंत. भय काय म्हणून वाटतं तुला ? "

" मी किंवा तूं त्यांचा अपराध केला नाहीं. पण ही आपली समजूत झाली. त्यांची तशी असली पाहिजे ना ? ती नसेल अशी मला शंका आहे. ते कदाचित् आपल्याला पुढेंदेखील येऊं देणार नाहींत. "

हेमचंद्र म्हणाला, " त्यांनीं तुझ्या एक थोबाडींत मारली तरीदेखील हरकत नाहीं. पण आपण त्यांच्याकडे जायला हवंच. ते इथें आहेत असं कळल्यावर—"

रंभा म्हणाली, " तुझं म्हणणं बरोबर आहे. चल."

तिनं आपल्या मुलाला दाईच्या स्वाधीन केलं, आणि ती त्याच्याबरोबर निघाली. पण तिची छाती धडधडत होती. ज्या दिवशीं ती हरिप्रसादांना सोडून हेमचंद्राकडे गेली तो दोन वर्षांपूर्वीचा दिवस तिला आठवत होता. त्यांनीं संतापानं तिच्या दोन सणसणीत थोबाडींत मारल्या होत्या, सापानं फूत्कार सोडावे त्याप्रमाणें ते म्हणाले " बेशरम!" " बेशरम!" तें सारं तिला आठवत होतं...

चंबलच्या छोट्याशा राजप्रासादाच्या आवारांत मोटार शिरली तेंव्हां ती हेमचंद्राला म्हणाली, " एकदां वाटतं परत जावं. पिताजी आपल्याशीं नीट बोलले चालले तर ठीक. नाहीं तर—"

त्यानं किंचित् हंसून विचारलं, " नाहीं तर काय?"

ती म्हणाली, " नाहीं तर कुठून त्यांच्याकडे आलों असं व्हायचं."

" चुकतेस तूं. आपण त्यांच्याकडे चाललों आहोंत तें परिणामाकडे दृष्टि ठेवून नव्हे. कसल्याहि लोभानं नव्हे. आशेनं नव्हे. कर्तव्य म्हणून जात आहोंत. हरिप्रसाद आपल्याशीं प्रेमानं बोलतील कीं शिव्या देऊन चालते व्हा म्हणतील त्याचा विचार आपण करायचा नाहीं."

ती हलकेच म्हणाली, " मला मोठा चमत्कार वाटतो."

" कशाचा?"

" या गोष्टीचा कीं खरं म्हणजे पिताजींची भेट घ्यावी असं मला वाटायचं तें मी मनाशीं शंका काढतें आहे, आणि तुझा त्यांच्यावर वास्तविक राग असायचा तो तूं अपमान सोसूनहि त्यांच्याकडे जायला उत्सुक आहेस. हें चमत्कारिक नाहीं काय?"

तो तिच्याकडे पाहून हंसला आणि म्हणाला, " तूं एक गोष्ट विसरतेस. हरिप्रसादांवर माझा एके काळीं राग होता, त्यांचं माझं भांडण होतं, तें एकाच कारणासाठीं कीं मला तूं हवी होतीस आणि ते आड येत होते. तूं मला मिळालीस, माझी झालीस, त्या दिवशींच त्यांचं माझं भांडण संपलं ! त्यांच्यावरचा माझा रागहि संपला ! त्यांच्या मोठेपणाबद्दल मला जो आदर आहे तेवढाच आतां शिल्लक राहिलाय. मग त्यांच्या भेटीला मला जावंसं वाटलं तर त्यांत चमत्कारिक तें काय ? तुझं मन कचरतं आहे हें मात्र चमत्कारिक आहे खरं."

रंभा कांहीं बोलली नाहीं. पण तिला मनांतल्या मनांत सारखं वाटत होतं, कीं आपण भेटीला आलों म्हणून हरिप्रसादांना कांहीं आनंद व्हायचा नाहीं.

तिची ही भीतिच खरी ठरली. त्या दोघांना पाहिल्याबरोबर " कशाला आलांत माझ्याकडे ? मला तुमच्याशीं एक अक्षरदेखील बोलायचं नाहीं. चालते व्हा." असं म्हणावं हरिप्रसादांना वाटलं. पण स्वतः राजे त्यांच्याबरोबर होते. त्यामुळें असला आततायीपणा करणं त्यांना अशक्य झालं. त्यांच्या पावलांना स्पर्श करून हेमचंद्र आणि रंभा दूर उभी राहिलीं, तेव्हां त्यांच्याकडे बघून हरिप्रसादांनीं हंसण्याचा प्रयत्न केला, आणि " बरीं आहांत ना ? " असं विचारलंहि. त्या दोघांनीं त्यांच्या प्रकृतीची चौकशी केली, तेव्हां ते म्हणाले, " ही अशी आहे प्रकृति. दिसतीच आहे तुम्हांला. हुजूरनीं इकडे मुंबईत आणलं. एका मोठ्या डॉक्टराचं औषध चालूं आहे. पण जिवाला खरा आराम वाटत नाहीं. थोडा गुण आहे असं लोक म्हणतात. पण मला वाटत नाहीं. अन्

शिवाय असं पहा, गुण येऊन करायचंय काय ? मला जगून करण्यासारखं काय राहिलंय ? "

हेमचंद्र चटकन् म्हणाला, " असं कां बोलावं आपण ? करण्यासारख्या पुष्कळ गोष्टी आहेत. आमच्यासारख्यांना आपल्या आशीर्वादाचा आधार मिळेल तितके दिवस हवाच आहे—"

" हं: " असा उद्गार हरिप्रसादांनीं अशा तऱ्हेनं काढला कीं जणुं या बोलण्यांत काय अर्थ आहे असंच त्यांना म्हणायचं होतं.

तितक्यांत राजे हरिप्रसादांना म्हणाले, " प्रसादजी, हीं दोघं मुद्दाम आपल्या दर्शनाला कां आलीं माहीत आहे ना ? यांच्या आजच्या पहिल्या प्रयोगाला हजर राहिलं पाहिजे म्हणून आपल्याला आमंत्रण द्यायला हीं दोघं आलीं आहेत. "

" मला ? " असा उद्गार काढतांना हरिप्रसादांचा स्वर फार चमत्कारिक होता, आणि त्यांची चर्याहि नाराज दिसत होती. तो उद्गार काढून त्यांनीं मान हालविली ती अशा तऱ्हेनं कीं माझा काय संबंध असंच जणुं त्यांना म्हणायचं होतं.

पण राजेसाहेबांनीं त्यांच्या उद्गाराकडे आणि मान हालविण्याकडे दुर्लक्ष केलं आणि म्हटलं, " आपण त्यांचं आमंत्रण स्वीकारायला हवं. मीं स्वीकारलं आहे. त्यांच्या आजच्या प्रयोगाला मी जाणार आहे, आणि आपल्याला घेऊन येईन असं वचन मीं त्यांना दिलं आहे. "

हरिप्रसाद म्हणाले, " पण सरकार, माझी तब्येत ही अशी—"

राजे म्हणाले, " तें सारं मला कळतं. पण आपण हजर राहून या दोघांना आशीर्वाद द्यायलाच हवा. "

हरिप्रसाद म्हणाले, "सरकार, या दोघांना माझे अशीर्वाद खरोखरच हवे आहेत असं आपल्याला वाटत असेल. पण मला वाटत नाहीं. हीं दोघं माझ्याविषयीं जो आदर दाखवीत आहेत तें निव्वळ सोंग आहे. या आदराच्या देखाव्याचा खरा अर्थ फार निराळा आहे सरकार—

राजे म्हणाले, " हें काय बोलणं प्रसादजी ! "

" खोटं नाहीं सांगत. मी असं कां म्हणतों तें सारं उलगडून सांगतां येत नाहीं मला. पण माझ्या सांगण्यावर विश्वास ठेवा. "

'उलगडून सांगतां येत नाहीं' असं हरिप्रसाद वरकांती म्हणाले खरे. पण खरं म्हणजे त्या क्षणीं जे विचार त्यांच्या मनांत येत होते ते स्पष्ट बोलून दाखविण्यांची त्यांची इच्छा नव्हती....हेमचंद्र आणि रंभा त्यांच्या-पुढें येऊन उभीं राहिल्याबरोबर गारुड्यांनं चुटकी वाजवितांच नागानं फणा काढावी त्याप्रमाणें त्यांचा अहंकार डिवचला जाऊन उठला होता. हेमचंद्र आणि रंभा किती तरी दीर्घ कालानंतर त्यांच्या नजरेस पुन्हां पडत होतीं. त्यांचीं तोंडं रडवीं झालेलीं आहेत, तेज नाहींसं झालं आहे, दुर्दशा झालेली आहे, अशा अवस्थेंत तीं दोघं दिसलीं असतीं, आम्ही आपल्याला सोडून गेलों आणि स्वतःचा घात करून घेतला, आमचे अपराध पोटांत घाला असं म्हणायसाठीं जर तीं दोघं आलीं असतीं, तर आपला विजय झाला असं त्यांना वाटलं असतं, त्यांचा अहंकार खुलला असता, कदाचित् त्या दोघांना त्यांनीं प्रेमानं जवळ बसवून घेतलं असतं...परंतु याच्या अगदीं विरुद्ध गोष्ट झाली होती...रंभाचं लावण्य पूर्वीपेक्षांहि अधिक तेजःपुंज, अगदीं उफाळून वर आल्यासारखं दिसत होतं. हेमचंद्र पूर्वीपेक्षां

अधिकच तब्येतदार आणि देखणा दिसत होता. दोघांचेहि चेहरे प्रसन्न समाधानानं उजळलेले दिसत होते. यशाची चमक दोघांच्याहि नजरेंत दिसत होती. त्यांचा पराभव झाला नव्हता! तीं दोघं विजयी ठरलीं होतीं! हरिप्रसादांचा पराभव झाला होता! आणि त्यांना खिजविण्यासाठीं, आपल्या विजयाचा दिमाख मिरविण्यासाठीं, तीं दोघं आमंत्रण द्यायला आलीं होतीं. त्यांच्या मनांतल्या एका अहंकारावर त्या दोघांनीं मागंच प्रहार केला होता. त्या अहंकारावर पडलेल्या घावाची जखम अजूनहि ताजी होती. आणि आतां त्यांच्या उरलेल्या दुसऱ्या अहंकारावरहि घाव घालायच्या तयारीनं तीं दोघं त्यांच्यापुढें हंसत उभीं होतीं...

हरिप्रसादांना अशी जबरदस्त इच्छा झाली कीं त्या दोघांना ओरडून म्हणावं, " बेशरम! बेवकूफ! माझ्या डोळ्यांपुढून चालतीं व्हा." पण राजे जवळ होते. आपल्या संतापाचा देखावा त्यांना करतां येत नव्हता. सारा संताप गिळून त्या दोघांकडे पाहून ते फक्त एवढंच म्हणाले,

" माझे आशीर्वाद तुम्हांला हवे आहेत हें मला कधींच खरं वाटायचं नाहीं. तुम्हीं मुद्दाम मला आमंत्रण करण्यासाठीं आलांत, याबद्दल तुमचे आभार मानतों. मोठी मेहेरबानी केलीत. पण मला आग्रह करूं नका. माझ्या नादीं लागूं नका. जवळ जवळ मसणवटींत जाऊन पोंचलेला माणूस आहे मी. मला कशाला बोलावतां? जा तुम्ही. तुमच्याशीं अधिक बोलत राहिलों तर माझ्या छातींत कळ उठेल."

असं म्हणून ते पलंगावर उठून बसले होते, ते आडवेच झाले.

हेमचंद्र आणि रंभा यांचीं तोंडं वाईट झालीं. त्यांनीं हरिप्रसादांच्या पायाला पुन्हां एकदां हात लावला आणि त्यांचा निरोप घेतला. राजे त्यांना निरोप देतांना म्हणाले, "तुम्ही निराश होऊं नका. प्रसादजींना मी घेऊन येईन."

"आपले फार उपकार होतील" असं म्हणून हेमचंद्र आणि रंभा परतलीं.

रात्रीं रंगपटांत वेषभूषा करीत असतांना रंभा हेमचंद्राला वरचेवर म्हणत होती, "पिताजी आपल्याशीं नीट वागणार नाहींत हें माझं भविष्य खरं ठरलं कीं नाहीं ?"

आणि तो दर वेळेस म्हणत होता, "पण अजून माझं एक भविष्य आहे आणि तें खरं ठरेल अशी माझी खात्री आहे. राजे हरिप्रसादांना घेऊन आल्याशिवाय रहायचे नाहींत. त्यांच्यासाठीं पहिल्या रांगेतला कोच शृंगारून ठेवलाय मी."

ती म्हणत होती, "तुझं हें भविष्य खरं ठरलं तर मला हवंच आहे."

हेमचंद्रानं आपली वेषभूषा आटपली आणि रंगभूमीवरच्या साऱ्या तयारीकडे अखेरची नजर टाकण्यासाठीं तो रंगपटांतून बाहेर गेला.

प्रयोग साडेनऊ वाजतां सुरू होणार होता. रंगपटांतल्या घड्याळांत तासाचा कांटा नवाच्या आंकड्याच्यावर चढला होता आणि मिनिटाचा कांटा एकेक घर खालीं झुकत होता. नऊ वाजून पांच मिनिटं झालीं, दहा झालीं, सव्वानऊ झाले. वेषभूषेची संपूर्ण तयारी झाल्यावर रंभा रंगपटांतून बाहेर

पडली आणि विंगमध्यें जाऊन उभी राहिली. बाहेर प्रेक्षकांची गर्दी उसळली होती. थिएटरच्या आवारांत येऊन थडकणाऱ्या मोटारींचे आवाज ऐकूं येत होते. वाद्यांच्या ताफ्यांतील एखाद्या हत्याराची तार त्या हत्याराचा वादक मध्येंच छेडून सुरांत आहे कीं नाहीं पहात होता. दोन वर्षांच्या अवधीनंतर रंभा जाहीर नृत्यासाठीं रंगभूमीवर जाणार होती. नृत्याच्या कार्यक्रमाला प्रारंभ होण्यापूर्वीची मनाची उत्कंठित, कांहींशी कंपित अशी जी अवस्था पूर्वी अनेक वेळां तिनं अनुभवली होती ती आज तिच्या अनुभवाला पुन्हां येत होती......

अशी ती उभी असतांना हेमचंद्र तिच्याजवळ घाईघाईनं आला आणि म्हणाला, " आले ! "

ती म्हणाली, " कोण ? "

" चंबलचे राजे ! आणि त्यांच्याबरोबर हरिप्रसादजी देखील !

" काय म्हणतोस ? "

त्यानं हंसून मान हलविली, तिचे दोन्ही हात दाबले आणि, " अगदीं उत्तम झालं पाहिजे हं " असं तिच्या कानांत सांगून तो दूर गेला.

घंटा झाली. आतां आणखी एक घंटा झाली कीं पडदा दूर होणार होता. सारं थिएटर माणसांनीं फुलून गेलं होतं. चंबलचे राजे मोठ्या प्रसन्न चित्तानं त्या गर्दीकडे पहात होते, आणि मधून मधून ते शृंगारलेल्या कोचावर जवळच बसलेल्या हरिप्रसादांकडेहि नजर टाकीत होते.

हरिप्रसादांची चर्या अगदींच कांहीं रुष्ट दिसत नव्हती. आनंदाची थोडीशी छटा त्यांच्या चेहऱ्यावर दिसूं लागली होती...रंभा त्यांच्याजवळ होती तेव्हां तिचे अनेक मोठमोठे जलसे झाले होते, पण या जलशाचा थाट, अगदीं उत्तमोत्तम पोषाख केलेल्या स्त्रीपुरुषांची गर्दी, व्यवस्थेची टापटीप आणि भव्य बादशाही नाट्यमंदिर—हें सारं अपूर्व होतं...हरिप्रसादांच्या मनांत हळूच प्रामाणिकपणाचा विचार येत होता, बेस्यांनीं करामत केली आहे खरी! हरिप्रसादांची दृष्टि ज्या पडद्यानं रंगभूमि झांकलेली होती त्या पडद्याकडे वरचेवर वळत होती. अतिशय भारी किंमतीच्या आकाशी रंगाच्या जाड मखमलीच्या त्या पडद्यावर निरनिराळया रंगांच्या किनखापाच्या तुकड्यांनं भरतकाम करून बर्फाच्छादित पर्वतांच्या पार्श्वभूमीवर नृत्य करणाऱ्या शिव-पार्वतीच्या प्रतिमा दाखविल्या होत्या. त्या पडद्याकडे पाहून हरिप्रसाद मनाशीं कबुली देऊं लागले होते, कीं बेस्यांनीं केली खरीच करामत!...

तितक्यांत पडद्याच्यावरच्या बाजूला फुलांच्या गेंदेबाज हारानं मढविलेली एक तसबीर खालीं सरकली, आणि सर्व प्रेक्षकांना ती दिसेल परंतु नृत्य सुरू झाल्यावर रंगभूमीवरील दृश्याच्या आड येणार नाहीं इतक्या बेतानं ती स्थिर झाली!

ती तसबीर पाहिल्याबरोबर प्रेक्षक एकमेकांना विचारूं लागले, "ही तसबीर कुणाची?" त्यांच्या आपसांतील बोलण्यानं सबंध थिएटरांत क्षणभंर कुजबुज पसरली.

आणि ती तसबीर पाहिल्याबरोबर चंबलच्या राजांनीं हरिप्रसादांचा हात दाबला आणि त्यांनीं म्हटलं, "पाहिलंत प्रसादजी, आणि आपण म्हणतां त्यांना आपले आशीर्वाद हवे आहेत हें सोंग आहे!" हरिप्रसाद कांहीं बोलले नाहींत. हार घातलेल्या स्वतःच्या प्रतिमेकडे त्यांनीं एकदोनदां नजर टाकली, पण मग त्या तसबिरीकडे पाहण्याची त्यांना शरम वाटूं लागली...हेमचंद्र आणि रंभा आपल्या उरलेल्या अहंकारावर घाव घालण्यासाठीं आलीं आहेत असं जं त्यांना सकाळीं वाटलं होतं त्याची त्यांना आतां थोडी लाज वाटूं लागली. तीं दोघं आपल्याला खरोखर मनापासून मानीत आहेत हें त्यांना पटूं लागलं. पुष्पहारानं मंडित झालेली आपली तसबीर प्रयोगाच्या वेळेस अशी डौलानं रंगभूमीच्या शिरोभागीं असलेली साऱ्या प्रेक्षकांना दाखवून 'बघा, ज्यांच्या आशीर्वादानं आम्ही कलेची सेवा करीत आहोंत, ते आमचे गुरु बघा!' असंच जणुं हेमचंद्र आणि रंभा साऱ्यांना सांगत होतीं...तीं दोघं विजयाचा उन्माद मिरवून आपल्याला खिजवीत आहेत अशी समजूत आपण करून घेतली होती याची हरिप्रसादांना त्या क्षणीं शरम वाटली... हेमचंद्र आणि रंभा यांच्या विजयांचा सकाळीं त्यांना मत्सर वाटला होता. त्यांचा अहंकार दुखावला होता. त्या दोघांचा तो विजय डोळ्यांनीं पाहणं नको असं त्यांना वाटलं होतं...पण आतां त्यांच्या अहंकाराला गुदगुल्या झाल्या. मत्सर नाहींसा झाला. हेमचंद्र आणि रंभा यांचा विजय म्हणजे पर्यायानं आपलाच विजय आहे अशी भावना त्यांच्या मनांत बळावूं लागली. त्यांच्या मनांतली सारी चीड, सारी रुष्टता, कटुता लुप्त झाली. त्यांच्या चर्येवर प्रसन्नतेचं हास्य दिसूं लागलं...

तितक्यांत शेवटचा घंटा झाली, पडदा हळूं हळूं दुभंगून दूर होऊं लागला. पडद्यावरच्या नृत्याच्या देखाव्याला बारीक बारीक चुण्या पडूं लागल्या. प्रेक्षकगृहांतले सारे दिवे मालविले गेले. वाद्यमेळाचं संगीत ऐकूं येऊं लागलं. दिव्यांनीं अगदीं झगझगून टाकलेली रंगभूमि स्पष्ट दिसूं लागली... हरिप्रसादांना आश्चर्याचा आणखी एक धक्का बसला !

त्यांनीं पाहिलं तों ज्या नटराजाच्या भव्य मूर्तीपुढं मस्तक नम्र करून प्रणामाच्या पविन्यांत एखाद्या स्वर्गीय अप्सरेसारखी दिसणारी रंभा उभी होती, ती मूर्तिदेखील शक्य तितकी त्यांच्यासारखी दिसावी अशी घडविण्यांत आली होती !

हरिप्रसाद स्वतः कधीं नाचले नव्हते. पण झुपकेदार मिशा काढून नटराजाचा वेष करून ते जर कधीं नृत्यासाठीं उभे राहिले असते तर हुबेहुब आतां रंगभूमीवर दिसणाऱ्या मूर्तीसारखे दिसले असते !

हरिप्रसादांचा विस्मय पोटांत मावण्यासारखा नव्हता. आणि आनंदहि ! आणि त्यांच्या अहंकाराची तृप्तिदेखील पोटांत मावण्यासारखी नव्हती...पखवाजावर इशाऱ्याची सम वाजली, आणि रंभाची लावण्य-मूर्ति अगदीं मंद हालचाल करूं लागली. तिच्या पायांतील नूपुरांचा छुम् छुम् आवाज होऊं लागला. ती नाचत नाचत पुढें आली आणि एकदां जेव्हां नृत्यांतील मुद्रा दर्शवितांना तिनं समोर पाहिलं तेव्हां तिची आणि हरिप्रसादांची नजरानजर झाली, त्याबरोबर केवळ त्यांनाच कळावं इतक्या बेतानं तिनं हास्य केलं आणि मस्तक झुकविलं.

हरिप्रसादांना वाटलं, एकदम आपल्या जागेवरून उठून आंत धांवत

जावं, तिला पोटाशीं धरावं, आणि म्हणावं, " बेटी, आज माझ्या आयुष्याचं सार्थक झालं..."

रंगभूमीवरील तें पहिलं नृत्य आणि त्यानंतरची हेमचंद्र आणि रंभाची जोड-नृत्यं ते एकीकडे पहात होते आणि दुसरीकडे शृंगारलेल्या त्या कोचावर बसणं त्यांना अधिकाधिक तापदायक होत होतं. आंत जाऊन रंभाच्या पाठीवर शाबासकी देण्यासाठीं त्यांचा जीव आतुर झाला होता.

मध्यांतराच्या वेळेस हेमचंद्राकडून निरोप आला तेव्हां ते राजांबरोबर आंत गेले.

त्यांच्या स्वागतासाठीं हेमचंद्रानं जय्यत तयारी ठेवली होती. पण त्यांच्यासाठीं मांडलेल्या खुर्चीवर बसण्याऐवजीं त्यांनीं दोन्ही हात पुढें करून हेमचंद्राला आणि रंभाला जवळ ओढलं आणि प्रेमानं घट्ट धरलं... त्यांच्या तोंडून शब्द बाहेर फुटेनात... त्यांच्या मनांत अनेक विचारांची गर्दी झाली होती...

त्या क्षणीं त्यांना कळलं कीं दोन वर्षांपूर्वी रंभाच्या ज्या प्रीतीच्या आड आपण येऊं पहात होतों ती प्रीति म्हणजे एक भरतीची लाट होती. कोणी थोपवूं शकत नाहीं अशी ती लाट होती. ती थोपविण्यांत आपण पराभूत झालों यांत विषाद मानण्यासारखं काय होतं?...आणि त्यांच्या मनांत असंहि आलं कीं ज्यांची विद्येची निष्ठा दुबळी असते त्यांच्या विद्येला प्रेम संकटासारखं घातक ठरत असेल...पण हा हेमचंद्र आणि ही रंभा, या पोरांची निष्ठा दुबळी नाहीं. एकमेकांच्या प्रेमाचा उपभोग घेतांनाच यांची विद्या आणि कलाहि भरतीच्या लाटेप्रमाणें गर्जणार आहे...

आपल्या मनांतले हे सारे विचार बोलून दाखवावे असं हरिप्रसादांना फार वाटलं. परंतु त्यांना शब्द सुचेनात, व सुचले असते तरी त्यांच्या तोंडून ते त्या क्षणीं बाहेर पडले नसते. कारण त्यांचा कंठ सद्गदित झाला होता. ते फक्त रंभाच्या मस्तकावरून हात फिरवीत ' बेटी, बेटी ' एवढंच म्हणत राहिले...

हेमचंद्र चटकन दूर झाला आणि कांहीं वेळानं आपल्या मुलाला घेऊन परत आला. रंभानं त्याच्याजवळून मुलाला घेतलं आणि हरिप्रसादांच्या पायांवर ठेवलं. हरिप्रसादांनीं त्या छोट्या बाळसेदार गोंडस मुलाला उचलून घेतलं, आणि चेष्टेच्या स्वरानं ते रंभाला म्हणाले,

" शाबास! ही समदेखील साधलीस वाटतं ? "

भोंवतालचीं सारीं माणसं हंसलीं. रंभानं लाजून खालीं मान घातली.

हरिप्रसाद म्हणाले, " लाजतेस काय ? वर बघ. याचं नांव काय ठेवलंयस तें सांग कीं."

ती म्हणाली, " प्रसाद ! "

त्या छोट्या मुलाला हरिप्रसादांचा चेहरा मोठा बघण्यासारखा वाटला असावा. कारण तो त्यांच्याकडे अगदीं निरखून पाहूं लागला. आणि मग त्यांच्या झुपकेदार मिशा तो ओढूं लागला.

तें पहातांच हरिप्रसाद मोठ्यांदा हंसूं लागले. त्यांच्या त्या हंसण्यांत केवळ छोट्या प्रसादानं त्यांच्या मिशा ओढल्या एवढ्याच गोष्टीचा आनंद नव्हता. इतर किती तरी आनंद भरले होते ! त्यांनीं रंभाकडे पाहिलं, हेमचंद्राकडे दृष्टी टाकली, राजांकडे पाहिलं, आजूबाजूस नजर टाकली, आणि ते अनावर हंसूं लागले.

राजांनीं, रंभानं आणि हेमचंद्रानं त्यांना धरून खुर्चींत बसविलं. त्या सगळयांना भीति वाटली कीं यांना वाताचा तर झटका आला नाहीं ?... तीं सगळीं मनांतल्या मनांत अगदीं घाबरून गेलीं.

पण कांहीं वेळानं हरिप्रसादांचं तें हंसणं थांबलं. त्यांनीं खूण करून हेमचंद्राला आणि रंभाला पुन्हां जवळ बोलावलं. त्यांच्या भोवतीं दोन्ही हात टाकले...

तितक्यांत घंटा वाजली.

हरिप्रसाद म्हणाले, "राजे, आपण बाहेर जाऊन बसा. मी येणार नाहीं. माझी जागा बाहेर नाहीं. इथें आंत आहे !" त्यांनीं हेमचंद्र आणि रंभा यांच्याकडे पाहिलं आणि विचारलं, "खरं ना ?"

त्या दोघांनीं एकदम वांकून त्यांच्या पायाला स्पर्श केला.

दुसऱ्याच क्षणीं आणखी घंटा झाली. हेमचंद्र आणि रंभा झटकन् दूर होऊन रंगभूमीकडे धांवलीं. नृत्य सुरू झालं. विंगमध्यें बसून तें पाहतां पाहतां हरिप्रसादांची बोटं शिवशिवूं लागलीं. त्यांना इच्छा झाली, मनसोक्त सतार वाजवावी...मनसोक्त पखवाज वाजवावा...हेमचंद्र आणि रंभा यांच्या प्रेमाच्या आणि यशाच्या भरतीच्या लाटेवर आपणहि तरंगावं आणि नादब्रह्माशीं एकरूप होऊन जावं !

समाप्त